


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

## वाङ्मय–समालोचन अंक



वर्ष ३५, अंक १४४ एप्रिल, १९६३

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका







ज्ञानकोशकार के. केतकर
यांच्या अस्थिनिक्षेपणाचा समारंभ
१० एप्रिल १९६३ रोजी
पुणे येथील कमला नेहरु उद्यानात झाला.
त्या प्रसंगी श्री. शीलवती केतकर
त्यांना पुष्पांजलि वहात आहेत.



# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे २.
दि. १५-५-१९६३

## नियामक मंडळ सभा

स. न. वि. वि.

परिषदेच्या नियामक मंडळाची सभा रविवार दि. १६ जून १९६३ ला दुपारी ३ वाजता पुणे येथे मा. प. सभागृहांत भरणार आहे. मंडळाच्या सभासदांनी सभेला अवश्य यावे ही विनंती.

### कामे

१ दुखवटा.
२ मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणे,
३ १९६२-६३ चे वार्षिक इतिवृत्त संमत करणे.
४ १९६२-६३ चा जमाखर्च व ताळेबंद संमत करणे.
५ १९६३-६४ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६ वार्षिक सभेपुढें येणाऱ्या प्रश्नांचा विचार.
७ अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

वि. त्र्यं. शेटे
अ. गं. मंगरूळकर
म. ना. अदवन्त
चिटणीस

न. वि. गाडगीळ
अध्यक्ष

## वार्षिक साधारण सभा

टिळक रस्ता, पुणे २.
दि. १५-५-६३

स. न. वि. वि.

परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. १६ जून १९६३ ला दुपारी ५ वाजता पुणे येथे मा. प. सभागृहात भरणार आहे. सर्व सभासदांनी सभेला अवश्य यावे ही विनंती.

### कामे

१ दुखवटा.
२ मागील सभेचा वृतान्त वाचून संमत करणे.
३ १९६२-६३चे वार्षिक इतिवृत्त संमत करणे.
४ १९६२-६३ चा जमाखर्च व ताळेबंद संमत करणे.
५ १९६३-६४ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६ प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचे त्यागपत्र संमत करणे.
७ संकल्पित इमारतवाढीबाबत निवेदन.
८ अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

वि. त्र्यं. शेटे
अ. गं. मंगरूळकर
म. ना. अदवन्त
चिटणीस

न. वि. गाडगीळ
अध्यक्ष

सूचना – कोणाहि सभासदास अहवाल अथवा हिशेब यासंबंधी वार्षिक सभेत ठराव मांडणे असल्यास त्याने ठरावाची लेखी सूचना सभेच्या अगोदर सात दिवस कार्यालयाकडे पाठविली पाहिजे.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र




# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वाङ्मय-समालोचन अंक

वर्ष ३५, अंक १४४ : जानेवारी–फेब्रुवारी–मार्च, १९६३. संपादक – दि. के. बेडेकर

## संपादकीय

या वर्षीचा हा समालोचन अंक प्रसिद्ध होत असताना दोनतीन तांत्रिक गोष्टींचा उल्लेख प्रथम करणे इष्ट होईल. पत्रिकेच्या छपाईच्या व्यवस्थेबद्दलची अनिश्चितता आता दूर झाली आहे. तसेच, श्री. मो. रा. वाळंबे हे आता संपादक-समितीचे सदस्य झाले असून त्यांच्या देखरेखीखाली छपाईचे व एकंदर सजावटीचे काम उत्कृष्टपणे होणार आहे. तिसरी गोष्ट म्हणजे पत्रिकेमध्ये स्वीकारलेल्या महामंडळाच्या लेखनपद्धतीची. छापावयाचा मजकूर या पद्धतीप्रमाणे दुरुस्त करुन घेण्याचे काम श्री. वाळंबे करीत आहेतच. लेखकांना अशी विनंती आहे की त्यांनी या बाबतीत आम्हांला सहकार्य द्यावे. महामंडळाच्या पद्धतीनेच लेख लिहून पाठविल्यास येथील काम सुकर होईल.

### श्री. पु. य. देशपांडे यांचे अभिनंदन

या वर्षीचे सर्वोत्कृष्ट ग्रंथाचे साहित्य अकादमीचे पारितोषिक श्री. देशपांडे यांच्या 'अनामिकाची चिंतनिका' या ग्रंथाला मिळाले याबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करतो. 'बंधनाच्या पलीकडे' या त्यांच्या पहिल्या कादंबरीने तरुणांची मने एकदम आकृष्ट केली. तेव्हापासून त्यांची वाङ्मयसेवा चालूच आहे व 'चिंतनिके'मध्ये त्यांच्या चिरनूतन भावविश्वाचे एक वेगळेच दर्शन घडत आहे. त्यांच्या या दीर्घकालीन वाङ्मय-तपस्येचा अकादमीने जो गौरव केला आहे त्यात आम्ही आनंदाने सहभागी होत आहोत.

### श्री. मामासाहेब वरेरकर यांचे अभीष्टचिंतन

एप्रिल २७, १९६३ रोजी श्री. मामासाहेब वरेरकर यांच्या वयाची ऐंशी वर्षे पूर्ण झाली असून त्यांनी केलेल्या वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्याबद्दल त्यांचा नागपूर व मुंबई येथे मोठ्या उत्साहाने सत्कार करण्यात आला व पुढील महिन्यात परिषदेच्या वतीने पुण्यास असाच सत्कार–समारंभ होणार आहे. कादंबऱ्या, नाटके, अनुवादित साहित्य, चित्र-पटकथा व नभोवाणीवरील व्याख्याने अशा विविध प्रकारच्या वाङ्मयाची विपुल निर्मिती श्री. वरेरकर यांनी केली. गेली सात वर्षे संसदेचे सभासद म्हणून त्यांनी मोलाची काम-गिरी केली. साहित्य अकादमी व ललितकला अकादमी या संस्थांचे सदस्य म्हणून मराठी भाषेला आणि नाट्याला योग्य स्थान लाभण्यासाठी त्यांनी प्रयत्न केले व नभोवाणी-

अनुक्रमणिका

वर नाटय या माध्यमाचा उपयोग करून घेण्यास जो प्रारंभ झाला त्याचे बरेच श्रेय श्री. वरेरकर यांना आहे. सर्व भारतीय भाषांतील साहित्यिकांशी मराठीचे प्रतिनिधी म्हणून त्यांनी जिव्हाळ्याचे व आपुलकीचे संबंध जोडले. अशा अनेकविध कार्यांसाठी त्यांचा जो कृतज्ञतापूर्वक गौरव केला जात आहे त्यात सहभागी होऊन आम्ही त्यांना दीर्घ आयुरारोग्य चिंतितो.

**ज्ञानकोशकार केतकर यांचे स्मारक**

डॉ. केतकर यांच्या समाधीची नदीकाठी ठोसरपागेतील जागा नदीच्या प्रवाहाने काठ आत येत गेल्याने धोक्यात आली होती व त्यांचे अवशेष तेथून हलवून एखाद्या चांगल्या जागी ठेवावेत असा प्रयत्न गेली काही वर्षे चालू होता. मध्यंतरी, १२ जुलै, १९६१ रोजी, पानशेतचा पूर येऊन समाधिस्थान वुडाले, परंतु नंतर तेथून अवशेष उचलणे शक्य झाले व ते परिषदेच्या कार्यालयात सुरक्षित ठेवण्यात आले. या अवशेषांना कमला नेहरू उद्यानात आम्रवृक्षांच्या शांत छायेत निक्षेपित करण्याचा समारंभ एप्रिल १० रोजी झाला व त्या जागेवर आता एक साधे स्मारक बांधले जात आहे. पुढेमागे, या ठिकाणी एखादी छत्री बांधून त्यात डॉ. केतकरांचा अर्धपुतळा ठेवणे शक्य होईल. त्याबाबत निश्चित योजना करणे व त्यासाठी द्रव्यसाहाय्य मिळविणे याचा विचार चालू आहे.

**दुःखद निधने**

श्री. **पंडित शेटचे** यांचे अल्पायुषी निधन म्हणजे एक विलक्षण आणि विपरीत घटना झाली. साहित्यक्षेत्रातील अनेकांशी जिव्हाळ्याची मैत्री संपादन करणारा, उमद्या मनाचा व झुंझार वृत्तीचा हा लेखक दारिद्र्याशी झगडत होता व तरीही मनाची आनंदी वृत्ती व कलात्मक प्रवृत्ती प्रफुल्लित ठेवू शकला होता. गतवर्षी औरंगाबादला कॉलेजमध्ये अध्यापनाचे काम मिळाले तेव्हा वनवास संपला व लेखनकार्याला भरपूर वेळ आता आहेच अशा उमेदीने शेटचे औरंगाबादला गेले. परत आले ते सुट्टीत अमूक पुरे करावे व तमूक सुरू करावे म्हणून; आणि अचानक त्यांना मरणाने गाठले. त्यांचा अल्पसा सहवास मला लाभला, पण एक कायमची आठवण राहावी असा प्रत्यय तेवढ्या अल्प परिचयातही ते देऊन गेले. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखात आम्ही सर्वजण सहभागी आहोत.

श्री. **सदुभाऊ जोगळेकर** हे मागील पिढीतले लेखक व संशोधक. त्यांचे व्यक्तित्व 'लेखक' किंवा 'साहित्यिक' या शब्दात मावणारे नव्हते. 'सह्याद्रि' हा संशोधनात्मक ग्रंथ त्यांनी लिहिला व 'गाथासप्तशती'चे संपादनही मोठ्या कसोशीने व तितक्याच रसिकतेने केले. गोदावरी नदीची एक समग्र प्रवाहगाथा ते लिहीत होते व तो ग्रंथ तयार झाला असता तर मराठी भाषेत एक अमोल भर पडली असती. पण, संशोधक व साहित्यिक या दोन्ही साच्यांत पुरतेपणी न मावणारे असे एक मोठे व्यक्तित्व त्यांचे होते. रसिकता व गांभीर्य या दोन्हींचा उत्कट आविष्कार त्यांच्या लेखनातून होत असे आणि प्रत्यक्ष संभाषणात आणि जास्त परिचयातल्या मित्रांशी होणाऱ्या गप्पांत त्यांची खेळकर मिस्किल वृत्ती प्रकट होत असे. त्यांच्या मृत्यूमुळे एक जिव्हाळ्याचा मित्र गेला असे अनेकांना वाटले. गोदावरीची गाथा अपुरी राहिली याची निरंतर हुरहूर मराठीच्या अभिमान्यांना वाटत राहील.

**पंडित राहुल सांकृत्यायन** यांनी साहित्य व संशोधन या दोन्ही क्षेत्रांत फार प्रचंड व मोलाची कामगिरी केलेली आहे व त्यांच्या मृत्यूमुळे हिंदीभाषिकांचेच नव्हे तर भारतीय भाषांचे व संस्कृति-संशोधनाचे अपरिमित नुकसान झाले आहे. राहुलजींनी साहित्यसेवा केली ती समाजपरिवर्तनाच्या

लढ्यातील एक सैनिक म्हणून व संशोधन करताना त्यांची दृष्टी समाजाला पूर्वेतिहासाचे व संस्कृतीचे ज्ञान देऊन डोळस करण्याची होती. त्यांच्या भव्य कर्तृत्वाचे स्मरण करून त्यांना आम्ही श्रद्धांजली अर्पण करतो.

**कलाकार मुलांचे शिविर.**

चित्र, शिल्प इत्यादि ललितकलांची आवड असणाऱ्या चौदा ते अठरा वर्षे वयाच्या सुमारे ६० मुलांचे एक शिविर पुणे येथे 'साधना' संस्थेतर्फे या महिन्यात घेतले जात आहे. महाराष्ट्राच्या साऱ्या जिल्ह्यांतून ही मुले येणार असून एकत्र काही काळ राहून विविध कलांविषयी माहिती घेणार आहेत. अशाच तऱ्हेचे शिविर वाङ्मयीन आविष्काराची आवड असणाऱ्या मुलांचे घेता येईल का? अशा शिविराची योजना करून ती सफल करणे हे काम अवघड आहे खरे, पण अशा तऱ्हेच्या प्रयोगाचा उपक्रम साहित्यसंस्थांनी हाती घ्यावा अशी सूचना एका मित्रांनी केली, तिचा येथे उल्लेख करावासा वाटतो. ललितकलांची आवड उपजत काही मुलांमध्ये असते, पण त्या आवडीला दिशा व प्रोत्साहन मिळणे, तसेच काही रूढ झालेल्या किंवा नव्याने फॅशन बनू पाहणाऱ्या चुकीच्या प्रवृत्तीपासून परावृत्त होणे आवश्यक असते. तेच काम 'साधने'च्या शिविरातून साधण्याचा अल्पसा प्रयत्न आहे. जे ललितकलांच्या बाबतीत तेच साहित्याच्या बाबतीतही खरे आहे. म्हणून, मुलांमधील वाङ्मयीन आवड व निर्मितीची प्रबळ इच्छा सफल तऱ्हेने वाढीस लागावी यासाठी अशा एखाद्या शिविराची योजना हाती घेण्यासारखी आहे असे आम्हांस वाटते. या बाबतीत वाचकांनी आपले विचार कळविल्यास पत्रव्यवहाराच्या सदरातून त्याबद्दल चर्चा होऊन योजनेच्या इष्टानिष्टतेचा अंदाज घेता येईल.

**वाङ्मयीन महत्त्वाचे दुर्मिळ ग्रंथ इत्यादींचे जतन**

मराठी वाङ्मय व सांस्कृतिक इतिहास यांच्या अभ्यासकांना बहुमोल वाटणारे व आता दुर्मिळ झालेले ग्रंथ व नियतकालिके यांचा संग्रह आज ठिकठिकाणी विखुरलेला आहे. 'विविधज्ञानविस्तारा'चे समग्र फाईल, किंवा सन १८०० ते १८७० पर्यंतच्या काळात प्रसिद्ध झालेले ग्रंथ हमखास एका ठिकाणी उपलब्ध होतील असे नाही. शिवाय, आगरकरांचा पत्रव्यवहार किंवा विठ्ठल रामजी शिंदे यांची हस्तलिखिते अशी सामग्री आज खाजगी व्यक्तींनी जतन करून ठेवलेली आहे, पण ती संशोधकांना उपलब्ध होणे कठीण आहे. तसेच, अद्ययावत् उपकरणांच्या साहाय्याने त्यांचे संरक्षण करणे व मायक्रोफिल्मस् काढणे हे खाजगी व्यक्तींना, किंबहुना संस्थांनाही परवडणारे नाही.

परिषदेने या बाबतीत मागेच एक ठराव करून अशा सामग्रीचे एकत्रीकरण, जतन व तिची संशोधकांना उपलब्धी करून देण्यासाठी एक योजना सरकारने करावी असे सुचविले होते. अशी एखादी सरकारी योजना अमलात येण्यापूर्वी व तशी योजना झाल्यावरही या सामग्रीच्या बाबतीत सर्व साहित्यप्रेमी लोकांनी काही पावले टाकणे जरूर आहे. दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित सामग्री एकत्र आणून तिचे अद्ययावत् पद्धतीने जतन होण्याची व्यवस्था होण्यापूर्वी अशा सामग्रीचे आहे त्या ठिकाणी शक्य त्या आस्थेने जतन होणे जरूर आहे. सरकारने एकत्रीकरणाची व्यवस्था केल्यावर ती सामग्री त्या व्यवस्थेत सामील करण्याची इच्छा सामग्रीचे आज जतन करणारांनी दर्शविली पाहिजे व अशी सामग्री हे महाराष्ट्राचे सांस्कृतिक धन आहे ही जाणीव त्यांच्यांत उत्पन्न करण्याचे कार्य साहित्यिकांचे व साहित्यसंस्थांचे आहे. हे कार्य आपण करीत गेल्यानेच एकत्रीकरणाची योजना लवकर मूर्त होऊन फलद्रूप होणार आहे.



अनुक्रमणिका

# कै. विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिके

कै. विश्वनाथ बल्लाळ गोखले सरन्यायाधीश, संस्थान कोल्हापूर, यांच्या चिरंजिवांनी आपल्या वडिलांच्या व मातुःश्री कै. सौ. पार्वतीबाई विश्वनाथ गोखले यांच्या स्मरणार्थ म. सा. परिषदेस पाच हजार रुपयांची देणगी सरकारी कर्जरोख्यांच्या रूपाने दिली. या देणगीचा कार्यकारी मंडळाने दि. २८-४-६३ च्या सभेत आभारपूर्वक स्वीकार केला आहे. देणगीवरील व्याजाचा विनियोग पुढीलप्रमाणे व्हावयाचा आहे :

१. सदरील रु. ५००० च्या कर्जरोख्यावर सध्या दरवर्षी रु. १५० प्रमाणे येणाऱ्या व्याजाचा किंवा त्या कर्जरोख्यांची परत फेडीने अथवा विक्रीने जी रोख रक्कम येईल तिच्या वेळोवेळी केल्या जाणाऱ्या गुंतवणुकी (इन्व्हेस्टमेंट) पासून जे उत्पन्न येईल त्याचा विनियोग पुढीलप्रमाणे करावा.

२. पहिल्या वर्षी म्हणजे १९६३ साली त्यापूर्वीच्या दोन वर्षांत प्रसिद्ध झालेल्या ललित वाङ्मयाव्यतिरिक्त – म्हणजे कादंबरी, लघुकथा, नाटक, काव्य सोडून इतर, इतिहास, शास्त्र, चरित्र, आत्मचरित्र, ज्ञान-विज्ञान, तंत्रशास्त्र इत्यादि विषयांवरील सर्वोत्कृष्ट ग्रंथास 'विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक' या नावाने रु. १५० किंवा वेळोवेळी येणाऱ्या एकूण व्याजाच्या रकमेचे पारितोषिक द्यावे.

३. असा ग्रंथ उपलब्ध नसल्याने किंवा कोणताही ग्रंथ पारितोषिकास पात्र नाही असा निर्णय घेतला गेल्याने किंवा अन्य कोणत्याही योग्य कारणामुळे पारितोषिक देता न आल्याने व्याजाची रक्कम शिल्लक राहिली, तर तिचा विनियोग पुढे केव्हाही वरील प्रकारच्या एकाऐवजी दोन ग्रंथांना पारितोषिक देण्यासाठी किंवा एखादा ग्रंथ विशेष योग्यतेचा अथवा श्रेष्ठ प्रतीचा ठरल्यास त्यास रु. १५० हून अधिक रकमेचे पारितोषिक देण्यासाठी करावा. कोणत्या ग्रंथास पारितोषिक द्यावयाचे याबाबतचा परिषदेचा निर्णय अखेरचा राहील.

४. दुसऱ्या वर्षी म्हणजे सन १९६४ मध्ये त्यापूर्वीच्या वर्षात परिषदेच्या 'विशारद' परीक्षेत शेकडा निदान ५० गुण मिळवून प्रथमस्थानी येणाऱ्यास 'विश्वनाथ-पार्वती गोखले' या नावाचे १०० रुपयांचे व त्याच रीतीने 'प्राज्ञ' परीक्षेत प्रथमस्थानी येणाऱ्यास ५० रु. चे 'विश्वनाथ-पार्वती गोखले' या नावाचे पारितोषिक द्यावे. वर कलम १ मध्ये लिहिल्याप्रमाणे केल्या जाणाऱ्या गुंतवणुकीपासून जे उत्पन्न येईल त्याचाही विनियोग याचप्रमाणे व याच प्रमाणात करावा.

५. याप्रमाणे एका वर्षी वर निर्दिष्ट केलेल्या स्वरूपाच्या ग्रंथास व एका वर्षी वरील परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थि-विद्यार्थिनीस अशी आलटून पालटून वरील नावाची पारितोषिके द्यावीत.

६. सदरील देणगीवरील व्याजाचा विनियोग करण्यासाठी परिषदेच्या व्यवस्थापकीय खर्चासाठी द. सा. द. शे. ३ टक्के व्याजाने आणखी रु. ३०० चे सरकारी कर्जरोखे दिले जातील. या कर्जरोख्यावरील व्याज व्यवस्थापकीय खर्चासाठी वापरावे. मात्र मुख्य देणगीच्या गुंतवणुकीवरील सर्व व्याज वरीलप्रमाणे पारितोषिकासाठी वापरावे.

७. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वार्षिक अहवालात व 'पत्रिके'त दरवर्षी या पारितोषिकांचा विनियोग कसा झाला व ते कोणत्या ग्रंथास व विद्यार्थ्यांना दिले त्याचा उल्लेख करावा.

९-४-६३

वि. त्र्यं. शेटे
चिटणीस



# मराठी वाङ्मयाचे समालोचन

## ( १९६२ )

## कविता

प्रा. कृ. ब. निकुम्ब

यंदाच्या काव्याची सुगी समृद्ध आहे हे सहजी नजरेत भरण्यासारखे आहे. तिची समृद्धी तऱ्हातऱ्हांनी ध्यानी येण्यासारखी आहे. यंदाच्या काव्यग्रंथांची संख्या पुष्ट नसली तरी कृशही नाही. त्यातही अनेक काव्यप्रकार आलेले आहेत. भावकवितेची विपुलता आहेच, पण त्याशिवाय नाटयगीते आहेत, संगीतिका आहेत, निवेदनपर दीर्घ कविता आहेत, शुद्ध गीते आहेत, एक खण्ड-काव्यसुद्धा आहे. मराठीतील मान्यकवींचे अनेक संग्रहही या वर्षी प्रसिद्ध झालेले दिसतात. यशवन्तांचा 'कमण्डलु', कुसुमाग्रजांचे 'स्वगत', पाडगावकरांचा 'उत्सव', बापटांची 'अकरावी दिशा', आरती प्रभूंची 'दिवेलागण', कान्तांची 'वेलांटी', पद्मांची 'स्वप्नजा' आणि वा. ना. देशपांडे यांचे 'पिकासोचे कबुतर' ही सारी या समृद्धीचीच साक्ष. रविकिरण-मण्डळाची परम्परा, कुसुमाग्रज-बोरकरांनी दिलेले नवे वळण आणि अत्याधुनिक कवितेने घडविलेले सर्वस्वी वेगळे संस्कार या साऱ्या प्रवाहांचे प्रतिनिधित्व करणारे संग्रह या वर्षी प्रकाशित झालेले आहेत.

काही संग्रहांच्या बाबतीत तर हे प्रतिनिधित्व त्यांतील प्रमुख व्यक्तींनीच केलेले आहे. रविकिरण-मण्डळाचे अठ्ठेचाळिसावे पुस्तक म्हणून 'कमण्डलु' हा संग्रह यशवन्तांनी सादर केलेला आहे. "भाषेच्या कृत्रिमतेपासून कवितेला दूर ठेवायचे व भावनात्मक जीवित-सौंदर्य वाचकांच्या अन्तः-करणापर्यंत संक्रान्त करायचे हे रविकिरण–मण्डळाच्या काव्यनिर्मितीचे वैशिष्टय" आहे, असा निर्देश खुद्द यशवन्तांनीच यंदाच्याच एका प्रस्तावनेत करून ठेवलेला आहे. ('धूमकेतु'–म. स. आपटीकर.) निदान यशवन्तांच्या कवितेत तरी त्यांनी सांगितलेली ही दोन्ही वैशिष्टये स्पष्टपणाने उमटत असत. जीवनातल्या अनुभवांचे सौंदर्य व्यक्त करण्यापलीकडे कलेला कोणताही हेतू नसावा ही त्यांची श्रद्धा 'कमण्डलू'तील 'फुलतो आम्ही' या पहिल्या कवितेतही व्यक्त झाली आहे. पण या कवितेच्या प्रत्यक्ष आविष्काराला मात्र निर्हेतुक कलाविलासाच्या हेतुसिद्धीसाठी लिहिलेल्या कवितेचे स्वरूप आले आहे. हाच प्रकार 'कमण्डलू'तील कित्येक कवितांच्या बाबतीत घडलेला आहे. एखादा विचार समजावून देण्याकरिता ती ती कविता लिहिली गेली असे वाटते. बोधपरतेचा ठसा स्पष्टपणाने कित्येक कवितांवर उमटतो, तपशिलांचा विस्तार होत जातो, आणि काही

अनुक्रमणिका

काही वेळी तर 'यापरी भावुनी कळकळते काळिज' असा सारांशवजा समारोप केला जातो.

सहजसुंदर नेमक्या कल्पनांचा चमकदार विलास यशवन्तांच्या जुन्या कवितेत वारंवार दिसत असे. येथे मात्र पुष्कळदा कृत्रिम विसंगत कल्पना सापडते. कुठे सुंदर कल्पना सुचूनही अतिशय विस्तारामुळे तिचे सौंदर्य उणावलेले दिसते ('मी' पृ. ८१), तर कुठे केवळ एखाद्या साध्या कल्पनेचा विस्तार करण्याकरिताच संपूर्ण कविता लिहिली गेल्यासारखी वाटते. (पंचपंच उषःकाल). प्रासंगिक कविताही या संग्रहात आहेत आणि त्यातला विचार क्वचितच नावीन्यपूर्ण उतरला आहे.

'दिसती जे काळेकळकट
बन्धु वरे तुमचे शतपट'

किंवा

'का उन्हाळ्यात हा प्रवास पतकरला मी
राहिलो न तरि का निजधामी आरामी'

यासारखी उघड उघड गद्यरचना कुठे कुठे झालेली दिसते. 'मुंग्या – पंखांच्या मुंग्या' ही कविता वाचताना मर्ढेकरांची अपरिहार्य आठवण होते आणि या कवितेतील आधीच वेताचा असलेला उपरोध अधिकच फिका वाटू लागतो.

पण क्वचित,

'ही माझी कविता जुनी, पुन्हा वाचुनी
पाहता सहज,
ते डुलू लागले झडलेले अम्बुज'

असाही अनुभव 'पाथेय' सारखी कविता वाचताना येतो. ही कविता वाचताना जुने 'जयमङ्गला'कार यशवन्त भेटल्याचा आनंद रसिकाला होतो.

"झाला उशीर याची माफी करा दयाळा
नेत्रांत याचनेचा दाटे तुझ्या उमाळा
आलीस ह्याचसाठी हेही वरेच झाले
ही भेट, हा उमाळा पाथेय यात्रिकाला"

पण असा अनुभव क्वचितच येतो. 'धूमकेतु'च्या प्रस्तावनेत कवीची ओळख करून देताना यशवन्तानी म्हटले आहे की, कवि शिक्षक आहे, प्रमेयांची उकल करून त्याचे स्वरूप विद्यार्थ्यांना आकलनसुलभ व्हावे हा त्या पेशाचा बाणा आहे आणि त्यामुळेच त्याच्या कवितेत दुर्बोधपणा नाही. 'कमण्डलू'तील यशवन्तांवर याच कल्पनेचे वर्चस्व असल्यासारखे दिसते आणि यामुळेच रविकिरण-मण्डळाच्या ऐन वैभवाची मिरास मिरवण्याचे भाग्य 'कमण्डलू'च्या वाट्याला येणे कठीण होऊन बसले आहे.

रविकिरण-मण्डळापेक्षाही निखळ सौंदर्यपूजेचा हव्यास बोरकर-कुसुमाग्रजांच्या काव्यात विशेषत्वाने उमटलेला दिसतो. बोरकरांच्या कवितेचे तर ते प्रमुख वैशिष्टच आहे. आणि कुसुमाग्रजांच्या ध्येयपूजनाला व सामर्थ्यपूजनालाही त्यांची सौंदर्यशक्ती वेष्टून बसलेली आहे. स्वाभाविकच एकीकडून रवि-किरण-मण्डळ आणि दुसरीकडून कुसुमाग्रज—बोरकर यांचे संस्कार आत्मसात करीत स्वतःला गवसलेले सौंदर्यक्षण चित्रित करणारी कविता या कालात अनेकांच्या हातून निर्माण झाली.

म. स. आपटीकर यांच्या 'धूमकेतू'त हे दोनही परिणाम स्पष्टपणे दिसतात. 'धूमकेतु' 'एकाकी' या कविता वाचताना कुसुमाग्रजांच्या 'माळाचे मनोगत' आणि 'पृथ्वीचे प्रेमगीत' या 'विशाखे'तील कवितांचे स्मरण होते, तर 'अशीच ये तू' ही कविता 'उज्ज्वले'तील 'कशी येशील ?' या कवितेची आठवण करून देणारी आहे.

या संस्कारांच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न या संग्रहात सफल होताना दिसतो. आपटीकरांच्या कवितेच्या आशयात प्रसन्न आशावाद आणि रचनेत नेटकेपणा आहे. याबरोबरच अनुभवाची तीव्रता आणि सूक्ष्मता मात्र अधिक यायला हवी असे वाटते.

अनुक्रमणिका



'गन्धरात्र' (गोविन्द जोशी) आणि 'मधु-धारा' (मा. गो. काटकर) या संग्रहांत आणि त्याहीपेक्षा विशेषत्वाने सौ. निर्मला देशपांडे यांच्या 'गंधखुळी'त सौंदर्यशोधक मनाच्या अनुभवांची सूक्ष्मता अधिक परिणाम-कारकपणाने उमटली आहे. गोविंद जोशी यांच्या मनोवृत्तीला अजून मधुवयातल्या आत्यंतिक हळवेपणाचे वेड आहे. 'जगतो मी जीवन हे शब्दांच्या कायेने' अशी काव्या-बद्दलची उत्कटता त्यांच्या अन्तःकरणाला भारून राहिली आहे. आपल्या शब्दांनी आपले भावगन्ध झेलावेत असे त्यांना तीव्रतेने वाटते. त्यांच्या शब्दांनी अनेक ठिकाणी हे परिणाम-कारकपणे केलेलेही आहे. 'ओलीसुकी', 'उघडी कोडी', 'ऊर्मी', 'नको रे जाऊस', 'स्पर्शताच तुझा कर' यासारख्या कवितेत शब्द आणि आशय यांचा स्वाभाविक मेळ पडलेला दिसतो.

तरीही जोशी यांच्या कवितेला अजून शब्दसौंदर्याचा मोह आहे. त्यामुळे काही कवितांत आशयाच्या मानाने शब्दांची आतष-बाजी अधिक होते. त्यांच्या रचनेत वृत्त-दोषाचाही आढळ होतो. हे दोष जमेला धरूनही त्यांच्या 'गंधित वेदनांची' रस-निष्ठता रसिकांना हवीशी वाटणारीच आहे.

मा. गो. काटकरांचा मधु-धारा हा दुसरा कवितासंग्रह; त्यांची कविता आधीपासूनच सौंदर्यलक्षी होती. तिला आता अधिक सफाईदार स्वरूप प्राप्त झालेले दिसते. संसारातील सुखदुःखे, प्रणयाच्या विविध छटा, निसर्गाच्या संगतीतील अनेक अनुभव, या सौंदर्यवादी दृष्टिकोणातून त्यांनी टिपलेले आहेत. 'दीपवात'सारखी एखादी छोटीशी कविताही त्यांच्या वैशिष्ट्याची प्रातिनिधिक ठरावी :

'चान्दण्यात न्हालेली मध्यरात्र,
भिरभिरतो फुलवेडा मन्दवात,
दारि उभा उन्मादक पारिजात
निद्रावश नीरवता अङ्गणात
मन्दिरात जळत शान्त वधत वाट
जागतसे कनककान्ति-दीपवात'.

सौ. निर्मला देशपाण्डे तर स्पष्टच कबुली देतात की —

'मी लिहीन म्हटले काव्य एक सुंदरसे
रस-गन्ध-रुपाचा छन्द मना जडलेला'

रस-गन्धादि संवेदनांनी या कवयित्रीचे मन वारंवार भारावून जाते. तिचे विश्वही एक-प्रकारच्या तृप्ततेने तुष्ट झालेले आहे. 'उरी बिल्वदळ जपण्याचे' बळ देवाने द्यावे अशी तिची मागणी आहे.

या आत्मतृप्तीला सागर-ताण्डव, वादळ-वारा यातल्या रुद्र-सौंदर्याचा हव्यास नाही, हेही मन कधीतरी बंडखोरी करू पाहते, वेणीत मोत्यांच्या जाळीऐवजी निळी मेघ-माला गुंफावी असे त्याला वाटते, रेशमाच्या शेजेवर लोळण्यापेक्षा कुशीमध्ये वीज घ्यावी अशी त्याला इच्छा होते. पण लागलीच कवयित्री त्याला इशारा देते :

'नको करू मना अशी बंडखोरी
फीर भिरीभिरी घरट्यात'

या आत्मतृप्तीचा सौम्य-शीतल रंग जिच्यातून सुकुमारपणे उमटावा अशीच नाजूक कल्पकता या काव्यात विलास करताना आढळते.

'वाट पाहताना माझे रन्ध्र रन्ध्र झाले कान'
किंवा

'एक शिम्पली छेदून
खुळ्या मोती वेचू नको
शिम्पलीचा वेध घ्याया
मोती व्यर्थ ठेचू नको

ही त्याची काही उदाहरणे.

काही कवितांतून कौटुम्बिक गोडवाही प्रसन्नपणे पाझरताना दिसतो. कवयित्रीचे स्त्रीमन, लोकगीतात्मक वाङ्मयाचा त्यावर

झालेला संस्कार, आणि सर्वत्र साधलेली प्रसादपूर्ण, नादमधुर शैली यामुळेही या कवितेचे सौंदर्य वृद्धिंगत झालेले आहे. पण या संग्रहातील विनोदी कवितांना हे यश लाभलेले नाही.

खुद्द कुसुमाग्रजांच्या 'स्वगता'तील कवितेत मात्र आता सौंदर्यपूजनाचा तीव्र हव्यास उरलेला नाही. ती आता अधिक अंतर्मुख आणि विचारमन्थर झालेली दिसते. जीवनाच्या अंतिम सत्याचा ती शोध घेऊ पाहत आहे. 'त्या असाध्याकडे जाणाऱ्या मार्गावर मी जातो आहे पुढे — सारखा पुढे —' किंवा 'रात जागे भोवताली वाजे अदृश्यात चाळ' असे तिच्यात येणारे उल्लेख किंवा 'ईशावास्यम्' मधील त्यांनी केलेली काही भाषांतरे यांतून या अन्तर्मुखतेची खूण पटते. 'संसारातून अदृश्य झालेला सारा भूतकाल' आणि 'आमच्या दृष्टीला आज अदृश्य असलेला सारा भविष्यकालही' जिने पिऊन टाकलेला आहे अशा कालनदीचा ते जवळून परिचय करून घेऊ पाहतात हीही अंतर्मुखतेचीच खूण असावी.

या दृष्टीने त्यांच्या पूर्वीच्या कवितांपेक्षा या संग्रहाचे स्वरूप वेगळे वाटते, आणि 'स्वगत' हे त्याचे नावही एकपरीने सार्थ वाटते. केवळ या अंतर्मुख जाणिवांच्या व्यक्तीकरणातच नव्हे तर एकंदरीनेच भावनांच्या आवेगाकडून विचारांच्या गांभीर्याकड कविमन या संग्रहात वळलेले दिसते. 'कबूतर', 'रस्ते', 'दिवे', 'बाजीराव' यांसारख्या कवितांत विचार आणि भावना यांचा एकमेळ होतो आणि त्यांचा परिणाम अधिक गहिरा होतो.

कुसुमाग्रजांच्या प्रत्यक्ष प्रवासाच्या खुणाही या कवितेत उमटल्यासारख्या वाटतात. 'खुलदाबाद', 'आग्र्याच्या किल्ल्यात', 'साची'. 'यमना', 'ताज', 'कैलास–लेणे' 'औरंगाबाद' या कवितांतून त्या त्या स्थळी कविमनात आलेला विचारच शब्दांकित केलेला दिसतो. औरंगाबादसारख्या कवितेत त्या विचाराला कल्पनेचे नावीन्य आणि भावनेची किनार लाभल्यामुळे ती प्रभावी उतरली आहे खरी, पण इतरत्र असा अनुभव येतोच असे नाही.

यांपैकी बहुसंख्य कवितांची रचनाही वेगळ्या पद्धतीची आहे. तिच्यावर नवकवितेचा परिणाम झालेला आहे. मुक्तच्छन्दाचा आणि स्वैर-गद्याचाही प्रयोग येथे नैपुण्याने केला गेला आहे. 'खुलदाबाद' सारख्या कवितेत तो समर्पक वाटतो, पण एकंदरीने ही रचना स्वैर असूनही तिच्या गतीला मात्र पायबन्द पडल्यासारखा वाटतो. कुसुमाग्रजांची उत्तुंग कल्पकता याही संग्रहात आढळते, पण तीही एक प्रकारच्या अवजडपणाने प्रकट होत आहे असा अनुभव येत राहतो. 'स्वगता'तील काही कवितांच्या आशयात गतीचा वेध आहे, पण एकूण सर्वच कवितांच्या आविष्कारात मात्र आवेगापेक्षा हळूहळू पण निश्चित पावले टाकीत येणारा संथपणाच प्रत्ययाला येतो.

नव्या–जुन्याचा हा संकर कान्तांच्या 'वेलांटी'त तर अतिशय स्पष्टपणे प्रकट झाला आहे. 'उभी मी सदनि दीप लावुनी', 'जोगी' 'श्वास चांदण्याचे दोन', 'सख्या का गाइलेस ते गान' यांसारख्या कवितांतून 'रुद्र–वीणे' तील 'वीणावती' चे हळुवार, अद्भुतप्रिय, सौंदर्यवादी अंतःकरण व्यक्त होते तर 'निळे कबूतर', 'पुतळा', 'चकमक झडली आहे मातीच्या मनात' या अलिकडच्या कवितांत प्रत्यक्ष जीवनाचा शोध घेणारे, त्यातील कुरूपतेवर मात करू पाहणारे वास्तववादी मन उमटत राहते. या संग्रहातील कविता कालानुक्रमाने वाचीत असताना सौंदर्यवादाकडून वास्तववादाच्या

दिशेने होणारा कविमनाचा हा प्रवास स्पष्टपणाने जाणवू लागतो.

कान्तांची अलिकडची काही रचना नवकवितेप्रमाणे स्वैर-गद्यातील आहे. नवकवितेच्या आणखीही काही खुणा तिच्यात सापडतात. कोठे अस्पष्ट प्रतीके आहेत, (निळे कबूतर) कोठे अर्थदृष्टया एकप्रकारचा धूसरपणा आलेला आहे, भावसौंदर्यापेक्षा विचारगांभीर्याचा हव्यास कोठे जाणवण्याइतका उतरला आहे आणि यामुळे त्यांची ही सारी कविता काहीशी वेगळया स्वरूपाची झाली आहे.

पण कान्तांमधील सौंदर्यपूजक भावकवी अजून स्वतःला विसरलेला नाही, एवढेच नव्हे तर त्याच्या सौंदर्यविषयक संवेदना अधिक उत्कट आणि सूक्ष्म झाल्या आहेत.

'यक्ष', 'गोड आम्वट उगीर', 'माझ्या मनात उभी तू', 'छाया चाफ्याची', 'ती पवळघाची वाट', 'सय', 'भिजूनीहि पावसात' यांसारख्या अनेक सुंदर कवितांतून कान्तांच्या सौंदर्यासक्त मनाचे सूक्ष्म उन्मेष तितक्याच सूक्ष्मतेने नवोनव कल्पनांच्या संगतीत प्रकट झाले आहेत.

कान्तांची कल्पकता हा त्यांच्या कवितेचा एक लक्षणीय विशेष आहे. कांतांच्या आवडत्या प्राजक्त-पुष्पाप्रमाणेच 'वेलांटी'च्या पानोपानी कल्पनांचा सुगन्धी सडा शिंपला गेला आहे.

'रुळत हलत
एक कवडसा चन्द्र होऊ पाहे तुझ्या मानेवर'
'देठी रुसे, दळी हासे
प्राजक्ताची न्यारी रीत
हास्य रुक्मिणीचे फुले
सत्यभामेच्या रोषात.'
'छाया चाफ्याची अङ्गणी
झोपेपरी चाळवते'
'गळेल वाटे चांदण्यात हे निळया नभाचे
पान'
'प्रभातरल गुदगुल्या मुलायम
हळुच नभाला केल्या कोणी
रात्र कुशीवर वळली हासुन
स्मित फुटले क्षितिजाच्या कोनी'

अशी या कल्पकतेची अनेक उदाहरणे देता येतील. 'ही दुपार' या कवितेत तर रेखीव शब्दचित्रांची ओळच्या ओळ रेखाटली गेली आहे. अशा बहुसंख्य कवितांत कान्तांची भाषाही कमालीची रेखीव, देखणी असते. सौंदर्यसंपन्न भावानुभूती, समर्पक कल्पनांतून नेमक्या शैलीने रसिकांच्या अंतःकरणात थेट आत शिरावी आणि तेथेच घोटाळत राहावी हे यश कान्तांची कविता अनेकवार मिळवून जाते.

पाडगावकरांची कविताही 'उत्सवा'त काही नवे शोधू पाहते. पाडगावकरांचे व्यक्तिमत्त्व अतिशय संवेदनशील आहे. रसगन्धादि संवेदना त्यांना केवळ भारून टाकतात हे त्यांच्या पूर्वीच्या संग्रहाने सिद्ध केलेच आहे. 'उत्सवा'तील कित्येक कवितांत त्याची अधिक सूक्ष्मतेने आणि परिणामकारकपणाने साक्ष पटते.

विशेषतः निसर्गाच्या संगतीत त्यांच्या या संवेदना सर्वांगांनी उमलून येतात. एखाद्या 'नितळ सकाळी' त्यांचे मन दव होते, ओली झाडे...निळे तळे, शुभ्र कळया होते; पाङ्गाऱ्याची फुले पाहून ते 'मीच मला कळल्याचा...आढळल्याचा' मुक्त घोष करतात. फार काय जेव्हा 'सौख्याची चव' नाहीशी होते तेव्हाही 'पाण्याचे गार निळे वर्तुळ' त्यांच्यासाठी 'यक्षजळातील होडी' होते — असे वाटते की पाडगावकरांना कोणा 'परीने ताऱ्यांचे, झऱ्यांचे, वाऱ्यांचे, न बावणाऱ्या फुलांचे, सावल्यांच्या झुल्यांचे गाणेच' देऊन ठेवलेले असावे.

या प्रकारच्या कविता वाचीत असताना नागरजीवनाच्या संपर्कापासून दूर एखाद्या परीकथेतीलच अद्‌भुतसौंदर्यपूर्ण पण वैभव-संपन्न निसर्ग वातावरणात गेल्याचा अनुभव वाचकाला येऊ लागतो. हे वातावरणही सलगपणे, संपूर्णपणे त्याला दिसतेच असे नाही. उडत्या फुलपाखराच्या पंखाप्रमाणे त्यातील काही चमचमती दृश्ये त्याच्या डोळ्यांपुढे तरळून जातात.

इतर काही कवितात मात्र परीने दिलेल्या त्या गाण्यात 'अश्रूंची उणीव' आहे या गोष्टीची त्यांना पटलेली खूण स्पष्ट होताना दिसते. 'लूत लागलेली सुखे घर आतून सांभाळी' हा नवा अनुभव त्यांना येतो. अशा घरात 'थेम्ब खारट पाण्याचा' एवढाच अश्रूंना अर्थ असतो. पण या जीवनाकडे समजूतदारपणाने पाहिले पाहिजे असेही त्यांना वाटू लागते.

'कुठून येते इतकी समजूत या झाडांना
गळतानाही सगळी पाने आसू नाही...'
'काहीच झाले नाही...
मात्र झाली आहेत
डोळ्यांखालची वर्तुळे
समजूतदार :
पाऊस कोसळून थाम्बल्यानन्तरच्या
काळोखासारखी
खोल...सुजाण...

परीटघडीच्या गुळगुळीत, मिथ्या, धूर्त, रूढ जीवनातही 'अस्सल लागलेल्या पंचमा-सारखे उंच हिरवे झाड' पाडगावकरांना दिसते हा त्यांच्या व्यक्तित्वाचा विशेष. त्यांचा हा मन:प्रवास या संग्रहात स्पष्टपणाने दिसतो.

अनेक नावीन्यपूर्ण, सुंदर प्रतिमा पाडगाव-करांच्या लेखनात वारंवार अवतरतात; पण त्यावरोबर असेही वाटू लागते की आपला अनुभव प्रतिमांच्या — विशेषत: निसर्ग-प्रतिमांच्या — द्वारे घेण्याची त्यांच्या मनाला सवयच लागलेली आहे. प्रणयाचे काही अनुभव अशा निसर्गप्रतिमांच्या द्वारे काही ठिकाणी त्यांनी प्रभावी सूचकतेने प्रकट केले आहेत हे खरे, पण कित्येक ठिकाणी त्यांच्या प्रतिमांची समर्पकता आणि आवश्यकता पटत नाही. प्रतिमांचा केवळ अतिरेक होतो आहे आणि त्यामुळे मूळ अनुभूती अस्पष्ट होते आहे, गुदमरून जाते आहे असेही काही वेळा वाटू लागते; अशा ठिकाणी कवी कळत-नकळत प्रतिमांचे दास्य करतो आहे असा अनुभव येतो एवढीच केवळ या 'उत्सवा'तील उणीव.

पाडगावकरांचे अनुभव एकप्रकारच्या तरळत्या गतीत उमटत राहतात, तर वसन्त वापटांची अनुभूती ठाम पावले टाकीत निश्चितपणाने प्रकट होत राहते. त्यांच्या विविध विशेषांच्या दाही दिशाच त्यांच्या या अकराव्या दिशेत समाविष्ट झालेल्या आहेत. वापटांचे काही विशेष ठरलेले आहेत. एक प्रकारच्या नाट्यपूर्ण अभिनिवेशाने व्यक्त होणारा प्रणयभाव हा त्यातला एक महत्त्वाचा विशेष होय. वापटांनी निर्माण केलेल्या प्रियकराच्या व्यक्तित्वाची घडणच अशी आहे की, त्यातून नाट्य जन्माला यावे. 'भानावर असूनही भानावर नसल्याचे' त्याला सहज भासविता येते. त्याचे डोळे हुषार, सावध आहेत, त्याचे पाऊल मोजून पडते, एका इशाऱ्याने ज्याला सर्व गूजे जाणता येतात असा तो शहाणा आहे. तरीही प्रसंगी त्याला वेड पांघरता येते. विषकन्येला 'कण्ठ जाळत्या विन्दूसाठी' अधीर झाला आहे चातक' असे आव्हान तो सहज देऊ शकतो. जीवनातील जिद्द भोगण्याची ईर्षा त्याच्या अंत:करणात जागी असते. त्याच्या ठिकाणी आर्त हळवेपणा आहे, नाही असे नाही; पण त्याहून अधिक आहे काहीसा बाणलेला आणि काहीसा आणलेला एक

अभिमानी तटस्थपणा. यातूनच नाट्य जन्माला येते. 'क्षणभर या सौधावर', 'प्रवास' यांसारख्या 'फुंकर'शी नाते सांगणाऱ्या कविता त्यांतूनच निर्माण होतात. इतरही प्रेमकवितांवर या व्यक्तित्वाचा ठसा आहेच.

खुद्द वापटांच्या व्यक्तिमत्त्वात बहुरंगीपणा आहे. त्यामुळे कधी ते 'पन्थशून्य यात्रिकां'च्या भूमिकेंत शिरतात आणि अनादि देठाच्या ओङ्कारकमळाचा शोध घेऊ लागतात, तर कधी 'झेलमच्या वागेत – दुनिया गेली जहन्नममध्ये' म्हणण्याचा बेफिकीर कलंदरपणा करू लागतात. जीवनाच्या आनंदाचा आस्वाद नाना भूमिकांच्या द्वारे घेत राहावा हा त्यांचा स्वभावधर्मच आहे.

निवेदनाच्या नाना तऱ्हा वापटांनी आत्मसात केल्या आहेत. 'हिमालया'सारखी दीर्घ कविता, लावण्या, संगीतिका, स्वैर-गद्य, हे सारे प्रकार त्यांनी हाताळले आहेत. त्या त्या प्रसंगांच्या नेमक्या वर्णनांची त्यांची हौस इतकी अनावर आहे की कधी कधी ते त्या वर्णनातच गुंग होऊन जातात; ही वर्णने अनुप्रासांनी नटविण्याचा मोहही त्यांना पुष्कळदा होतो.

उदा० 'बोरीच्या चिम्बट चवीने चावट उन्मनी वारा'

'ही हिमालयाची उमा अनुपमा सुमापरी कोमला'.

संस्कृतच्या अभ्यासाचा परिणाम त्यांच्या शब्दकळेवर (आणि क्वचित 'उर्वशी म्हणाली पुरूरव्याला', किंवा 'उमा' यासारख्या विषयांवरही) झालेला दिसतो. इतके असूनही त्यांच्या शैलीला आपला एक खास ठसका आहे. आणि वापटांचा नाट्यपूर्ण आविष्कार सहज प्रकट करण्याचे कसब तिला साधलेले आहे.

पद्यांची 'स्वप्नजा' खरोखरच स्वप्नातून जन्मलेली आहे.

'अठराच्या अलिकडचे
किंचितसे पलिकडचे
स्वप्ने नव बघणारे
उध्वस्तहि करणारे
तरणारे, बुडणारे
अतिचंचल माझेपण.'

तिच्या ओळींओळीतून उमटते आहे. हे मन 'वांछित स्वप्नांभोवती' न कळताच रेशमी पाश विणणारे आहे. 'मोगरिच्या गन्धातुन' 'सनईच्या स्वरवलयीं' जा-ये करणारे आहे. त्याच्या 'मार्गात स्वप्नांचे ससे कान उभारून टकमकत असतात' अशी ही 'स्वप्नमूल' शब्दात गुंफण्याची आणि त्यातच भवतीचे वास्तव विसरून जाण्याची या मनाची उत्कट इच्छा आहे.

'शब्दातच भवतीचे
विसरू बघसी वास्तव'

यांपैकी बहुसंख्य स्वप्ने प्रणयाच्या भावनेला बिलगून बसलेली आहेत. अनेक स्वप्नसुंदर प्रेमकवितांतून प्रणयाच्या विविध छटा रेखीवपणाने उमटल्या आहेत. प्रणयाची तद्रूपता, प्रणयी नजरेचे सामर्थ्य, केवळ दर्शनानेही आलेले बधीरपण, मीलनाची उत्सुकता, मीलनघटीच्याही वेळी छळत राहणारी शंकाकुलता, भर दिवसा दिसणारे अलौकिक रात्रीचे स्वप्न यांसारख्या भावच्छटा तल्लीनतेने अनेक कवितांतून उमटलेल्या आहेत. त्यांतच मधूनमधून 'हे नव्हते मज बोलायाचे' या कवितेतल्यासारखा प्रत्यक्षातला अनुभवही उमटतो. पण अशा अपवादामुळे त्या स्वप्नसौंदर्याला अधिकच गहिरेपणा येतो.

काही कवितांतून दुःखाची ओढही व्यक्त झालेली आहे. दुःखाच्या संगतीशिवाय आपले पाऊल दुबळे होईल असा भाव एक ठिकाणी व्यक्त केलेला आहे, तर दुसरीकडे वामनाच्या पावलांनी दुःख घरी आल्याचा

आनंदोत्सव वर्णन करून दाखविला आहे. हे मन विसाव्यासाठी पाठमोरे वळून दुःखाकडेच जाते. 'दुःख हवे' या कवितेत या दुःखाचे स्वरूप विशाल असावे अशी मागणी केली आहे.

'दुःख हवे गरुडाचे गर्वोद्धत
मातेच्या मुक्तिस्तव
आणिल जे जगि अमृत ....
दुःख हवे हे असले
सञ्जीवक अन् समर्थ.'

दुःखाबद्दलची ही ओढही 'स्वप्नभुली'ला जवळ असलेल्या 'Romanticism'चेच एक अंग होय. हळव्या मनाला समतोल सहसा आवडत नाही. त्याला कोणत्यातरी टोकावर जाऊन भावनांचा आत्यंतिक अनुभव घ्यावा असे वाटत राहते. प्रणयाची असीम तृप्ती, प्रणयाची तल्लीनता, हे जसे एक टोक, तसेच दुःखाबद्दलची आसक्ती हे दुसरे विरोधी टोक!

Romanticism मधून एक प्रकारच्या निगूढतेची ओढही निर्माण होते. अलौकिकाच्या—अप्राप्याच्या ध्यासातून येणाऱ्या सूक्ष्म अनुभूती ही निगूढता निर्माण करीत असतात. आणि तरीही त्यात एक प्रकारच्या अद्‌भुत सौंदर्याची भुलावण मिसळलेली असते. 'आठवते आठवते', 'क्षणाक्षणाला जन्म हवा', 'रिता घट सखे भरला ग' यांसारख्या पद्यांच्या कवितांत अशी गूढ रमणीय अद्‌भुतता आल्यासारखी वाटते.

मात्र कधीतरी त्यांच्याही मनाला—
'स्वप्ने सारीच विरती
ठरे खोटाच फुलोरा'

हा कठोर अनुभवही येतोच. अशा वेळी प्रत्यक्ष दुःखाचे तीव्र स्वरूप त्यांना जाणवू लागते. हे प्रत्यक्षातले दुःख जिवाचा कसा निष्ठुर छळ करते ते 'दुःख असे हे' या कवितेत तीव्रतेने उमटलेले आहे. येथे मात्र 'असेच जीवन जगावयाची, का ही शिक्षा जगास अगतिक?' असा प्रश्न विचारलेला आहे.

पद्यांची रचना रेखीव, लालित्यपूर्ण असते. रुचिर कलात्मक अभिरुचीचा विलास ठायी ठायी आढळतो. क्वचित या शैलीला हळव्या, गोड, सुंदर शब्दांचा अतिरेक करण्याचा मोह होतो. आणि कधी कधी तर आशयाची छटा इवलीच असतानाही या शब्दांची गौर मात्र विस्ताराने मांडली जाते.

'आरती प्रभु' यांची 'दिवेलागण' सर्वार्थांनी अत्याधुनिक कवितेच्या जाणिवांनी युक्त आहे असे वाटते. यांपैकी बऱ्याच कविता चाचपडत वाचाव्या लागतात; तरीही त्यात पुष्कळदा अपयशच येते. आणि म्हणूनच या संग्रहाबद्दल काहीही निश्चितपणे बोलणे अवघड होते.

या कविमनात जीवनाबद्दलची संपूर्ण अश्रद्धा आणि कटुता साकळलेली दिसते. माणूस हा केवळ 'इंद्रियांचा इंद्र' आहे, त्याचे मन म्हणजे एक कोळ्याचे जाळे आहे, तो केवळ 'त्वचेचे जन्म' घेत असतो, 'शेणाच्या घरात मेणाची बाहुली' या माणसाचा संसार होय.

'बाप-मुले लेकी-सुना घरे-दारे
नसेल खोटे सारे
याहून पण खरे
पाठमोरे वारे......

'यात कोठे प्रश्न आत्म्याच्या व्रताचा?'; 'माणसाचे पुच्छ गळले असले' तरी त्याच्या मनाच्या गुहेत काळोखच काळोख आहे, आपण 'उद्याचे आज अस्तंगत' आहोत, जीवनाचे हे सोंग कसेतरी पार पाडणे एवढेच केवळ आपल्याला करता येण्यासारखे आहे, असे एकंदर आरती प्रभूंच्या अनुभूतीचे स्वरूप असावे.

'पाणी', 'शुभ्र रुमाल, इवला', 'पान पडताच', 'पाडवा', यांसारख्या काही कवि-

तांत नितळ अनुभूती प्रकट करणारे मन इतर अनेक कवितांत अतिशय संमिश्र आणि संकीर्ण स्वरूपात व्यक्त होते. आणि त्यामुळे त्या कवितांचा एकसन्ध परिणाम वाचकांच्या मनावर उमटत नाही. याला काही कारणे असावीत. मनात उमटलेल्या संवेदनातल्या काही केवळ इथल्या–तिथल्या संवेदनाच कवितेत टिपल्या जातात, त्यातले काही महत्त्वाचे दुवे सुटले जातात, हे सुटलेले दुवे जाणत्या वाचकांच्याही टप्प्यापलीकडचे असू शकतात. काही वेळा संपूर्ण संवेदनांचे सलग चित्त मनात उभे राहण्यापूर्वीच कवितेचे लेखन होत असावे.

या कवितांत मधूनमधून अनेक अश्लील उल्लेखही येतात. ते कलात्मक अपरिहार्यतेतूनच आलेले आहेत अशी खात्री पटत नाही. त्यातच 'तम्बूपरी बोम्ब ठोकूनी निघालो' अशा विक्षिप्त कल्पना मधूनमधून येत राहतात, आणि या साऱ्याच मुळे – आरती प्रभूंची काव्यात्मकता पटत राहूनही – त्यांची कविता मात्र अनाकलनीय होते आणि अखेर त्यांच्याच शब्दांत बोलायचे म्हणजे 'माणूस म्हणजे काय नक्की ते नव्हते कळले' असेच आपल्याला त्यांच्याविषयीच वाटू लागते.

मराठवाड्यांतील एक कवी शिवाजी गऊळकर, यांचा 'अपर्णा' हा संग्रहही जीवनाचा कटु अनुभव जहरी कडवटपणाने व्यक्त करणारा, मानवी संस्कृतीचा प्रच्छन्न अधिक्षेप करणारा आणि जीवनाला वैफल्याची गाथा मानणारा आहे. या दृष्टीने त्यांची मनोवृत्ती आरती प्रभूंच्या बऱ्याच जवळ जाणारी आहे. त्यांची कविता अजून तयार होत आहे. प्रस्तावनाकार म्हणतात त्याप्रमाणे "आजच्या नवकवींतील अतिरथी महारथींच्या चाकांचा वण गऊळकरांच्या कवितेवर उमटलेला दिसत आहे." त्यांच्या कवितेत विकासाच्या सामर्थ्याची क्षमता आहे हे निश्चित. आज मात्र ती बऱ्याच अपक्व आणि ओबडधोबड स्वरूपात व्यक्त झालेली दिसते.

मराठी कवितेत झालेल्या आंदोलनांची यत्किंचितही दखल न घेता आपल्याच गतीत स्वतंत्रपणे पावले टाकीत जाणारी वा. ना. देशपांडे यांची कविता 'पिकासोचे कबुतर' या त्यांच्या संग्रहात एकत्रित केली गेली आहे. १९२० ते १९६० या दीर्घ कालावधीतील या कविता आहेत. प्राचीन आणि अर्वाचीन संस्कृतीतील अनेक संदर्भ वा. ना देशपांडे यांच्या कवितेत स्वाभाविकपणानेच उमटतात तसे ते येथेही उमटलेले आहेत. त्यांत मदुरेचा राजा 'नेदुमारन्' याने केलेल्या जैनांच्या अमानुष संहाराची कहाणी आहे. मातरिश्वा आणि ऋभु यांचा ऋग्वेदातील संदर्भ आहे, सुफी मनाचा उल्लेख आहे, पिकासोचे कबुतर आहे, प्लेटोची गुहा आहे, रोमचा पोप सेन्ट ग्रेगरी आहे, जानश्रुति आणि रैक्व यांची कथा आहे. या विविध संदर्भांनी देशपांड्यांच्या काव्यात एकप्रकारचा वेगळेपणा येतो. पण केवळ अशा वेगळेपणाने कवितेला श्रेष्ठत्व येतेच असे नाही.

त्यांच्याच 'आराधने'तील 'कपटवेपा'त हा वेगळेपणा रसात्मकता आणि नाट्यात्मकता यांनी युक्त होऊन उमटला आहे. तसा अनुभव यांपैकी फार थोड्या कवितांत येतो. वस्तुतः 'बलिदान' या कवितेत रसोत्कटता यायला कितीतरी वाव होता. 'नेदुमारन्'ची नावीन्यपूर्ण कथा आणि भावनेची उत्कटता यांचा संगम घडता तर या कवितेचे यश कितीतरी उंचावले असते. पण 'आराधना'कारांचे संयत उत्कटपण आणि लालित्य या संग्रहात जवळजवळ दुर्मीळच झालेले आहे. 'वंचना', 'तोरणाखालून' या कवितांत त्याची थोडीफार चाहूल लागते इतकेच; याच्या उलट 'अग्निमंदिर', 'झाडांचे गाणे', 'भिंती', 'धीरू धोबी' यांसारख्या कितीतरी कविता केवळ गद्यप्राय उतरल्या आहेत. वस्तुतः

'सौंदर्यप्रतीतीची लालसा मानसीची
प्रेरणा नित्य देते जीवन जगण्याची'

अशीच वा. ना. देशपांडे यांची श्रद्धा आहे. पण ही सौंदर्यप्रतीती या संग्रहात मात्र क्षीणपणानेच उमटली आहे, असे म्हणणे भाग आहे.

श्री. गं. रा. पाठक यांचे 'शक्ति-केतु' हे खण्ड-काव्य भीम आणि त्याला नागकन्येपासून झालेला त्याचा पुत्र शक्ति-केतु यांच्यात परस्परांची ओळख पटलेली नसताना योगायोगाने झालेल्या युद्धाच्या पौराणिक कथेवर उभारलेले आहे. मूळ कथेतच विविध रसांना वाव आहे. त्यातच कवीने आवश्यक ते फेरबदल करून वीर, करुण आणि शान्त रसाचा त्यातून आविष्कार केलेला आहे. कथानकाची रचना नाटयपूर्ण आहे. परिचित व्यक्तिरेखांतही काही नवे रंग त्यांनी जाणीवपूर्वक भरलेले आहेत. रचनेत अधिक लालित्य आले असते तर या काव्याची वाचनीयता अधिकच वाढली असती. आहे या स्थितीतही एक वेगळया प्रकारची यशस्वी रचना म्हणूनच तिचा उल्लेख करावा लागेल.

यंदाच्या मराठी कवितेच्या स्वरूपाचा संकलित विचार करताना काही प्रश्न पुढे उभे राहतात, काही निष्कर्ष हाती लागतात ते असे :

(१) काही मातवर कवींच्या लेखनाचे परस्परांवर परिणाम झाल्यासारखे दिसतात. उदा०

१ 'स्वप्न दिवसाच्या डोळा
तरळते चांदण्याचे,'

२ 'महात्माजींची जखमी सायंप्रार्थना
प्राणाहूनही मोठी होऊन,'

'गिरी निळे स्तनाकार,'

या कांतांच्या ओळी अनुक्रमे इन्दिरा आणि विन्दा करन्दीकर यांची आठवण करून देतात.

वापटांची 'रात्र — झेलमच्या बागेत' ही सबंध कविता अखेरच्या दोन ओळी वगळल्या तर बोरकरांनी लिहिल्यासारखी वाटते.

'थण्ड बदामी ऐपारामी मत्त मोगली
रात्र
जिथल्या तेथे झिंगत झुलते अमली
झेलमपात्र
अवघे अम्बर झाले झुम्बर अत्तर—गन्धित
तारे,
गीत इराणी गाती कोणी धुन्द अफीमी
वारे'

वापटांचीच 'राधा' ही कविता पु. शि. रेगे यांच्या धाटणीने लिहिल्यासारखी वाटते.

'अनयाच्या घरात
विभिस्त राधा......
पडून राहिली
निद्रिस्त गोपाच्या
निष्ठुर करांत......'

पाडगावकरांची 'रात्र' ही कविताही थेट रेगे यांच्याच शैलीत उतरली आहे.

'रात्र :
तीव्र जळण्याची
रात्र :
तृप्त विझण्याची
हळवी
आभाळाची
आर्जवी
भुङ्कमळाची
आणि मुक्या कळशीतून
खळखळ जळ भरण्याची
रात्र :
सर्व घेणारी
रात्र :
सर्व देणारी

(२) नव-काव्याने निर्माण केलेले काही संस्कार आज मराठी कवितेत स्थिर झालेले दिसतात. अनुभव घेण्याची पद्धती आणि अविष्काराचे स्वरूप या दोन्हींतील सांकेतिकता

नवकाव्याने मोडून टाकली. या दोन्हीही बाबतीत नव्या कवितेत विशेष सूक्ष्मता आणि सूचकता आलेली दिसते. जेथे या दोन्हींचाही अतिरेक होईल तेथे क्लिष्टता येणे अपरिहार्य आहे. पण एरवी मात्र यामुळे मराठी कवितेला ध्वनि-कारांच्या जुन्या भाषेत बोलायचे तर 'रमणीच्या लावण्यातला' वर्णनापलीकडचा आगळेपणा आला आहे.

नव्या कवितेच्या आविष्कारातला वेगळेपणा इतका प्रभावी ठरला आहे की, यशवन्त, कुसुमाग्रज, कान्त यांच्यासारख्यांवरही त्याने आपला पगडा बसविला. मग ज्यांच्य' कवितेचे स्वरूप अजून निश्चित ठरावयाचे आहे अशा नवोदितांच्या लेखनात त्याची लकब उमटावी हे स्वाभाविकच.

(३) बरीचशी नव्या धर्तीची कविता प्रतिमांमुळेच निर्माण झाल्यासारखी वाटते. खुद्द कवीचीच अशी फसवणूक होणे—होत असल्यास—चिन्त्य आहे. अखेर प्रतिमा हेही माध्यमच आहे, काव्य नव्हे हे ध्यानी यायला हवे.

(४) नवे नवे प्रयोग होत राहणे हे अर्थातच जिवंतपणाचे लक्षण आहे, पण त्याचा अट्टाहास करावा असे नाही. आणखी एक विचार असा की, केवळ नवा प्रयोग केला, या कल्पनेवर त्या त्या कृतीचे श्रेष्ठ-कनिष्ठपण ठरविणे अनिष्ट होईल. प्रयोगशीलता हे काव्याचे मूल्य नव्हे.

(५) कविता ही अखेर अनुभूती असते हे विसरून चालणार नाही. काही कविता बौद्धिक कसरतीतच कृतार्थ झाल्यासारख्या वाटतात. जेथे कसरत नसते तेथेही काही वेळा केवळ बुद्धिगम्य परिणामच मागे शिल्लक उरतो. याच्या इष्टानिष्टत्वाची चिकित्सा व्हायला हवी.

(६) आजच्या काही लोकप्रिय कवींच्या कवितांत एक प्रकारचे श्रवण—मूल्य असल्यासारखे वाटते. म्हणजे असे की, काव्यगायनाच्या मैफली हुकमी रंगतील अशी कविता लिहिण्याकडे त्यांचा कल झुकतो. श्रोत्यांच्या आवडीनिवडीशी अशा ठिकाणी कळत—नकळत तडजोड केली जाते; आणि मग कधी तेथे काव्याचा केवळ भासच निर्माण होतो.

(७) छंदोरचनेच्या शुद्धतेकडेही अनेकवार दुर्लक्ष होते. छन्दाचे माध्यम एकदा स्वीकारल्यावर त्याची बन्धनेही स्वीकारायला हवीतच. मर्ढेकरांच्या बंडखोरीने छंदाचा दुस्वास केलेला नाही हे येथे ध्यानी घेण्यासारखे आहे. [1]



१ नित्यश: मासिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या काव्याचा परामर्श घेणे हा एक स्वतंत्र अभ्यासाचा आणि लेखाचा विषय होईल. त्याचा समावेश या परीक्षणात केलेला नाही.



# लघुकथा

प्रा. भीमराव बळवंत कुलकर्णी

१९६२ हे वर्ष कथावाङ्मयाच्या दृष्टीने समीक्षकाला फारच महत्त्वाचे ठरते, कारण गेल्या पंधरा-वीस वर्षांत मराठी कथालेखनाच्या क्षेत्रात आघाडीवर असलेल्या बहुतेक सर्व कथाकारांचे संग्रह या वर्षी प्रसिद्ध झालेले दिसून येतात. 'पुनर्मुद्रण, निवडक कथा' या निमित्ताने एकसष्ट-बासष्ट साली फडके, खांडेकर, य. गो. जोशी, वामन चोरघडे, चिं. वि. जोशी, अनंत काणेकर, शामराव ओक, दत्त रघुनाथ कवठेकर, अरविंद गोखले इत्यादींचे कथावाङ्मय जसे पुनर्मुद्रित झाले आहे, त्याचप्रमाणे गेली कित्येक वर्षे थोडेच परंतु मोजके लेखन करणाऱ्या विद्याधर पुंडलिक, कमल देसाई, प्र. वा. वडेर, शंकर वैद्य, वसंत वैद्य इत्यादिकांचे पहिले वहिले कथासंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. तसेच मराठी कथावाङ्मयाचा विचार करताना अपरिहार्यपणे ज्यांचा उल्लेख करावा लागतो, असे ग. दि. माडगूळकर, व्यंकटेश माडगळकर, दि. बा. मोकाशी, शांताराम, शंकर पाटील, द. मा. मिरासदार, शंकरराव खरात वगैरेसारखे आजचे प्रसिद्ध लेखकही आहेत. म्हणजेच या वर्षाच्या कथांचा विचार करताना गेल्या पंधरा-वीस वर्षांतील एकंदर मराठी कथेचा विचार करावा लागतो. गंगाधर गाडगीळांचा १९६१ मधला संग्रह जोडीला घेतला की गेल्या कित्येक वर्षांतील मराठी कथांच्या बाबतीत कितीतरी स्पष्टपणे विचार करता येतो.

नवी-जुनी कथा हे वाटप आता बरेचसे थंडावले आहे. नव्यांच्या जाणूनबुजून कथेतील कथेकडे दुर्लक्ष करण्याचा खटाटोपही कमी झाला असून झकासपैकी 'गोष्ट' लिहावी असे त्यांनाही वाटू लागले आहे. नव्यांना 'अश्लील, दुर्बोध' वगैरे संबोधण्याची टूम अधूनमधून डोके वर काढीत असली तरी वाचकांचे तिकडे फारसे लक्ष राहिलेले नाही आणि नव्यांनीही आपली कथा स्थिर झाल्याबद्दल समाधान मानावयास सुरुवात केली आहे. खरी गोष्ट अशी आहे की, वाचकांची नवनव्या कथांबद्दलची भूक दिवसेंदिवस वाढत आहे आणि रहस्यकथा, युद्धकथा, भयकथा, विस्मय-कथा, दंतकथा, लोककथा, शास्त्रीयकथा-वगैरेसारख्या प्रकारांनी अजून चांगले मूळ न धरल्याने वाचकांचे लक्ष आघाडीवरच्या नव्या-जुन्या कथाकारांकडेच मोठ्या प्रमाणात आहे. हव्या तितक्या मोठ्या प्रमाणात कथा पुरविण्याची उभारीही आता ओसरली आहे आणि त्यामुळे फारशी निवड न करताच कथासंग्रह भराभर निघत आहेत; जुन्या-नव्यांच्या चांगल्या कथा मोठ्या प्रमाणात पुनर्मुद्रित होत आहेत.

मला वाटते, यापुढे प्रत्येक वर्षी वार्षिक कथासमीक्षकाला, 'या वर्षी कथालेखनाने गेल्या कित्येक वर्षांचा उच्चांक मोडला' असे हमखासपणे लिहावे लागणार, इतक्या मोठ्या प्रमाणात कथावाङ्मयाची निपज ही वाढत्या प्रमाणात राहणार आहे. कारण कथा या वाङ्मयप्रकारातच ती अधिकाधिक लोकाभिमुख होण्याची जशी चिन्हे आहेत, तसेच इतर कुठल्याही वाङ्मयप्रकारापेक्षा तिच्यामध्ये उत्कटता, वास्तविकता, सहजता इत्यादि गोष्टींची मानवी प्रेरणेला चटकन आवाहन ठरणारी विकासोन्मुख बीजे आहेत. कथावाङ्मयाकडे कादंबरीच्या मानाने दुय्यमपणा येत असला तरी वाङ्मयीन दृष्टया कथा ही कादंबरीपेक्षा अधिक निकोप, निर्दोष आणि उत्कट असा वाङ्मयप्रकार आहे आणि

त्यामुळे यापुढे कादंबरीपेक्षा कथांची निपज व उपज कितीतरी वाढत जाणार हे निश्चित आहे. गेल्या काही वर्षांत प्रसिद्ध होत असलेल्या कादंबऱ्या या खऱ्या अर्थाने दीर्घ 'लघुकथा 'च आहेत, आणि — आणि नाटकेसुद्धा. त्यांचे अंतरंग तपासल्यास नाट्यगुणांचा अभाव असलेल्या दीर्घ व संवादमय लघुकथा हेच त्यांचे स्वरूप असल्याचे दिसून येईल.

१९६२ सालातील कथावाङ्मय संख्येने विपुल आहे याला आणखीही काही महत्त्वाची कारणे असू शकतील. त्यांतील सगळ्यांत महत्त्वाचे कारण म्हणजे गेल्या काही वर्षांत दिवाळी अंकांची व नियतकालिकांच्या विशेषांकांची झालेली बेसुमार वाढ होय. ही वाढ सुद्धा महाराष्ट्राच्या स्वतंत्र वैशिष्ट्याची निदर्शक अशीच आहे. लोकसंख्या आणि साक्षरता यांचे प्रमाण लक्षात घेतल्यास महाराष्ट्रात दिवाळी अंकांच्या निमित्ताने मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रात लेखन, प्रकाशन, विक्री व वाचन यांची जी एक अतिशय कौतुकास्पद व उत्साहवर्धक घालमेल होते ती अभूतपूर्व व पाश्चात्य राष्ट्रांतील या प्रकारच्या घालमेलीपेक्षा काहीशी मोठीच ठरेल.

या विशेषांकाचा विचार करताना कितीतरी महत्त्वाच्या गोष्टी लक्षात येतात. त्यामुळे निर्माण होणारी स्पर्धा ही निकोप नसते. मोठ्या प्रमाणात सामान्य लेखकापासून तो प्रथितयश लेखकापर्यंत या निमित्ताने जे आवाहन मिळते ते 'आवाहन' न होता 'आव्हान' बनते आणि मध्यम प्रतीच्या चतुर लेखकांना त्यांतून अर्थप्राप्तीच्या दृष्टीने काही आडाख्यानुसार सामान्य प्रतीचे लेखन करावे लागते. त्याचा परिणाम तात्काळ दिसून येतो. ज्यांच्या लेखनगुणांचा विकास व्हावा, अशी ज्या उदयोन्मुख लेखकांच्या बाबतीत अपेक्षा असते (आणि निष्ठेने लेखन करणाऱ्या लेखकांच्या बाबतीत त्यांचा विकास निश्चितच होतो) ते लेखक फार लवकर 'तयार' होतात. पक्वतेला येण्यापूर्वीच त्यांचा ऱ्हास सुरू होतो. केवळ दोन-तीन वर्षांतच हे लेखक संपतात आणि त्यानंतर त्यांचे कथालेखन म्हणजे निव्वळ 'दळण' राहते.

हे चक्र एवढ्यावरच संपत नाही. प्रत्येक लेखकाकडे प्रतिभाधर्म व परिश्रम यांच्या कलात्मक योजनेनुसार काही मौलिक निर्माण करण्याची जी एक सुप्त शक्ती असते, ती अकालीच मारली जाते आणि जे आपल्या निष्ठेशी प्रामाणिक राहून लेखन करण्याचा प्रयत्न करतात, त्यांचे दृश्य लेखन संख्येने कमी पडत असल्याने आपण या स्पर्धेत मागे पडणार, अशी धास्ती तो घेतो, आणि मग इतरांच्या बरोबर राहण्याच्या घोडदौडीमुळे त्याच्यावर भलता ताण पडल्याने तोही संपत आल्यासारखा वाटतो आणि अचानक त्याचे कथालेखनच बंद होते. तिसरा एक लेखकांचा वर्ग असतो. हा लेखक मागणीप्रमाणे पुरवठा करतो, परंतु तरीही आपल्या एकंदर कथालेखनामध्ये फारसा उणे — अधिकपणा येऊ देत नाही. त्याच्या काही कथा काहीशा खाली उतरतात, परंतु बऱ्याचशा कथा त्याच्या एकंदर कथालेखनाच्या तोडीच्या असतात.

या प्रकारच्या स्पर्धेकडे संपूर्ण कानाडोळा करणारा फार मोठा लेखक बासष्टात तरी दिसत नाही, त्यामुळे त्याच्याबद्दल चर्चा करण्याचे काही कारण नाही.

बासष्ट सालच्या कथावाङ्मयाचे समीक्षण करताना वरील घटनेमुळे ज्या ज्या गोष्टी घडण्याची शक्यता होती, त्याचे सर्व प्रकार दृष्टीस पडत असल्यामुळे एकंदर कथालेखन व कथालेखक यांच्या वृत्ती — प्रवृत्ती लक्षात घेतल्यानेच त्याचे स्वरूप लक्षात येऊ शकेल. ह्या प्रवृत्तीचा विचार करताना मी मुद्दामच कथाकार व त्यांचे कथालेखन यांना 'लेबले' लावणार आहे आणि काही ठिकाणी मुद्दाम तुलना करण्याचा खटाटोप करणार आहे.

अनुक्रमणिका

मराठी लेखक व प्रकाशक यांच्याबद्दल महत्त्वाचे वैशिष्टय म्हणून त्यांना धंदा जमत नाही, असे आतापर्यंत अट्टाहासाने सांगण्यात येत असे, परंतु मराठी कथावाङ्मयात मात्र या दोघांनीही बराच 'धंदा' आणला आहे. निव्वळ धंदेवाईक दृष्टी ठेवून अभिरुची सुटलेले वाङ्मय प्रकाशित करण्यासाठी म्हणून ११६१–६२ साली मोठ्या प्रमाणात मासिके व नियतकालिके उदयाला आलेली दिसतात. त्यांची पोरे-पोट्टे व पोरीवाळीप्रियता पाहून काही चांगली नियतकालिकेही त्याचप्रकारचे वाङ्मय देऊन आपल्या नियतकालिकेचा आर्थिक दर्जा संभाळण्यासाठी प्रयत्न करताना दिसून येतात. त्याचा परिणाम म्हणजे खरोखर कथावाङ्मय म्हणून ज्याचा विचार करू नये अशा रीतीच्या विपुल, अभिरुचिहीन कथा मोठ्या प्रमाणात मराठी भाषेत येऊ लागलेल्या आहेत. अशा कथांचा पाश्चात्य राष्ट्रांतील वाङ्मय समीक्षणामध्ये सहसा विचार केला जात नाही, कारण अशा प्रकारची हीन अभिरुचीची नियतकालिके ज्या कथा प्रसिद्ध करतात, त्या कथांना वाङ्मयीन दर्जा नसतो आणि केवळ त्याच त्याच गोष्टी चघळून, पाणसटून लिहिणारे सामान्य (अति) लेखक या कथा लिहितात. मराठीत चांगल्या लेखकांचा मोठा वर्ग या कथेच्या नादी लागलेला असल्यामुळे तिच्याबद्दल नाइलाज म्हणूनच विचार करावा लागतो.

शृंगारकथांची निपज इतर कुठल्याही कथांपेक्षा नेहमीच अधिक असते, परंतु हा शृंगार निरोगी असावा लागतो. श्लीलाश्लीलतेच्या सीमारेषा वाङ्मयाच्या दृष्टीने इतक्या नाजूक असतात की त्यांचे फार काटेकोर भान लेखकाला असावे लागते. मराठी प्रसिद्ध होत असलेल्या बहुसंख्य कथांमध्ये ह्या दोन्ही गोष्टींचा संपूर्ण अभाव दिसतो. शृंगारकथा मोठ्या प्रमाणात लिहिणे म्हणजे धीटपणे लिहिणे हा युक्तिवाद तर अतिशय पोकळ आहे, कारण वर सांगितल्याप्रमाणे अश्लील कथा लिहिण्यासाठी लेखक लागत नाहीत. त्याना आपण 'लेखनिक' म्हणू या. कलात्मक शृंगारकथा लिहिण्यासाठीच लेखक लागतो आणि त्याच्यावरची जबाबदारीही फार मोठी असते. अर्थात नीति-अनीतीच्या दृष्टीने ही जबाबदारी नसते, तर ती कलेच्या दृष्टीने असते. ही जबाबदारी सांभाळून धीट कथा लिहिणारा एकमेव लेखक म्हणून मराठीत स. आ. जोगळेकरांच्याकडे बोट दाखविता येईल. या पीठाचे शंकराचार्य म्हणून ज्या ना. सी. फडक्यांचा उल्लेख केला जातो, त्यांच्या कथांचा विचार केल्यास कित्येक ठिकाणी त्यांच्या कथांतून कलात्मकतेचा अभाव आढळतो. 'बावनकशी' हा त्यांच्या निवडक प्रातिनिधिक कथांचा संग्रह आहे. तर 'प्रेम पहावे करून' हा त्यांचा बासष्ट सालचा नवा संग्रह आहे. बावनकशी या संग्रहामध्ये निवडक व आकर्षक अशा कथा एकत्रित केल्यामुळे त्या चांगल्या वाटतात. भरघोस कथानक, कौशल्यपूर्ण निवेदनशैली हेच त्यांच्या चांगुलपणाचे विशेष. उलट 'प्रेम पहावे करून' मध्ये भरपूर पाल्हाळ, जे सांगावयाचे ते फारसे शृंगारिक नसलेले, परंतु एखाद्या सत्तरीतल्या रसिक वृद्धाने आपले वय व जबाबदारी विसरून आसपासच्या टारगट पोरांना डोळे मिचकावीत काहीवाही सांगावे व पोरांनी आग्रह कर-करून त्याला तसलेच काहीतरी सांगावयास प्रवृत्त करावे व त्याने तसलेच पुन: पुन: नावे बदलून मिटक्या मारीत सांगावे, असाच प्रकार फार दिसतो. फडक्यांची ही गत तर कमलाबाईंची 'उस्से भी ज्यादा.' त्यांच्या या वर्षी प्रसिद्ध झालेल्या कथा एका सुविद्य 'लेखिके' ने लिहिल्या आहेत असे सांगूनही विश्वास पटत नाही, इतक्या त्या विकृत व रोगट मनोवृत्तीच्या आहेत. या नियतकालिकांतून नियमित लिहिणारे माधव कानिटकरसारखे

धीटपाठ लेखक यांची तर कलात्मकता लांबच राहो, परंतु धड आकर्षक, अश्लील कथाही लिहिता येत नाही अशातली गत दिसते.

ह्या 'धीटपाठ' कथेपेक्षा मराठीत लोकप्रियतेच्या दृष्टीने 'ग्रामीणकथा' आघाडीवर आहे. ह्या ग्रामीण कथेने मराठी वाचकाला चांगलेच चकविले आहे. कारण त्यातील बहुसंख्य कथा 'ग्रामीण' ह्या उपाधीस मुळीच पात्र नाहीत. त्यांतील वातावरण ग्रामीण नसून केवळ काही वाक्ये आणि ठराविक शब्द मात्र ग्रामीण आहेत. त्यातले वातावरण हे अरेबियन नाइट्समधले, किंवा बोकेसिओचे किंवा रेनॉल्ड्सच्या कथांतून लंडन शहरातील गुप्त कृत्ये छाप वातावरण आहे. विशेषत: मिरासदार पाटील यांच्या बहुसंख्य ग्रामीण कथा या ग्रामीण नसून 'भानगड किंवा लफडेबाज' कथा आहेत. त्यांच्या लोकप्रियतेचे रहस्य त्यातच सापडू शकेल. परंतु त्याचबरोबर त्यांचे वाङ्मयीन महत्त्व मात्र फारसे महत्त्वाचे ठरत नाही. माझ्याकडे एक मस्तपैकी लफडेबाज कथा आहे, या आविर्भावात ते केवळ चातुर्याने सांगणे होते. लफडे किती मोठे, तितकी कथा रंगतदार. एखाद्या सामान्य लेखकाकडे आपलाही एखादा महत्त्वाचा किस्सा असला की तो चार ग्रामीण वाक्ये योजून ती चांगली मसालेदार करू लागतो. प्रेमकथा किंवा शृंगारकथा लिहिण्यापेक्षा या लफडेबाज कथा लिहिणाऱ्या किस्सेकारांचा वर्ग वाढला आहे तो यामुळेच. अशा प्रकारचे चांगले किस्से लिहिणाऱ्या नवोदित लेखकांचा वर्ग म्हणून बाबा पाटील, रा. रं. बोराडे यांच्याकडे बोट दाखविण्यास हरकत नाही.

१९६२ साली पाटलांचा 'धिंड' व मिरासदारांचा 'स्पर्श' हे दोन कथासंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. मिरासदारांना आता आपल्या कथालेखनाबाबतीत ग्रामीण कथेची कुबडी महत्त्वाची नाहीत, याची जाणीव झालेली असावी, म्हणून ग्रामीण भाषेमध्ये अधिक ठसकेदार वठल्या असत्या अशा कथा सरळ त्यांनी नागरीत आणलेल्या आहेत. सबंध कथासंग्रहात ग्रामीण नसलेली आत्मानुभवाच्या बारकाव्यानी नटलेली 'स्पर्श' हीच एक कथा चांगल्यापैकी आहे. बाकी मिरासदारांचे कथालेखन 'दुबळे' ठरल्याचीच जाणीव हा कथासंग्रह देतो.

शंकर पाटील यांच्या कथालेखनाबाबतीत विचार करताना एक कल्पक व हुशार लेखक 'बावदूक' बनत असल्याची चिन्हे त्यांच्या कथा दाखवितात. कथाशयाला पुष्ट न करणारे बावदूक, परंतु चतुर संवाद हेच त्यांच्या कथांचे वैशिष्टय. शंकर पाटलांच्या कथा वाचताना आपल्या अंगच्या प्रभावी लेखनगुणांचा दुरुपयोग करणारा चतुर लेखक असे त्यांच्याबद्दल म्हणावेसे वाटते.

ग्रामीण जीवनांत आढळणाऱ्या काही व्यक्तींबद्दल अतिशय जाणीवपूर्वक लेखन करणारे ग्रामीण कथांचे अध्वर्यु म्हणून ज्यांचा उल्लेख केला जातो त्या व्यंकटेश माडगूळकरांचे कथालेखनही यंदा अतिशय निराशाजनक आहे. त्यांची कथा व्यक्तिचित्र व ग्रामीण परिसर यांखेरीज विशेष कुठे रंगत नाही. परंतु 'वाघाच्या मागावर' व 'वारी' या दोन्ही कथासंग्रहांतील बहुतेक कथा त्यांच्या नेहमीच्या वैशिष्टयांच्या बाबतीतही परिणामकारक उतरल्या नाहीत. त्यांतील कित्येक कथांमध्ये 'गोष्ट' असूनही त्या 'कथा' ठरत नाहीत, 'वारी' सारखी कथा तर जिथे सुरू झाली पाहिजे तेथे होत नाही. जिथे फुलली पाहिजे तेथे फुलत नाही आणि जिथे संपली पाहिजे तेथे संपतही नाही. कथा लेखनात माडगूळकर आतासे रंगतच नाहीत की काय कुणास ठाऊक!

श्री आण्णाभाऊ साठे व शंकरराव खरात यांच्या कथा ग्रामीण आहेत. मात्र त्या लिहिणाऱ्यांच्या दृष्टिकोनातून पाहिले तर आण्णा-

भाऊंना 'ग्रामीण' चित्रे रंगविण्यापेक्षा 'कथा' सांगण्याची अधिक हौस आहे, त्यामुळे अद्‌भुतता, योगायोग इत्यादींनी युक्त अशा कथा ते लिहितात, तर खरातांची भूमिका ग्रामीण जीवनांतील भटक्या जमातींची व इतर निरनिराळ्या व्यावसायिकांची हृद्य व्यक्तिचित्रे रंगविणे हीच आहे. खरातांची भूमिका काही अंशी माटे मास्तरांसारखीच आहे. माटे मास्तरांमध्ये कलात्मकता अधिक होती, परंतु अनुभवाच्या दृष्टीने खरातांमध्ये अधिक सच्चेपणा आहे. या भूमिकेमुळे आपल्या पात्राकडे ते ज्या अशीलच्या चष्म्यांतून पाहतात, तो चष्मा लवकर सुटला पाहिजे. फारशा कलात्मक नसलेल्या तरीही चांगल्या कथा असेच या दोघांच्या कथांबद्दल म्हणता येईल. खरातांचा 'सांगावा' व आण्णाभाऊंचे फरारी, भानामती या संग्रहांतून भेटणाऱ्या व्यक्ती मात्र मूलतःच ग्रामीण वाटतात. मिरासदार—पाटलांसारखा त्यात फसवेपणा नाही.

आजच्या आघाडीवरच्या ग्रामीण कथालेखकांची ज्याप्रमाणे अपेक्षापेक्षा लवकरच दमछाक झाली, त्याहीपेक्षा शोचनीय परिस्थिती शं. ना. नवरे व श्री. ज. जोशी या तरुण कथालेखकांची झालेली दिसते. वासष्टमध्ये त्यांतल्या प्रत्येकाचे तीन तीन कथासंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. शं. ना. नवरे यांनी साधारणतः एक दशकापूर्वी ज्या वेळी कथालेखनाला सुरुवात केली, त्या वेळी आपल्या पहिल्यावहिल्या कथांनी त्यांनी चांगल्याच अपेक्षा निर्माण केल्या होत्या. मध्यमवर्गीयांच्या काही नाजूक समस्यांचे चित्रण त्यांच्या कथांतून अधिकाधिक कौशल्याने व कलात्मकतेने फुलत जाईल अशी अपेक्षा होती. अतिरिक्त संवादामुळे होणारा रसभंग, योगायोगाची अकारण आवड आणि विनाकारण धक्के देणारे शेवट त्यांच्या कथांतून सुटून ते काही 'घाटदार' कथा लिहितील अशी अपेक्षा होती, परंतु अगोदरच चतुर असलेल्या त्यांच्या लेखणी ला काही नियतकालिकांसाठी 'वाह्यात' कथा आणि 'कडक' कथा लिहिण्याची चटक लागली आणि त्यांच्याबद्दलच्या आशा धुळीला मिळाल्या 'इंद्रायणी' आणि 'सखी' या कथासंग्रहांतील उमेदवारीच्या काळांत लिहिलेल्या 'कच्च्या' कथा व आता मागणीप्रमाणे लिहिलेल्या 'वेला' या संग्रहांतील 'तयार' कथा यांमध्ये खूपच फरक आढळतो.

श्री. ज. जोश्यांच्या प्रसिद्ध झालेल्या कथासंग्रहात उतरती कमान आहे. मध्यमवर्गीयांच्या आणि विशेषतः आत्मचरित्रात्मक अशा सौम्य परंतु चांगल्या कथा म्हणून 'मामांचा कडा' हा त्यांचा कथासंग्रह निश्चितच महत्त्वाचा आहे; परंतु 'कोंबडी' मधल्या त्यांनी लिहिलेल्या गोष्टी वाचून त्यांच्यासारख्या सौम्य व धीम्या प्रकृतीच्या लेखकाने या कथा का लिहाव्या असा प्रश्न पडतो. त्यांचा 'अंगण' हा संग्रह तर मुद्दाम वेचून आपल्या साऱ्या सामान्य कथा एकत्रित आणण्याच्या हेतूने प्रसिद्ध केलेला असावा.

या दोघांचे कथासंग्रह वाचताना कथांच्या दर्जाप्रमाणे प्रकाशक किंवा प्रकाशकांप्रमाणे कथा, असेही एक नवे तंत्र त्यांनी सांभाळलेले दिसते.

ग्रामीण व वाह्यात कथांप्रमाणे मराठी वाचकांची विनोदी कथांसाठी वाढती मागणी असल्यामुळे विनोदी कथांचेही संग्रह या वर्षी मोठ्या प्रमाणात प्रसिद्ध होत असताना दिसत आहेत. अर्थात आपल्या लोकप्रियतेसाठी ग्रामीण व वाह्यात कथांनीही विनोदाचा मसाला भरपूर वापरला आहे. ग्रामीण कथांनी बांधलेल्या आडाख्यापुढे आणि मारलेल्या घोडदौडीपुढे कामकथासुद्धा निष्प्रभ ठरतात. आधीच ग्रामीण त्यात विनोदी, वर पुन्हा लफडेबाज अशा त्यांच्या त्रिविध स्वरूपामुळे फडकेसंप्रदायी शृंगारकथादेखील कमी पडतात. हे अद्याप

कामकथा लेखकांच्याही नीटसे लक्षात आलेले दिसत नाही.

श्री. बाळ गाडगीळ, द. पां. खांबेटे, पद्माकर डावरे, रमेश मंत्री, रायरीकर इत्यादि लेखकांनी मराठी विनोदाच्या क्षेत्रात विडंबन कथा यशस्वी केली आहे. अतिशयोक्त, उपहास — उपरोधानी युक्त व मुद्दाम ज्यादा खुलवून लिहिलेल्या हलक्या फुलक्या अशा विपुल कथा या लेखकांनी निर्माण केल्या आहेत.

विडंबन काव्याप्रमाणेच विडंबन कथासुद्धा परिणामकारक रीत्या लिहू जाऊ शकते, हेच त्यांच्या बहुसंख्य कथांनी सिद्ध होते. या प्रकारच्या बहुसंख्य कथांतून मोठ्या प्रमाणात पाश्चात्य लेखकांची उसनवारी दिसते आणि नामोल्लेखाविना असते, ही गोष्ट मात्र नजरेआड करता येणार नाही. या सर्व विनोदी कथासंग्रहांमध्ये 'असा असावा नवरा' ह्या दि. बा. मोकाशी यांच्या संग्रहाचे काही एक आगळे वैशिष्टय आहे. मध्यमवर्गीयांच्या ओढघस्तीतून होणाऱ्या वैफल्ययुक्त पार्श्वभूमीवर त्यातून टिपलेली विसंगती अतिशय कारुण्यपूर्ण व वास्तवपूर्ण अशी आहे. अतिशय संवेदनाक्षम अशा लेखकाचे ते स्मितापेक्षा कारुण्य उभे करणारे, सौम्य परंतु आगळे लेखन आहे.

आतापर्यंत चर्चिलेल्या कथावाङ्मयाच्या भरमसाठ लोकप्रियतेमुळे काही लेखकांची चांगलीच कुचंबणा झालेली दिसते. त्यांच्या प्रतिक्रिया त्यांच्या संग्रहांच्या निवेदनांतून व्यक्त झालेल्या आहेत. त्यांतील 'वेचलेले क्षण' या संग्रहाचे तरुण लेखक श्री. भा. र. आठवले यांनी प्रास्ताविकाच्या निमित्ताने जी पोटतिडीक व्यक्त केली आहे ती रास्त व महत्त्वाची आहे. 'आज परिस्थिती अशी आहे की, लहानथोर लेखकांनीही द्रव्य मिळविण्यासाठी लेखनाचे कारखाने उघडलेले आहेत आणि त्यामुळे त्यांना विषयाचे बंधन राहिलेले नाही. विषय नसला की, 'स्त्री' या विषयाकडे त्यांना अपरिहार्यपणे धाव घ्यावी लागते व कथा 'मस्त' करायची तर त्या स्त्रीलाही मस्त स्वरूपात रंगविल्याशिवाय त्यांचे भागत नाही. या शब्दांतून त्यांनी आजकालच्या प्रवृत्तीचे वाभाडे काढलेले आहेत. कथेचे बीज वास्तव असले पाहिजे. वावचळलेल्या तरुण पिढीस मार्गदर्शन करावे, निदान त्यांच्या विचारावर विपरीत परिणाम घडेल किंवा त्यांच्या विपरीत कल्पना पोसल्या जातील असे काही न लिहिणे, वगैरे आपल्या कथालेखनाचे हेतू त्यांनी सांगितले आहेत. त्यांचा कथासंग्रह मात्र काही बऱ्यांपैकी कथा एवढ्याच गुणापुरता मर्यादित दिसतो. श्रीपाद जोशी यांनी आपल्या 'अनंता, कायरे केलंस हे?' या नावाच्या कथासंग्रहास जी 'कथाकारांची कैफियत' जोडली आहे तीत नवकवितेप्रमाणे आजची नवकथा ही बव्हंशी परपुष्ट आहे, किंबहुना पाश्चात्य कथेची ती एक भ्रष्ट नक्कलच आहे...नवे लेखक व नवे टीकाकार यांनी आज वाङ्मयाच्या क्षेत्रात साखळी पत्रांप्रमाणे 'दादागिरी' चालविली आहे. आणि आपल्या स्वतःच्या कथा मात्र हरिभाऊ आपटे, वामन मल्हार जोशी, श्रीधर व्यंकटेश केतकर यांची परंपरा चालविणारी आहे...' अशासारखी विधाने आहेत. मला वाटते, स्वतःच्या लेखनासंबंधी व एकंदर मराठी वाङ्मयासंबंधी यापेक्षा भयंकर गैरसमज असूच शकणार नाहीत. नवकथाकार म्हणून ज्या गाडगीळ, भावे, माडगूळकर, जी. ए. कुलकर्णी यांचा उल्लेख केला जातो, त्यांच्या कथांचे अंतरंग तपासल्यास ती कथा अनुकरण किंवा नक्कल म्हणून लिहिलीच जाऊ शकत नाही, हे मुज्ञ वाचकांच्या लक्षात येईल. स्वतःच्या अनुभवविश्वातून फुलणारी व सबंध कथेला एक मोठी कलात्मक सुसंगती असलेली ही कथा चुकूनसुद्धा भ्रष्ट म्हणता येणार नाही. या उलट सरधोपट सपाट कथा लिहिणाऱ्या कित्येक कथाकारांनी सबंध कथाच्या कथा

उचलून आपल्या नावावर लिहिल्याचे आढळून येईल. परपुष्ट किंवा परकीय कथांची उचलेगिरी करण्याचा आरोप जुन्या लेखकावर अधिक मोठ्या प्रमाणात करता येईल आणि पुराव्यानिशी ते सिद्ध करणे फार कठीण नाही. मी तर असे म्हणेन की, सपाट, सरधोपट, निपट व कळकटलेल्या कथांपेक्षा परकीय भाषांतील उत्तमोत्तम कथा रूपांतरित करणारा कथालेखक निश्चितच श्रेष्ठ दर्जाचा होय. वर्षानुवर्षे सामान्य कथा लिहून वाचकांना गांजणारे, परकीय भाषांतील सामान्य कथांची उचलेगिरी व अनुवाद करणारे, दुसऱ्या चांगल्या कथाकारांचे यश पाहून हुबेहुब अनुकरण करणारे, भरताड, पाल्हाळ लिहिणारे लेखक हाच प्रत्येक राष्ट्राला व भाषेला मोठा शाप असतो. लालित्य वा कल्पकता यांचा अभाव असणाऱ्यांनी ' ललितलेखन ' आखडते घ्यावे, हा साधा नियम कित्येक लेखक लक्षात घेत नाहीत, हेच निकृष्ट वाङ्मयाच्या भरमसाठ पैदाशीचे लक्षण आहे. अश्लील कथा परवडली परंतु सोज्वळतेच्या व परंपरेच्या नात्याने लिहिलेली ' भरड कथा ' नको असे होऊन जाते. मराठीत ही भरड कथा खूपच आहे. तिच्या निर्मात्यांचा नामोल्लेख न केलेला बरा.

नवकथेच्या बाबतीत खरी तक्रार ही आहे की, मनोविश्लेषणात्मक कथा न झेपणारे लेखक ज्या वेळी आपणही अशी कथा लिहिली पाहिजे, या अट्टाहासाने लिहितात त्या वेळी त्यांच्या कथांची एकंदर वृत्तीच परकीय राहते. त्याहीपेक्षा मुख्य तक्रार ही की, या मनोविश्लेषणात्मक कथेतील कथांशाला बिलकुल महत्त्व न देणारी ही कथा तिच्या नावीन्यामुळे ज्या वेळी मोठी ठरविण्यात येऊन तिचा खूपच गवगवा होऊ लागला त्या वेळी भरघोस आणि ठोस कथा लिहिणाऱ्या चांगल्या चांगल्या कथाकारांची कुचंबणा होऊ लागली. आपण ' कथायुक्त ' ' कथा ' लिहीत आहोत, त्यामुळे जुने ठरून कमी महत्त्वाचे ठरू असा मागासलेपणाचा गंड या नवकथांनी व नवकथासमीक्षकांनी निर्माण केला. त्यामुळे फडके, खांडेकर, महादेवशास्त्री जोशी, य. गो. जोशी, द. र. कवठेकर, बोकील, चोरघडे, ग. दि. माडगूळकरांसारख्या अस्सल कथाकारांच्या कथेकडे तरुण पिढी उपेक्षेने पाहू लागली. कथा चांगली आहे की नाही, हे न पाहता ती नवी आहे की जुनी आहे, यावरून तिचे मूल्य ठरविण्यात येऊ लागल्याने वाङ्मयाच्या क्षेत्रात काही काळ अंदाधुंदी माजून राहिली. प्रातिनिधिक स्वरूपात प्रसिद्ध झालेल्या प्रथितयश कथाकारांचे संग्रह पाहून आपण अशा प्रकारच्या उपेक्षेमुळे मराठी कथेचे पर्यायाने नुकसानच झाले आहे, असे वाटते. या वेळी प्रसिद्ध झालेल्या द. र. कवठेकर यांच्या पाच कथासंग्रहाच्या पुनरावृत्त्या पाहून खरोखर हरिभाऊंची परंपरा सांगावी ती या एकाच लेखकाने, असे म्हटल्याखेरीज राहवत नाही.

आता तर अरविंद गोखले यांच्या लघुकथांतून ' कथा ' सुटत नाही याबद्दलही नापसंती व्यक्त केली जाऊ लागली आहे. विपुल आणि एका विशिष्ट पातळीवरच्या कथा लिहिणारे लेखक या आपल्या लौकिकाला गोखल्यांनी याही वर्षी फारसा धक्का लागू दिला नाही. कथेची आकर्षक बांधणी, लालित्यपूर्ण भाषा, माफक मनोविश्लेषण व मध्यमवर्गीय नायिकाप्रधान व्यक्तिचित्रण हे त्यांचे विशेष ' व्रती ', ' विघ्नहर्ती ' या कथासंग्रहांतून दिसतात. मात्र आपल्या कथेची बैठक अधिकाधिक कल्पनारम्य व अशक्यातील शक्यतेकडे झुकविण्याच्या त्यांच्या ' विघ्नहर्ती ' सारख्या कथांना चांगलीच कृत्रिमता येऊ लागली आहे.

बऱ्याच वर्षांनंतर श्री. ' शांताराम ' यांचे ' लाटा ' व ' धर्म ' हे एकदम दोन कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. मनोविश्लेषणात्मक कथा

लिहिण्याकडे शांताराम यांचा मोठाच कल आहे. परंतु एकदर त्यांची वृत्ती कथेच्या रचनेमध्ये फारशी रमत नाही. त्यामुळे ताण नसलेल्या, सैलसर . अशा कथा ते लिहून जातात. त्यांतले मनोविश्लेषण सूक्ष्म व काही ठिकाणी वारकाव्याचे वाटले तरी नजर भेदक नसल्याने कथांमध्ये आकर्षकता येत नाही.

'मरवा' हा वि. शं. पारगावकरांचा दुसरा संग्रह. यातील चौदा कथांची वीण निरनिराळ्या प्रकारची व काही कथा मध्यंतरीच्या ग्रामीण कथेच्या वळणावर रेंगाळत राहिल्यामुळे त्यांतील लेखकाच्या प्रकृतीला न शोभेशी कृत्रिम प्रवृत्ती, यामुळे त्यांच्या पुढील संग्रहाबद्दल अपेक्षा बाळगणारे वाक्य लिहून मोकळे व्हावे, असे बहुतेक समीक्षकांना वाटलेले आहे हे बऱ्याच ठिकाणच्या त्यांच्या संग्रहावरील वृत्तपत्रांतील परीक्षणांवरून दिसून येते. पारगावकरांच्या कथांमध्ये कुठे निवेदनाची पातळी सुटली किंवा व्यक्तिचित्रणामध्ये भडकपणा आला असे क्वचित घडते. त्यांच्या कथेची ही एक मोठीच शक्ती आहे. व्यक्तीच्या भावभावना वास्तवतेच्या व स्वानुभवाच्या पातळीवरून रेखाटीत लेखकाने घडविलेली काही व्यक्ति-चित्रे मनोज्ञ आहेत. पारगावकरांच्या पुढील संग्रहाबाबतीत आशा बाळगण्याचे काही कारण नाही, इतके त्यामध्ये वजन निश्चित आहे.

एखाद्या संग्रहाने चटका लावावा व त्या लेखकाच्या अधिक कथा वाचण्याची चुटपुट लागून राहावी, असे कै. गो. रा. दोडके यांच्या 'पूर्वस्मृति' या संग्रहाबाबतीत घडले आहे; परंतु त्यांचा हा संग्रह कदाचित पहिला व दुर्दैवाने शेवटचा ठरला आहे. मनुष्य-स्वभावाचे काही नमुने त्यांनी चांगल्याच कलात्मकतेने उलगडले आहेत. कथांचे वळण जुन्या पद्धतीचे, परंतु जुन्यातील उसनी कल्पकता व खोटी भावनाप्रधानता नाही. कुठलाही अनुभव सांगण्यासारखा आहे, असे वाटल्याखेरीज त्यांनी लिहिले नसावे, कारण इतक्या चांगल्या कथा लिहिणाऱ्याने इतके थोडे का लिहावे, याला दुसरे काही कारण संभवत नाही.

नवोदित कथासंग्रहांमध्ये श्री. शंकर वैद्य यांचा 'आला क्षण गेला क्षण' हा व श्री. प्र. वा. वडेर यांचा 'चढण' या कथा-संग्रहांतून काही चांगल्या कथा भेटतात. त्यांतील नवकथेच्या प्रलोभनापासून दूर राहून लिहिलेल्या आत्मानुभवी कथा चांगल्या आहेत असे वाटते, तर प्रतिमांचा हव्यास ठेवून मुद्दाम ताणलेल्या कथा क्षीण वाटतात. वडेर यांच्यापेक्षा वैद्य यांच्या कथेतील अंतर्रचना बांधीव असते, परंतु ती मोठ्या परिश्रमाने व कष्टाने लेखकाने साधली आहे याच्याही खाणाखुणा कथेतच आढळतात. दोघांच्या एकंदर कथा वाचल्यानंतर कधीकाळी ती फार मोठी 'चढण' चढण्याची उभारी धरू शकेल व भरघोस लिहिली जाईल असे वाटत नाही.

कथेतील अंतर्रचना अतिशय कसोशीने हळूहळू परंतु मोठ्या कलात्मकतेने बांधलेल्या मोजक्या परंतु रेखीव कथा म्हणून विद्याधर पुंडलीकांच्या 'पोपटी चौकट' या संग्रहाचा उल्लेख करावा लागेल. अकारण हळवेपणा, कथेतून वारंवार डोकावणारे अस्सल पुणेरी थाटाचे सावधतेचा आव आणणारे संकुचित तत्त्वज्ञान यासारख्या काही अपरिहार्य दोषांनी ती युक्त असली तरी, 'आजी शरण येते' 'चकवा'सारख्या कथांतून जो एक अस्सल मिष्किलपणा आहे, तो मराठी भाषेत अपूर्व असाच म्हणावा लागेल. सबंध कथेची अतिशय गंभीर प्रकृती आणि सावध व धिमी चाल या बाबतीत त्यांची कथा जशी निराळी आहे, तशीच ती मर्यादित आहे. त्या मर्यादेबाहेर पडून लिहिलेली 'फँटॅस्टिक' सारखी कथा त्यांच्या वृत्तीला न मानवणारी अशी सामान्य कथा

ठरते. वरवरून सहज खेळकर वाटणाऱ्या परंतु आतून सूचकतेच्या कवाडांनी भरलेल्या गंभीर कथा हीच पुंडलिकांची खरी शक्ती. अकारण येणाऱ्या तत्त्वज्ञानामुळे मध्येच कुठेतरी ती सैल होते, तर मांजरीची कथा लिहिताना ते फारच सावधगिरीने लिहीत असल्याची जाणीव होते. 'पोपटी चौकट' मध्येही लेखक चौकट आखण्याकडेच अधिक लक्ष देतो, त्यामुळे तिचा ओघ संथाळ वाटतो. 'डोळे' ही तर अतिशय संयपणाने आकारलेली भयकथा आहे. हिचकॉकच्या दिग्दर्शनाप्रमाणे लेखकाने तिचा ताण फारच वाढविलेला आहे.

पु. भा. भाव्यांनी व वसुंधराबाई पटवर्धन यांनी फारशा महत्त्वाच्या कथा लिहिल्या नसल्या तरी भाव्यांची 'वैरी' ही कथा त्यांच्या प्रतिभेची दांडगी झेप अद्यापही ओसरली नसल्याची खात्री पटवते. भाष्य करण्याच्या आणि एकांगी भाष्य करण्याच्या प्रवृत्तीमुळे 'वैरी' या संग्रहातील बाकीच्या कथा फारशा कुठे चढत असताना दिसत नाहीत. वसुंधराबाईंच्या हल्लीच्या कथांतून लेखिका स्वतःच आपल्या साऱ्या व्यक्तित्वानिशी निवेदकाच्या आणि कथानकातील एक महत्त्वाचा दुवा म्हणून अवतरते, परंतु तिचे अस्तित्व वाचकाला कुठेही खुपू नये इतकी एक कलात्मक भूमिका निर्माण करण्यात त्यांना चांगलेच यश लाभले आहे. एक अत्यंत सुजाण संवेदनाक्षम आणि समाजशास्त्राच्या दृष्टिकोनातून समाजातील व्यक्तींकडे पाहणारे व्यक्तित्व म्हणून ते उलट विलोभनीय वाटते. अधूनमधून भाव्यांच्या भूमिकेतून एखादी कथा लिहिण्याचा मोह त्यांनी सोडला पाहिजे.

वसुंधराबाईंप्रमाणेच काही विशिष्ट पातळी न सुटलेला लेखक म्हणून रणजित देसायांच्या कथेकडे बोट दाखविता येईल. देसायांची भूमिका बरीचशी भूतकाळातील नाटयमयता, काव्यमयता यांसारख्या दंतकथावजा 'गौरव' किंवा वीरकथेमध्ये रमलेली दिसते. भूतकालांतील रम्य घटना, नाटयमय प्रसग, वैभव यांचा एखादा महत्त्वाचा धागा पकडून ते कथा लिहितात. प्रसंग चढविणे व त्याबरोबर भाषाही फुलविणे, कधी स्वप्नाळू तर कधी कल्पनानिष्ठ वातावरणात रममाण होणे यापेक्षा अधिक काही करण्याची लेखकाची जिद्द दिसत नाही. त्यांच्या कथा त्यामुळेच नेमक्या आकार न घेणाऱ्या, आकार घेण्यापूर्वीच संपणाऱ्या अशा 'बसक्या कथा' वाटतात.

भूतकाळाच्या घटनांकडे मंतरलेल्या भावपूर्णतेने नजर टाकून मोठ्या कसदारपणे चैतन्यमय भावविश्व फुलविणारा जातिवंत कथाकार म्हणून ग. दि. माडगूळकर हे आपल्या 'मंतरलेले दिवस' व 'कृष्णाची करंगळी' या कथासंग्रहांनी एकदम नजरेत भरतात. आत्मचरित्रात्मक भावपूर्ण कथा एखादा दमदार लेखक किती उंचीवर नेऊ शकतो याचे फार मोठे प्रत्यंतर त्यांच्या कथांनी आणून दिले आहे. त्यांच्या कथेतील जोम हा खळाळणारा व मुक्त असतो व निव्वळ प्रतिभेच्या कसदारपणावर विसंबून राहून प्रयत्नपूर्वक योजकतेकडे संपूर्ण दुर्लक्ष केल्यामुळे काही मोठमोठे कथाविषय निष्काळजीपणाने हाताळून वाया घालविले आहेत, असेही त्यांच्या कथा वाचताना लक्षात आल्याखेरीज राहत नाही.

शेवटी कमल देसाई व जी. ए. कुलकर्णी यांच्या कथालेखनाकडे अधिक लक्ष दिले पाहिजे असे काहीतरी 'निराळे' त्यांच्या कथांनी मराठीच्या कथाक्षेत्रात घडविण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थात हे निराळे घडविताना हे दोघेही गंगाधर गाडगीळांच्या पुढे गेले नाहीत, हे अगोदरच सांगून टाकायला हवे. कारण अनेकविध भूमिकांवरून कथालेखन करणारा, सर्व प्रकारच्या माणसांना

आपल्या जाड भिंगांतून बरोबर न्याहाळणारा आणि मोठ्या आत्मविश्वासाने लिहिणारा, बहुरंगी व अनेकपदरी निवेदनातून आपली कथा सहसा फसू न देणारा गाडगीळांचा अस्सल कथौघ हे मराठीतले सध्या तरी फार मोठे वैभवस्थान आहे. कमल देसायांच्या कथांतून अतीव सहजतेने व्यक्तिमत्वाचे पापुद्रे उलगडले गेले तरी त्यामध्ये प्रकट होणारे व्यक्तिमत्व अतिशय एकांगी व तितकेच दुबळे आहे. इंदिरा संतांच्या कवितेप्रमाणे त्यांच्या कथांतील भावविश्व हे लेखिकेच्या व्यक्तित्वाशी संपूर्णतः निगडित आहे. नायिकेचे नाव काहीही असले तरी ती वाढत्या वयाच्या, आजकालच्या मिळवत्या परंतु अंतर्यामीच्या स्वप्नांचा चुराडा झालेल्या, वैफल्याने ग्रासलेल्या व स्वतःच्या अतिहळव्या वृत्तीमुळे स्वतःलाच हरविलेल्या लेखिकेच्या ह्या कथा म्हणजे स्पंदनक्षणिका आहेत. जे सांगावयाचे ते लेखिकेच्या व्यक्तित्वाशी कायमचे बांधले गेल्यामुळे ती लिहीत असता आत्मविश्वासाचा अभाव असण्याचे कारणच उरत नाही. परंतु जे सांगावयाचे ते अधिकाधिक संवेदनाच्या संमिश्र पातळीवरून सांगण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळे ती गूढ, अतिसंवेदनाप्रधान होते. आणि म्हणूनच सामान्य वाचकापासून ती दुरावते. ' रंग ' सारखी कथा संवेदनाप्रधान असे नाजूक धागे किती सहजगत्या उलगडू शकते हे पाहण्यासारखे आहे. मानवाच्या विचार करण्याच्या प्रक्रियेचे अगदी सहज आलेखन करणे हा त्यांच्या कथेचा मोठेपणा मुळीच नाकारता येणार नाही.

प्रतिभाधर्माचा अफाट व अप्रतिहत असा ओघ व एकंदर मानवी हालचालीकडे अतिसंस्कारशील दृष्टिकोनातून पाहण्याचा हव्यास यांच्या निदर्शक कथा म्हणजे जी. ए. कुलकर्ण्यांच्या कथा. प्रतिभाधर्माच्या बेफाटपणाच्या बाबतीत त्यांचे काहीसे भाव्यांशी साम्य आहे, परंतु व्यक्तीव्यक्तीकडे पाहण्याच्या दोघांच्या दृष्टिकोनांतून मूलतःच फरक आहे. ज्या व्यक्तींच्या संदर्भात भाव्यांना कथा लिहावयाची असते, त्यांच्याबद्दल वाचकांना उद्देशून भावे असे काही तर म्हणत असल्याचा भास होतो की, बाबांनो, समाजांतील ह्या व्यक्तीची ही जी चित्तरकथा घडली, ती मला अगदी बारीक सारीक तपशिलासह माहीत आहे. आता माझ्या लेखणीचे कसब तरी पाहा. मी ते सगळे किती सूक्ष्मतेने व विस्ताराने सांगतो पाहा. याउलट जी. ए. ना असे म्हणावयाचे असते की, अहो, मलाही ते सगळे संपूर्ण ठाऊक आहे, परंतु ती ' गोष्ट ' मी तुम्हांला मुळीच सांगणार नाही. मी त्या पात्रांच्या हालचालीवर सारखा प्रखर झोत टाकीत जातो आणि ती पात्रे आणि ते प्रसंग त्यांच्या अस्तित्वासह त्यांच्या मनाच्या क्रिया-प्रक्रियांसह तुमच्यापुढे हजर करतो. अहो, त्यांतील पात्रे वरून साधी दिसतात ना, परंतु फार भयंकर आहेत हं ती ! आणि त्यांच्या सान्निध्यात येणाऱ्या काही चांगल्या माणसांचीही तशीच भयंकर अवस्था झालेली आहे. फक्त श्वास रोखून पाहा म्हणजे झाले !

भाव्यांना आपल्या कथांतील काही पात्रांना स्वतःच मोठमोठ्याने हसायचे असते, तर काही पात्रांच्या गळ्यात त्यांच्या मोठपणाने भारावून जाऊन उतावीळपणाने गौरवाच्या माळा घालावयाच्या असतात आणि वर पुन्हा वाचकांना उद्देशून, मूर्खांनो, तुम्हांला इतकेही समजत नाही, या पद्धतीचे रोखठोक विचारणे असते आणि त्यामुळे बऱ्याच वेळेला भडकपणाकडे झुकलेली कथा भावे ' ऐकवीत ' असल्याचे जाणवते. जी. एं. च्या कथांतूनही पात्रांच्या उठवळ आणि अतिशय नाट्यपूर्ण प्रसंगाकडे अधिक लक्ष असते, त्यामुळे त्यांच्या कथेतील प्रत्येक व्यक्ती म्हणजे त्यांच्या ठराविक हेतूप्रीत्यर्थ प्रखर प्रकाशझोतात ठेवलेली व्यक्तीच वाटते. पात्रापात्रांच्या आयुष्यातील भयंकर प्रसंग सांगत असताना

कित्येक वेळा त्यांची कथा रहस्यकथेच्या वळणावर जाते. त्यातच संस्कारप्रधान वर्णन-शैलीमध्ये अधिक टोकदार लिहिण्याच्या पद्धतीमुळे त्यांच्या कथा वाचताना काही 'गडद स्वप्ने' पाहिल्याचा भास होतो. त्यातल्या बऱ्याचशा पात्रांनाही अस्सल कानडी वास येतो. मानवाची असीम मने धुंडाळण्याची वेधक शक्ती जशी त्यांच्या प्रतिभेमध्ये दिसून येते, तसाच सवंध कथेला उज्ज्वलता देणारा सूचक परंतु नाजूक संयमाचा अभावही जाणवतो. जरूरीपेक्षा जादा रहस्यमयता आणणे व प्रतीकांचा अतिरिक्त वापर करणे, हे प्रकार सर्रास आढळतात. 'तुती' सारखी एखादीच आत्मनिष्ठ कथा त्याला अपवाद आढळते.

नवकथाकार म्हटल्या जाणाऱ्या कथाकारांच्या कथा वाचीत असता शेवटी काही विचार मनांत येतात. नवकथाकार म्हटल्या जाणाऱ्या कथाकारांच्या कथा अतिशय तीव्र व उत्कट आहेत, परंतु त्यामध्ये दुर्बोधता आहे, विकृत मनांची ती चित्रे आहेत, तिच्यात कथेचा अंश जवळजवळ नाहीच, यांसारख्या आरोपात काहीच तथ्य दिसत नाही. मात्र नवकथेने प्रतिमांच्या बाबतीत स्वतःची काही अंशी फसगत करून घेतलेली आहे, असे म्हणावे लागते. नवी कथा म्हणजे नव्या प्रतिमा आणि प्रतिमा ह्या संस्कारप्रधानतेच्या दृष्टीने अधिक समृद्ध ठरणाऱ्या असतात, वगैरे विवेचनात एक चांगलीच गफलत आहे. जगत्कथाकार म्हणून समजल्या जाणाऱ्या चेकाव, मोपांसा यांच्या कथांतून प्रतिमांचे नावही आढळणार नाही, तरीही संस्कारप्रधान शैलीच्या प्रतिमायुक्त कथांना त्यांची उंची कधी गाठता आली नाही. सरळ, साध्या निवेदनपद्धतीनेच हे कथाकार ही उंची गाठीत असताना दिसतात. त्यांचे मोठेपण ज्याप्रमाणे माणसे जाणल्याच्या सूक्ष्म दृष्टिकोनात आहे, त्याप्रमाणे सरळ, साध्या निवेदन पद्धतीत आहे. गाडगीळ, गोखले, कुलकर्णी, पुंडलीक यांच्या चांगल्या कथा केवळ याच गुणावरून ठरतात, याउलट प्रतिमांच्या साहाय्याने मुद्दाम कथा लिहिण्याचा ते ज्या वेळी प्रयत्न करतात, त्या वेळी त्यांची कथा कितीतरी रेंगाळताना दिसते. या कथाकारांच्या मानाने फडके यांची शृंगार कथा, मिरासदार–पाटील यांच्या ग्रामीणकथा, विनोदी लेखकांच्या विडंबन कथा, यांनी मराठी कथेच्या क्षेत्रात फार मोठा पाल्हाळ आणलेला आहे. श्री. ज. जोशी तर काही हरिभाऊंच्या पद्धतीने अतिशय पाल्हाळिक अनवश्यक वर्णने करताना दिसतात.

अतिशय पाल्हाळिक अशा क्षीण कथा व अतिशय उत्कट अशा तीव्र कथा यांच्यामध्ये पडणारी, वरवरून रेंगाळत चालली आहे असे वाटणारी, रमत गमत लिहिलेली परंतु सवंध कथेत एक गमतीची आंतरिक संगती असलेली आजकालच्या अमेरिकन कथांसारखी फारसी कथा मराठीत लिहिली जात नाही. सत्यकथेच्या दिवाळी अंकातील श्री. दा. पानवलकर यांची 'औदुंबर' ही कथा त्या दृष्टीने अतिशय उल्लेखनीय आहे.

बासष्ठ सालच्या कथाकारांमध्ये ग. दि. माडगूळकर, विद्याधर पुंडलीक, कमल देसाई, जी. ए. कुलकर्णी यांसारखी काही फार थोडी नावेच शेवटी शिल्लक राहतात. ग. दि. माडगूळकरांमध्ये एक नवी उभारी दिसून येत असली तरी बाकीचे लेखक उतरतीलाच लागलेले आहेत. त्यामुळे १९६२ साल हे कथालेखनाच्या विकासाच्या दृष्टीने पिछाटलेले दिसते, या एकाच वाक्याने अधिक काही न लिहिता हे समीक्षण संपविलेले बरे !



अनुक्रमणिका

# टीका

— गं. ब. ग्रामोपाध्ये

१९६२ साली प्रसिद्ध झालेले टीकावाङ्मय एका परीनें वैशिष्ट्यपूर्ण वाटते. त्यात मराठीतील आजच्या सर्वत्र प्रमुख नामवंत टीकाकाराचे लेखन प्रसिद्ध झालेले नसले तरी ज्यांचे लेखन प्रसिद्ध झाले आहे, त्यात मराठी टीकावाङ्मयाच्या प्रमुख प्रवृत्तींचे दिग्दर्शन होत आहे. त्यात साहित्यविषयक तात्त्विक चर्चा आहे, वाङ्मयीन मूल्यांसंबंधीचे नवे-जुने दृष्टिकोन आहेत, जुन्या-नव्या दृष्टिकोनांतून केलेले समीक्षण-रसग्रहण आहे, आणि त्या साऱ्यांतून क्वचित आग्रही प्रतिपादनही आहे.

साहित्याची प्रकृती व प्रयोजन, त्याचे स्वरूप आणि कार्य यांसंबंधीचे प्रश्न टीकाकाराला सतत भंडावून सोडीत असतात. तत्संबंधीची आपली जाणीव त्याला पुन: पुन्हा तपासून घ्यावी लागते. कलावाङ्मयाच्या मूळ स्वरूपातच असे काही असते, त्याच्या सौंदर्याचा आविष्कारच मुळी अशा प्रकारचा असतो की, टीकाकाराला त्याची सतत दखल घेण्याची आवश्यकता भासावी. त्यात कालांतराने आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही बाबतीत बदलत गेलेल्या साहित्याबद्दल तर बोलावयालाच नको. पूर्वसूरींनी तत्कालीन वा तत्पूर्वकालीन साहित्याच्या आधारे साहित्याचे जे निकष काढलेले असतात व त्यांच्या अनुषंगाने साहित्याचे जे शास्त्र बनविलेले असते, ते साहित्यशास्त्र जुन्याप्रमाणे नव्या साहित्याचेही मूल्यमापन करू शकेल का अशा प्रकारचे प्रश्न निर्माण होतात. साहित्याचे शास्त्र हे साहित्यानुगामी, की शास्त्रानुगामी या प्रश्नांचे आव्हान टीकाकारांना स्वीकारावे लागते; टीकाकारांत पक्षोपपक्ष पडतात, नव्या-जुन्याच्या अभिमानाचे व अभिनिवेशाचे वाद उभे राहतात, आणि त्यांतूनच अखेर कलामूल्यांचे सुवर्णकण हाती लागतात. किंबहुना हे सुवर्णकण हाती लागण्यासाठी वर उल्लेखिलेल्या निरनिराळ्या स्वरूपाचे टीका-लेखन होण्याची आवश्यकताही असते. आणि ही आवश्यकता थोड्या फार प्रमाणात तरी पूर्ण करील अशा प्रकारचे टीकालेखन १९६२ साली प्रसिद्ध झालेले आहे.

टीकावाङ्मयात तात्त्विक चर्चेला एक आगळे महत्त्व असते. साहित्यशास्त्रीय सिद्धान्तांना त्यांचे फार साह्य होते. त्या दृष्टीने प्रस्तुत १९६२ साली प्रसिद्ध झालेल्या टीका-ग्रंथांत पुढील ग्रंथ महत्त्वाचे वाटतात : उदा० साहित्याचा संसार (व. ग. खापर्डे), विचक्षणा (रा. श्री. जोग), पराधीन स्वरस्वती (पु. ग. सहस्रबुद्धे), छांदसी (पु. शि. रेगे), आणि 'विमर्शिनी' (वा. ना. देशपांडे). पैकी 'साहित्याचा संसार' यात १९६० साली खापर्डेंनी दिलेली सहा व्याख्याने संग्रहित केली आहेत. म्हणजे त्यांतील विचार सलग, एकाच व्याख्यानमालेत मांडले गेले आहेत. याउलट वर उल्लेखिलेल्या इतर पुस्तकांत त्या त्या लेखकांचे जे लेख प्रसिद्ध झाले आहेत, त्यांचे लेखन भिन्न भिन्न वेळी व स्फुट रूपाने झालेले आहे. परंतु ते लेख १९६२ साली संग्रहरूपाने ज्या अर्थी प्रसिद्ध झालेले आहेत, त्या अर्थी त्यांतील मते आजही लेखकाला मान्य आहेत, असे समजून चालावयाला हरकत नाही.

पैकी 'साहित्याचा संसार' कर्ते व. ग. खापर्डे यांची साहित्याविषयीची भूमिका अध्यात्मवाद्याची दिसते. 'वाचे बरवें कवित्व।

कवित्वी रसिकत्व। रसिकत्वी परतत्त्व। स्पर्शू जैशा' या ज्ञानेश्वरांच्या ओवीत त्यांनी आपल्या साऱ्या विवेचनाचा समारोप केला आहे. खापर्डे यांची ही आध्यात्मिकता भारतीयतेच्या अभिमानाने आणि संस्कृत साहित्यशास्त्राच्या अध्ययनाने पोसलेली आहे. 'हितकारकता' वा 'उन्नतिकारकता' हे त्यांच्या एकंदर प्रतिपादनाचे सूत्र आहे. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चारही पुरुषार्थांचे संवर्धन साहित्याने केले पाहिजे, अशी त्यांची अपेक्षा आहे. किंबहुना हेच साहित्याचे सामर्थ्य व हेच त्याचे कार्य. साहित्याच्या अंतिम हेतूची वा कार्याची कल्पना एकदा निश्चित केल्यानंतर इतर सारे विवेचन त्या कल्पनेचा परिपोष करण्यासाठी झाले असल्यास नवल नाही. खापर्डे यांनी आपल्या प्रतिपादनासाठी अनेक पाश्चात्य वा पौर्वात्य-विचारवंतांचे दाखले दिले आहे. अनेकांची मते आपल्या परीने खोडून काढली आहेत. त्या साऱ्यांचा परामर्श येथे घेणे शक्य नाही. पण त्यांच्या विचारांची धारणा लक्षात येण्यासाठी त्यांच्या एक दोन निष्कर्षांचा उल्लेख करणे इष्ट वाटते. ललित साहित्य ही कला नव्हे, हा अशा निष्कर्षांपैकीच एक निष्कर्ष. सत्य हाच ललित-कृतींचा मुख्य स्वभाव असला, गुण असला, धर्म असला व सौंदर्याने होणारा आनंद हाच त्याचा परिणाम असला, तरी सौंदर्य हे सत्याला व शिवाला सोडून असूच शकत नाही, हा आणखी एक निष्कर्ष. कलेची सीमा काव्य न मानता नाट्य ही त्याची सीमा मानली पाहिजे. वास्तवाचेच जर चित्रण करावयाचे असेल तर त्यातील 'उदात्त' वास्तवाचेच चित्रण करावे, असेही काही निष्कर्ष त्यांनी मधूनमधून काढले आहेत. साहित्याच्या जातवार (?) वर्गवारीची परिगणना करून ४३४ ही त्यांची संख्याही त्यांनी निश्चित केली आहे. साहित्याच्या आजच्या बदलत्या म्हणजे 'नव' स्वरूपाबद्दल त्यांना पूर्ण असंतोष वाटतो. 'सौंदर्ययोग' हा साहित्याचा अंतिम उद्देश म्हणून त्यांना मान्य असला तरी तो योग आजच्या 'विफलता-वादी, ओंगळ, दिशाशून्य, हेतुशून्य' वगैरे प्रकारच्या साहित्याने साधला जाणे शक्य नाही, असे त्यांचे स्पष्ट मत आहे. मार्क्स, फ्रॉइड व पिकासो हे जगाच्या साहित्याचे हितशत्रू होत हेही जाता जाता त्यांनी सांगून टाकले आहे. साहित्याची प्रकृती व प्रयोजन यासंबंधात खापर्डे यांचा पक्ष कोणता हे यावरून लक्षात येते. अर्थात ते प्रमुख एका पक्षाचे आहेत हे म्हणणे योग्य नव्हे. तसे त्यांचे सारे विवेचन निराळे आहे, स्वतंत्र आहे. परंतु साहित्याच्या टीकाकारांत (खापर्डे यांना 'टीका' हा शब्दही चुकीचा वाटतो. आणि तोही संस्कृत–मराठी परंपरेला धरून नाही म्हणून.) त्यांचे स्थान कोणते हे वाचकांच्या लक्षात यावे, एवढ्याच दृष्टीने त्याचा उल्लेख केला. संस्कृत–मराठी परंपरेचा मागोवा घेत, व अध्यात्माचा संदेश देत, साहित्याने मानवाची सर्वांगीण उन्नती साधावी अशी त्यांनी जी अपेक्षा व्यक्त केलेली आहे, त्यावरून त्यांचा दृष्टिकोण स्पष्ट होतो. मात्र साहित्याने समाजाभिमुख होण्याऐवजी लोकांनाच साहित्याभिमुख करावे असे जेव्हा ते आवाहन करतात, तेव्हा त्यांच्या एकंदर विवेचनाशी हे कितपत सुसंगत ठरेल अशी शंका येते. अर्थात येथेही लोकांचे कल्याण हेच त्यांचे उद्दिष्ट आहे आणि म्हणून लोककल्याण, लोकहित या मूळ उद्दिष्टांशी ते धरून आहे, असेही आपल्या लक्षात येते.

व. ग. खापर्डे यांच्या प्रतिपादनातील काही विचारांशी साम्य पण इतर काही मूलभूत प्रश्नांशी विरोध दर्शविणारा लेख-संग्रह म्हणजे रा. श्री. जोग यांचा 'विचक्षणा'. यात वाङ्मयविषयक सामान्य व तात्त्विक विचार व्यक्त करणारे एकूण दहा लेख अंतर्भूत केलेले आहेत. त्यात 'केळकर आणि

अभिरुची ', 'प्रयोगमूल्य, नाटचमूल्य आणि वाङ्मयमूल्य ', 'मेघदूतविषयक काही विचार', 'जिन्नान आणि काणेकर ' याप्रकारचे काही लेख सोडले तर साहित्याची सामान्य व तात्त्विक पण निवळ चर्चा ज्यांत आहे असेही काही लेख आहेत. जोगांच्या या सर्वच लेखांत त्यांचे वैदिग्ध्य, रसिकता आणि तर्कशुद्ध विचारसरणी व्यक्त असली तरी ती मुख्यत: जुन्या संस्कृत साहित्यशास्त्राला धरून होते. याचा अर्थ पाश्चात्य टीकाविचार त्यांना अजिवात मान्य नाही, असे नाही. परंतु तो एका मर्यादेच्या बाहेर म्हणजे अत्याधुनिक ज्याला म्हणता येईल तो विचार त्यांना तितकासा पटत नाही. मात्र साहित्य हे कोणत्याही प्रकारचे व कशाचेही साधन नाही, याबद्दल ते ठाम आहेत. साहित्याकडून उपदेश, उद्बोधन इत्यादि कोणत्याही गोष्टीचा किंवा कोणत्याही विशिष्ट पुरुषार्थाचा आग्रह धरून त्याला साहित्यामध्ये ओढण्याची वृत्ती ही सर्वाकर्षित्वाची (Totalitarian) असल्याचे, ते सांगतात. इतकेच नव्हे तर, साहित्यिकांनी कोणत्याही पक्षाच्या, पंथाच्या वा तत्त्वज्ञानाच्या दडपणाखाली दडपून जाऊन आपले विचारस्वातंत्र्य गमावू नये, असेही आवाहन ते करतात. साहित्याकडे पाहण्याची जोगांची शुद्ध कलात्मक दृष्टी यातून व्यक्त होते. कलाकृतीचे रसग्रहण व मूल्यमापन वस्तुसापेक्ष म्हणजेच वस्तुनिष्ठ मूल्यनिकषाच्या आधारे करणे इष्ट असते, असे जेव्हा ते 'जिन्नान आणि काणेकर ' यांच्या संदर्भातील लेखात सांगतात, तेव्हाही कलाकृतीच्या सौंदर्याइतकेच टीकेचे मूल्यही निर्भेळ राखले पाहिजे, असे प्रतिपादितात. मात्र साहित्याचे स्वरूप व प्रयोजन यांबाबत इतकी निर्भेळ भूमिका घेऊनही गेल्या पंधरा वर्षांतील साहित्याबद्दल जोग अस्वस्थ होताना दिसतात. स्वत:ला सौंदर्यवादी म्हणवून घेणाऱ्या टीकाकारांप्रमाणे ते त्याच्याविरुद्ध युद्ध पुकारून उभे नसले तरी आजच्या नव-वाङ्मयातील बीभत्सता, अश्लीलता, नीतिविरोध व क्लिष्टता या त्यांना खटकतात. संस्कृत साहित्यशास्त्राचा तर हा प्रभाव नसेल ? परंतु या खटकणाऱ्या गोष्टीबद्दलही त्यांची दृष्टी समंजस आहे, हे नववाङ्मयाचे पुरस्कर्तेही मान्य करतील. कारण या आक्षेपांचे स्पष्टीकरण ते काही मूलभूत तात्त्विक प्रश्नांच्या आधारे करतात. ललित कलांचे कार्य सत्यदर्शन का सौंदर्यदर्शन ? आणि कला स्वार्थ असते की परार्थ असते ?—असे हे दोन प्रश्न होत. सत्याच्या व सौंदर्याच्या रस्सीखेचीत जेव्हा सौंदर्याचा पराभव होतो, तेव्हा बीभत्सता, अश्लीलता व नीतिविरोध यांना थारा मिळतो असे त्यांचे म्हणणे आणि म्हणून सत्याने सौंदर्याचे, म्हणजेच लालित्याचे बंधन पाळावे, असा त्यांचा निष्कर्ष. (जोगांचे हे सारे विवेचन चिंत्य आहे. परंतु त्याचा परामर्श घेण्याचे हे स्थळ नव्हे.) आविष्काराबाबतही कलाकृती स्वार्थही आहे आणि परार्थही आहे, अशी त्यांची भूमिका आहे. स्वार्थ-परार्थाच्या समन्वयाने कलावंत व रसिक या दोघांचेही, जोगांच्या मते समाधान होईल.

'विचक्षणे 'तील साहित्यासंबंधीच्या प्रा. जोगांच्या एकंदर विवेचनाने सर्वांचे समाधान न झाले, किंवहुना त्यांच्या काही मतांशी तत्त्वत: विरोध संभवला तरी त्या विरोधाचे स्वरूप ' we beg to differ ' या स्वरूपाचे राहते. प्रतिपक्षाच्या मताचा जोग विपर्यास तर करीत नाहीतच. पण आपला मतभेदही तात्त्विकपणे आणि सभ्यपणे ते व्यक्त करतात आणि म्हणून त्यांचे आक्षेप जरी कुणाला पटले नाहीत तरी ते त्यांना समजू शकतात.

परंतु ज्यांचे विचार व साहित्यविषयक मते पटूही शकत नाहीत व समजूही शकत नाहीत असे काही टीकाकार असतात. मूळ साहित्यविषयक अभिरुचीपासून वा दृष्टिकोनापासूनच तेथे मतभेद होण्याची शक्यता

असते. आपले सिद्धान्त ठाम असल्याचा तेथे अभिनिवेश तर असतोच, पण त्याबरोबरच इतरांची मते भ्रांत, विकृत, उद्धट मानण्याचा फटकळपणाही असतो. पु. ग. सहस्रबुद्धे यांची गणना अशा टीकाकारांत करावी लागेल. 'पराधीन सरस्वती' हा त्यांचा लेखसंग्रह. सहस्रबुद्धे यांचा मूळ पिंड विचारप्रधान, तर्कनिष्ठ व बुद्धीला आवाहन करणारे लेखन प्रिय असणारा. आणि म्हणूनच असेल कदाचित, पण या लक्षणांनी युक्त असणारा निबंध त्यांचा फार आवडीचा आहे. निबंध ही एक मोठी शक्ती आहे व राष्ट्ररचनेच्या कार्यात त्याचे मोठे स्थान आहे, असे त्यांचे म्हणणे. प्रस्तुत संग्रहातील 'निबंध आणि राष्ट्ररचना' हा निबंध या दृष्टीने महत्त्वाचा आहे. तर्कशुद्ध रीतीने आपले सिद्धान्त मांडणारी, बुद्धीला आवाहन करणारी, इतिहास, अनुभव, अवलोकन यांच्या पायावर उभारलेली विचारप्रधान रचना असा निबंध, प्रबंध वा ग्रंथ या शब्दांचा अर्थ त्यांना अभिप्रेत आहे. आणि तो पाश्चात्य विद्या भारतात येण्याआधी अर्वाचीन भाषेतच काय, पण संस्कृततातही नव्हता असे त्यांचे म्हणणे आहे. निबंधरचनेचा सहस्रबुद्धे यांचा अभिप्राय येथे एवढ्यासाठीच नमूद केला की त्यांच्या मनावरचा त्याचा प्रभाव स्पष्ट व्हावा. साहजिकच जे तर्काच्या पलीकडचे असणारे, कल्पनेने निर्माण झालेले व भावनांना आवाहन करून केवळ रसात्मक आनंद देणारे साहित्य त्यांना कमी महत्त्वाचे वाटते. मात्र त्यानेही निबंधाइतके नाही तरी त्यांच्या खालोखाल का होईना पण समाजाला उपयोगी पडावे, थकून भागून आलेल्या माणसाला विरंगुळा द्यावा, किंवा त्यांचा शीणभार हलका करावा, अशी अपेक्षा सहस्रबुद्धे जेव्हा व्यक्त करतात, तेव्हा नवल वाटत नाही. 'साहित्यशास्त्रातील क्रांती', 'कवीचे काव्यातील दर्शन', 'वास्तवाची अभिरुची' इत्यादि जे साहित्यविषयक लेख प्रस्तुत संग्रहात आहेत त्यांतून त्यांची हीच वृत्ती स्पष्ट होते. संस्कृत साहित्यशास्त्राने घालून दिलेले दंडक ओलांडणे त्यांना मंजूर नाही. आणि म्हणून साहित्याच्या स्वरूपाबरोबर साहित्याच्या शास्त्रात बदल होऊ लागताच त्याची त्यांना चीड येते. आणि 'भ्रांतिष्ट', 'उद्धट', 'उद्धटपणाची कमाल' अशा शब्दांनी ती व्यक्त होते. जोग आणि खापर्डे यांच्या विवेचनाच्या तुलनेने तर सहस्रबुद्ध्यांची यावावतची वृत्ती असहिष्णु किंवहुना सर्वंकष वा सर्वाकर्षक (Totalitarian) वाटते. सहस्रबुद्धे यांचे वाचन (ललित व ललितेतर) विपुल दिसते. तर्क, युक्तिवाद इत्यादींनी त्यांचे लेखनही मंडित झालेले आहे. जो सिद्धान्त मांडावयाचा त्याची मांडणी ते साधार करतात. परंतु हे सारे पूर्वग्रहांनी झाकळलेले असते. सहस्रबुद्धे काही एक कल्पना मनाशी बाळगतात व ती सिद्ध करण्यासाठी सारे विवेचन उभे करतात असे आपल्या प्रत्ययाला येते. अर्थात याला कारण त्यांची एकंदर समाजजीवनाकडे पाहण्याची वृत्ती असावी. भारतात सध्या सामर्थ्यशाली मने नाहीत, असा एक त्यांचा सर्वंकष सिद्धान्त आहे. आपण सारे कणहक् वृत्तीचे झालो आहोत. त्याचेच प्रतिबिंब साहित्यातही उमटते, आणि म्हणून आजचे सारे वाङ्मय कणिका क्षणिका यांनी भरलेले आहे असे त्यांचे म्हणणे. किंवहुना आपली सरस्वती—म्हणजे प्रतिभा—हीच मुळी पराधीन आहे असा त्यांचा सिद्धान्त आहे. पूर्वी ती वेदप्रामाण्याच्या अधीन होती, आज ती मार्क्स, फ्रॉईड, वा पाश्चात्य साहित्यिक यांच्या अधीन आहे इतकेच. त्यामुळे आजच्या साहित्यातील साहित्यिकाची अनुभूती, आत्माविष्कार याबद्दलच्या विकृत कल्पना आपल्याकडे रूढ झाल्या. हिडीस, अमंगळ, अर्थहीन विस्कळित लिहिण्याची वृत्ती बळावली, असा अखेर त्यांचा निष्कर्ष. साहित्य—मग ते

ललित असो वा ललितेतर असो–स्फूर्तिप्रद असले पाहिजे. राष्ट्राचे चैतन्य रसरसून वर आणणारे असले पाहिजे हा सहस्रबुद्धे यांच्या सर्व लेखनाचा मूलमंत्र आहे. आणि म्हणून-चरित्रलेखनात अलीकडे जी कलात्मकता डोकावत आहे तिच्या मागचा सिद्धान्त हा भ्रांतिष्ट आहे, असा त्यांचा शेरा आहे. चरित्रवाङ्मय हे एका मर्यादेपलीकडे कलात्मक होऊ शकणार नाही, हे कोणालाही मान्य व्हावे. पण त्याची चर्चा चरित्रवाङ्मयाची प्रकृती व कलावाङ्मयाची प्रकृती यांच्या आधारे तात्त्विक दृष्टीने आणि स्वच्छ मनाने करणे योग्य. केवळ निरनिराळ्या चरित्रग्रंथांचा आपल्या मताशी सुसंगत उल्लेख करून भागणार नाही. परंतु येथेही चरित्रनायकांच्या थोर, आदर्श, स्फूर्तिप्रद अशा जीवनाचीच ते अपेक्षा करतात. एका क्षेत्रात असामान्य असणाऱ्यांच्या जीवनातही काही सामान्य हीण असणे शक्य आहे. परंतु सहस्रबुद्धयांच्या मते चरित्रात त्याला थारा नसावा. वाल्झाकच्या चरित्रात त्यांचा अपेक्षाभंग होतो तोही त्यामुळेच. आणि सत्य व कला यांच्या संकटातून निर्माण होणारे नवचरित्रही 'पुरुषार्थहीन' निपजण्याची त्यांना भीती वाटते तीही त्यामुळेच. कलावाङ्मयाकडे पाहण्याची सहस्रबुद्धयांची वृत्ती ही या प्रकारची आहे. 'वास्तवाची अभिरुची' या लेखातही तिचा प्रत्यय येतो. सारांश, 'पराधीन सरस्वती'त व्यक्त होणारी सहस्रबुद्धे यांची मते केवळ जुन्या संस्कृत साहित्यशास्त्राच्या अधीन झालेली नाहीत, तर ती काही गृहीतकृत्याच्याही अधीन झालेली आहेत, असा त्यांच्या एकंदर विवेचनात भास होतो. त्यामुळे त्यांचे हे टीकालेखन कितीही प्रामाणिक व पोटतिडिकेचे असले तरी कलावाङ्मयाची मूळ प्रकृती व तिचा आवाका लक्षात न घेता केलेले आहे, म्हणजेच ते असाहित्यिक भूमिकेवरून केलेले आहे असे म्हटल्यावाचून राहवत नाही.

ज्या आजच्या नवसाहित्यावर खापर्डे, जोग व सहस्रबुद्धे आक्षेप घेतात, त्या नवसाहित्याचे एक अध्वर्यू लेखक, नवकवी पु. शि. रेगे यांचा 'छांदसी' हा स्फुट टीकालेखांचा संग्रहही याच वर्षी सिद्ध झाला आहे. त्यामुळे नवलेखकाची भूमिकाही अनायासे व्यक्त होत आहे. रेगे यांचे 'छांदसी'तील लेखन त्यांच्या कवितेप्रमाणेच मोजके, आणि जितक्यास तितके आहे. त्यामुळे नेमके त्यांना काय म्हणावयाचे आहे, हे चटकन लक्षात येते. विशेष म्हणजे ललित साहित्याची मूळ प्रकृती व प्रयोजन लक्षात घेऊन एका सर्जनशील लेखकाने केलेले हे लेखन असल्यामुळे नवलेखनावर सामान्यतः जे आक्षेप घेतले जातात त्यासंबंधाचीही दुसरी बाजू लक्षात येते.

आधुनिक कवीच्या निमित्ताने लिहिताना रेगे स्पष्ट सांगतात की कवी हा भाट नाही, की क्रांतिदेवीचा पुजारी नाही, की प्रेषितही नाही. तो एक अत्यंत आत्मनिष्ठ असा कलावंत आहे. तो कलावंत आहे, याचा अर्थ असा की तो एका कलेखेरीज इतर कशाचीच कदर करीत नसतो. म्हणजे कवीने लोकानुरंजन करू नये, वा लोकांना शहाणे करू नये असे त्यांचे म्हणणे नाही. त्याने ते जरूर करावे. पण इतर साधनांनी – काव्याने नव्हे. कारण काव्य हे त्याचे माध्यम नव्हे. रेगे यांची ही केवळ कलावादी भूमिका लक्षात घेतली की आजचे काव्य उत्कटतेने खाजगीच का राहते याची कल्पना येते. बाह्य वस्तूची कवीच्या मनावर होणारी प्रतिक्रिया, कवीची दृष्टी व प्रतिमांच्या रूपाने त्यांतून उद्भवणारी काव्यसृष्टी नेहमीच पूर्णांशाने समजेल असे नाही, असे ते स्पष्टच सांगतात.

आजच्या नवसाहित्याला अश्लील, बीभत्स, विफलतावादी, वगैरे जी विशेषणे

लावली जातात त्या संबंधाचीही रेगे यांची मते प्रस्तुत 'छांदसी'त व्यक्त झाली आहेत. ज्याला अश्लील म्हणतात ती काव्यात नसतेच असे त्यांचे स्वच्छ मत आहे. Pornographic Literature निराळे म्हणजे भावना उद्दीपित करणारे वाङ्मय निराळे आणि सौंदर्यपूर्ण कलात्मक वाङ्मय निराळे. कलाकृतीत भावनांचे उदात्तीकरण होत असते; आणि म्हणून त्यातून 'सौंदर्यकलाकृती' निर्माण होत असते. शिवाय त्यांचे असेही म्हणणे, की श्लील–अश्लील हा वादच निरर्थक आहे. कलाकृतीचा विचार फक्त कलात्मक औचित्याच्या दृष्टीने झाला पाहिजे. मात्र हे औचित्य सामाजिक संकेतावर न आधारता कलाकृतीचा जो अंत:स्थ आशय त्यावर आधारला गेला पाहिजे. अपरिहार्यता हा त्याचा मग निकष ठरेल आणि मग विवृत-जघनेचा उल्लेखही अपरिहार्य व औचित्यपूर्ण असेल तर कलात्मक ठरेल. बीभत्सता, विफलता याबद्दलही त्यांचे म्हणणे असे की, मानव हा इथून तिथून क्षुद्र जंतू आहे, हा समाज सारा किडलेल्या माणसांचा आहे, उदात्ततेला कोठे थाराच नाही इत्यादि विचार जर परिस्थितीच तशी असेल तर, साहित्यातही येणे अपरिहार्य आहे, किंबहुना ते अवश्य आहे, असेही त्यांना म्हणावेसे वाटते. प्रश्न आहे तो फक्त लेखकाला या किडलेल्या माणसांबद्दल सहानुभूती आहे की नाही याचा आणि साहित्यातील आंतरिक निष्ठेचा. अश्लीलता, बीभत्सता, अनाकलनीयता इ० बद्दल रेगे यांची भूमिका ही या प्रकारची आहे. त्याच्यामागे फक्त एकाच निष्ठेची अपेक्षा आहे; आणि ती म्हणजे फक्त कलानिष्ठेची. साहित्यिकांकडून ही निष्ठा अर्थात कलेच्या सामाजिक उपयुक्ततेच्या आड येते. परंतु कलेने काही सामाजिक उपयुक्ततेचे कार्य करावे, हे म्हणणेच मुळी रेगे यांना चुकीचे वाटते. ते स्वच्छच म्हणतात, की कलेचे प्रत्यक्ष असे सामाजिक कार्य काहीच नाही. ती फक्त अप्रत्यक्षरीत्या अनुभूतीच्या कक्षा वाढविते, व त्या दृष्टीने समाजावर परिणाम करीत असते. परंतु हे मान्य न होऊन ज्यांना कलेकडून mind-controlling किंवा mind-conditioning करावयाचे असेल ते कला ही सोज्वळ समाजाभिमुख असावी, असे एकीकडून प्रतिपादन करीत असतानाच दुसरीकडून ते कलेच्या गळयाला नख लावण्याचे पाप करतात असे ते स्पष्ट बजावतात.

रेगे यांची कलावाङ्मयाबद्दलची दृष्टी या प्रकारची केवळ कलावाद्याची रूढ अर्थाने नव्हे तर आशय आणि अभिव्यक्ती यांचे अद्वैत मानणाऱ्या व कलेचे महत्त्वमापन करताना केवळ कलेचीच मूल्ये वापरली पाहिजेत असे मानणाऱ्या कलावाद्याची आहे. आणि म्हणून कलाकृतीच्या मूल्यमापनात कलाकाराचे चारित्र्य तपासण्याचा किंवा आशय आणि शैली यांत भेद करण्याचा प्रकार त्यांना गैर वाटतो. या गैरप्रकारामुळेच रेगे यांना असे वाटते की, केवळ कलेच्या निकषावर उत्कृष्ट ठरतील अशा कलाकृती निर्माण करावयाला आपण कमकुवत ठरत तर आहोतच – पण तो कमकुवतपणा समीक्षकांनी प्रसृत केलेल्या अपसिद्धान्तांनी वाढत आहे.

नववाङ्मयावरून निर्माण होणाऱ्या साहित्यचर्चेच्या संदर्भातच वा. ना. देशपांडे यांनी 'विमर्शिनी' या लेखसंग्रहात व्यक्त केलेले मत नमूद करणे इष्ट वाटते. अर्थात 'विमर्शिनी'तील लेखांचे स्वरूप मिश्र आहे. वा. ना. देशपांडे यांना प्राचीन, अर्वाचीन, पाश्चात्य व पुन: संशोधनपर इ. प्रकारच्या साहित्याचे प्रेम व पुन: गती असल्यामुळे या संग्रहात या निरनिराळ्या विषयांवरचे लेख आले आहेत. काही परिचय-परामर्शात्मक आहेत (ऋद्धीपूरवर्णन) तर काही मुख्यत:

व्यक्तिवर्णनात्मक आहेत (Bee).काही रॉबर्ट फ्रॉस्ट वा वॉल्टर डी ला मेयर यांच्या कवितांवर आहेत, तर काही मराठी छंदावर आहेत, इतकेच काय पण नाना फडणीसाच्या काळातील 'पुणे अखबार' वरही आहे. या विविध विषयांच्या निमित्ताने केलेल्या लेखनात देशपांडे यांचे वैदग्ध्य, पांडित्य, बहुश्रुतता इत्यादि व्यक्त होंतातच, पण पुन: कलावाङ्मयासंबंधीचा तात्त्विक दृष्टिकोन व्यक्त होतो. प्रस्तुत तोच मुख्यत: लक्षात घ्यावयाचा आहे.

आजच्या काव्याच्या निमित्ताने लिहिताना ते म्हणतात की, ललित वाङ्मयात प्रयोग-शीलतेला महत्त्व असल्याने नवकाव्य स्वागतार्ह ठरले पाहिजे. आगगाडीसारख्या नव्या प्रतिमाही गैर नाहीत. वैफल्याची जाणीवही कवितेला वर्ज्य नसावी. फक्त कवीने स्वत:शी प्रामाणिक राहावे इतकेच. नवसाहित्यिक ज्या आत्मनिष्ठेला महत्त्व देतात ती आत्मनिष्ठाच बहुधा येथे अभिप्रेत असावी. त्यामुळेच त्यांना कवितेतील दुर्बोधता चालते असे दिसते. मात्र त्यांना खटकतात त्या गोष्टी म्हणजे अभद्रपणा, इंग्रजी शब्दयोजना व छंदोदोषही. अर्थात या आक्षेपाची तात्त्विक चर्चा करण्याऐवजी त्यांनी त्यांच्या मताला अनुकूल असे फक्त इंग्रजी उतारे दिले आहेत.

ललित साहित्याच्या सामाजिक जबाब-दारीसंबंधी देशपांडे यांचे म्हणणे काय आहे, हे त्यांच्या तात्त्विक चर्चेच्या अभावी, सांगणे कठिण आहे. परंतु पु. य. देशपांडे यांच्या कादंबऱ्यांच्या संदर्भात लिहिताना त्यांनी जे लिहिले आहे, तेच येथे उद्धृत करतो: " मूठभर श्रीमंत व सुशिक्षित पात्रांची कोंडी फोडून बहुजनसमाजाच्या सुखदु:खाकडे जर देशपांडे (पु. य. दे.) लक्ष देतील आणि कथानक अधिक आकर्षक व भव्य करणे, वारकायांच्या मौजा आणणे, 'तंत्र' ('तंत्र' शब्दाला अवतरण त्यांचेच) कसोशीने सांभाळणे —वगैरे गुण आपल्या या पुढील (म्हणजे 'बंधनाच्या पलीकडे', 'मुकलेले फूल' व 'सदाफुली' यांच्या पुढील कृतींत जास्त आगण्याचा जर ते प्रयत्न करतील तर फडकेच काय, पण हरिभाऊ आपटे देखील त्यांजपुढे फिके पडतील." एका वैदर्भीय लेखकाने शारदेला केलेल्या नजराण्याच्या संदर्भात हे विधान आल्याने त्यात भलावणीचा थोडा फार अंश असणे शक्य आहे. तरी पण त्यातून बहुजनसमाजाच्या सुखदु:खाची योजना, कथानकाची आकर्षकता, व 'तंत्र'चें कसोशीने पालन वगैरेची शिफारस वा. ना. देशपांडे करतात, त्यावरून त्यांची या-संबंधीची दृष्टी स्पष्ट होते.

'विमर्शिनी'प्रमाणे साहित्याशी संबद्ध पण निरनिराळ्या विषयांवरील लेखांचा संग्रह म्हणजे श्री. ना. बनहट्टी यांचा 'आकाश-लहरी'. हे लेख म्हणजे मूलत: आकाशवाणी-वरील भाषणे होत. या मिश्र स्वरूपाच्या भाषणलेखात लेखकाचा बहुश्रुतपणा व्यक्त होत असला तरी निवळ वाङ्मयीन टीकेत समाविष्ट होतील असे लेख थोडे आहेत; आणि जे आहेत तेही काही नवीन सिद्धान्त मांडण्यासाठी वा एखाद्या कूट प्रश्नाचे विवेचन करण्यासाठी लिहिलेले नाहींत तर आकाशवाणीच्या सर्वसामान्य श्रोत्यांना त्या त्या विषयाचा सुस्पष्ट व यथार्थ परिचय करून देण्यासाठी लिहिलेले आहेत. हा परिचय जसा अर्वाचीन वाङ्मयाचा व त्यातील काही गोष्टींचा आहे, तसाच तो प्राचीन कवींचा (मुकुंदराज) संप्रदायाचाही (वारकरी) आहे; त्यात मराठीतील विनोद आहे, नाटकाचे तंत्र आहे, तसाच रसविचारही आहे. त्यामुळे एकंदर मराठी साहित्याच्या प्रकृति–प्रयोजनासंबंधी व तत्संबंधीच्या मत-मतांतरांच्या संबंधी बनहट्टींची निश्चित भूमिका काय आहे, हे निदान प्रस्तुत लेख-संग्रहावरून सांगणे कठिण आहे.

साहित्यविषयक लेखन जसे ग्रंथांतून वा नियतकालिकांतून होत असते, तसेच ते वृत्तपत्रांतूनही होत असते. किंबहुना वृत्तपत्रे फार दूरवर, बहुजनसमाजापर्यंत पोहोचत असल्यामुळे, त्यांतील साहित्यविषयक लेखांना निराळे महत्त्वही येते. आणि म्हणून टीकावाङ्मयाच्या परामर्शात त्यांचाही समावेश करणे इष्ट वाटते. सुदैवाने या वर्षीच्या ग्रंथप्रकाशनात या स्वरूपाचे प्रकाशन झाले आहे. पां. व. गाडगीळ यांच्या 'उडती पाने' या नावाने प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात या प्रकारचे लेखन सापडते. पां. व. गाडगीळ यांनी निरनिराळ्या साप्ताहिकांतून जे टोपण नावाने लेखन केले त्यातील काही लेखांचा हा संग्रह. यावर वृत्तपत्रीय लेखनाची दाट छाया पडली आहे. तसेच त्यातील लेखन त्रुटित आणि चावरे आहे. प्रस्तुत संग्रहातील बहुसंख्य लेख अर्वाचीन काही कवी व त्यांची कविता यांवर असल्याने त्यातून त्यांची काव्यविषयक भूमिका थोडीफार व्यक्त होते. नवकाव्याचे ते पुरस्कर्ते दिसतात. विशेषतः मर्ढेकर, अनिल व मुक्तिबोध त्यांच्या विशेष आवडीचे असावेत. प्रचारवादी समाजसापेक्ष साहित्याच्या ते विरुद्ध आहेत. काव्यकलेचे परीक्षण कलेच्या निकषावर तपासून पाहिले पाहिजे हेही त्यांना मान्य आहे. किंबहुना विफलतावादी कविताही कविता असू शकते असे सांगून एका परी विफलवादी कवितेची ते तरफदारीही करतात. परंतु नवकवींपैकी मर्ढेकर, मुक्तिबोध त्यांना पसंत असले तरी रेगे त्यांच्या पसंतीस उतरत नाहीत, काशाच्या मांड्या वगैरे शब्द त्यांना खटकतात. अर्थात त्यामागची त्यांची तात्त्विक भूमिका काय आहे ते कळत नाही. कदाचित सौंदर्यवादी म्हणविणाऱ्या टीकाकारांच्या टीका त्यांना विशेष पसंत असल्याने असे झाले असावे. कारण अर्वाचीन टीकाकारांत क्षीरसागर हे एकच आशास्थान त्यांना दिसते. त्यामुळेही असेल कदाचित पण त्यांना कलामूल्य मान्य असली तरी त्यांतील फक्त विशिष्ट मूल्येच मान्य असावीत असे दिसते. त्याविना केवळ कलावादी अन्य टीकाकारांबाबत व त्यांच्या मूल्यमापनाबाबत पूर्वग्रहपूर्वक आक्षेप ते घेते ना.

साहित्यासंबंधीच्या तत्त्वचर्चात्मक ग्रंथांनंतर रसग्रहणात्मक, समीक्षणात्मक ग्रंथांकडे वळणे उद्बोधक होणारे आहे. कारण साहित्याची तात्त्विक चर्चा आणि साहित्याचे रसग्रहण ही परस्परांना पूरक असतात. तत्त्वचर्चेत जशी जुनी व नवी दृष्टी दिसते व त्यातून जशी जुनी टीकामूल्ये व नवी टीकामूल्ये व्यक्त होतात, तसेच, रसग्रहणात्मक व समीक्षणात्मक ग्रंथांत जुन्या टीकापद्धतीने केलेले रसग्रहण व नव्या टीकापद्धतीने केलेले रसग्रहण असे भेद आढळणे स्वाभाविक आहे. जुन्या पद्धतीने केलेले वा केले जात असलेले रसग्रहण आपल्या आता पूर्ण परिचयाचे झालेले आहे. परंतु नव्या टीकामूल्यांनी केलेले रसग्रहण अजून तितकेसे अंगवळणी पडलेले नाही. किंबहुना नवटीका त्या कसोटीला अजून पूर्ण उतरावयाची आहे. या नवटीकेत नव्या वाङ्मयाचे थोडे फार रसग्रहण – मूल्यमापन केलेले आहे. किंबहुना ही नवटीका नववाङ्मयाचीच सहोदर आहे. परंतु जुन्या वाङ्मयाचे रसग्रहण करण्यातच तिचे खरे सामर्थ्य व्यक्त होणार आहे. या दृष्टीने गंगाधर गाडगीळ यांचा 'साहित्याचे मानदंड' हा ग्रंथ स्वागतार्ह आहे.

प्रस्तुत 'साहित्याचे मानदंड' या ग्रंथात इंग्रजी अमदानीनंतरच्या पण नवसाहित्य ज्याला आज आपण म्हणतो त्याच्या पूर्वीचा (म्हणजे साधारणपणे १९४५ पूर्वीच्या) साहित्यातील काही उत्कृष्ट कलाकृतींचे रसग्रहण केलेले आहे. या कलाकृतींचे यापूर्वी रसग्रहण केले गेले नव्हते अ ा नाही. किंबहुना त्यातील काहींचे तर काही मान्यवर टीका-

कारांनी केलेले आढळेल. परंतु ते रसग्रहण, समीक्षण वा मूल्यमापन मुख्यतः जुन्या टीका-पद्धतीने — ठराविक साच्यांनी — केलेले आहे. त्यात बालबोध बोधवादी पद्धती असेल, किंवा भूतदयात्मक जीवनवादी पद्धती आढळेल, किंवा साम्यवादी पुरोगामी पद्धती आढळेल, किंवा फार तर कलावादी म्हणविणारी तांत्रिक पद्धती असेल. या पद्धतींपैकी कोणतीही पद्धती घेतली तरी त्यात कलाकृतीचे कथानक, स्वभावपरिपोष, संवाद, रस इत्यादींचे विभागशः रसग्रहण केलेले असते. या पद्धतींनी कलाकृतीचे सम्यक व एकसंध दर्शन होत नाही, असे नवटीका मानते. तिच्या दृष्टीने कलाकृती ही एक-जिनसी असते. त्यामुळे अवयवशः रसग्रहण करणे तिला मान्य नाही. तसेच कलाकृतीपासून होणारा आनंद रससिद्धांतातील कोणत्या तरी एका वा एकाहून अधिक रसांच्या कप्प्यांत असतो असेही ती मानीत नाही. कलाकृतीचा आनंद ती जरूर मानते, पण त्या आनंदाची ठोकळेबाज वर्गवारी तिला मंजूर नाही. तसेच एकदा विषयाचे अवलोकन करून मग त्याच्या व्यक्त शरीराकडे बघण्याची पद्धतीही ती त्याज्य मानते. कारण तिच्या हिशेबी आशय आणि अभिव्यक्ती या अभिन्न असतात. किंबहुना आशयच आपले स्वतःचे असे रंगरूप, घाट इत्यादि घेऊन अवतरतो असे ती मानते. कलाकृतीबाबतचा नवटीकेचा अभिप्राय स्थूल मानाने येथे सांगितला. याचा अर्थ नवटीकेच्या पुरस्कर्त्यांत तपशिलाबाबत काही मतभेद नाहीत, असे नाही. ते आहेत, परंतु जुन्या टीकेच्या तुलनेत ते महत्त्वाचे नाहीत. अर्थात, गंगाधर गाडगीळांनी केलेल्या रसग्रहणात त्यांना मान्य असणारी नवटीकाच अभिप्रेत असणार, हे खरे. परंतु येथे इतक्या खोलात व तपशीलात जाण्याचे कारण नाही. (गंगाधर गाडगीळांच्या पुस्तकाच्या परीक्षणात त्याचा फार तर विचार होईल. परंतु हे एका ग्रंथाचे परीक्षण नाही, तर संबंध वर्षातील टीकाग्रंथांचा व विशेषतः त्यांतील प्रवृत्तींचा हा आढावा आहे.

गंगाधर गाडगीळांनी केलेल्या या नव-रसग्रहणात काही गोष्टींचा मुद्दाम अवलंब केलेला दिसतो. त्यांनी रसग्रहणासाठी जी पुस्तके निवडली आहेत, ती निरनिराळ्या वाङ्मयप्रवाहांतली आहेत. म्हणजे त्या त्या वाङ्मयप्रकारांतील त्यांच्या दृष्टीने मानदंड ठरेल असे पुस्तक त्यांनी निवडलेले आहे. त्यामुळे, त्यांना साहित्याचे वर्गीकरण, त्यामागील तत्त्व, निरनिराळ्या वाङ्मय प्रकारांचे स्वरूप इत्यादींची चर्चा करता आली आहे. कोणत्याही कलाकृतीच्या रस-ग्रहणास ती ज्या वर्गातील असते त्या वर्गाची व त्या वाङ्मयप्रकारांची जाण असणे अवश्य असते. परंतु ही जाण समंजस असण्याची आवश्यकता असते. वाङ्मयाचे प्रकार पडतात ते त्यांतील प्रकृतिधर्माच्या साम्यभेदामुळे पडतात. आणि हा प्रकृतिधर्मही कलाकृतीच्या संदर्भात केव्हाही व कितीही बदलणे शक्य असते. आणि म्हणून निरनिराळ्या वाङ्मय-प्रकारांच्या सीमारेषा नेहमी बदलत असतात, एकमेकात मिळून जातात व पुसूनही जाऊ शकतात. कलाकृतीच्या रसग्रहणात हे अवधान पाळण्याची आवश्यकता असते. गंगाधर गाडगीळांनी ती पाळलेली आहे. किंबहुना निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांची त्यांनी निवड-लेल्या कलाकृतींच्या संदर्भात तुलनात्मक चर्चा केली आहे. हा या पुस्तकाचा एक विशेष होय. उदा० 'वज्राघात'च्या संदर्भात ऐतिहासिक कादंबरी; 'एकच प्याल्याच्या संदर्भात शोकांतिका — सुखांतिका; स्मृति-चित्रांच्या संदर्भात आत्मचरित्र आणि आत्म-चरित्रात्मक कादंबरी इत्यादि जुन्या टीकेत कलाकृतींच्या घटकांचा मुख्यतः अवयवशः विचार केला जातो. गाडगीळांच्या रसग्रहणात

तसा आढळत नाही. नव्हे, नवटीकेच्या दृष्टीने ते योग्यही नाही. अर्थात याचा अर्थ नवी टीका कलाकृतीच्या निरनिराळ्या घटकांचा व त्यांच्या गुणदोषांचा विचार करीतच नाही असे नाही. ती तो जरूर करते. आणि गाडगीळांनीही तो केलेला आहे. मात्र त्यामागे घटकाघटकांतील एकसंघत्वाची जाणीव ठेवून. त्यामुळे क्वचित काही ठिकाणी जुन्या अवयव-पद्धतीचा भास झाला तरी प्रत्यक्षात अवयव-पद्धती नाही, हेही त्यांचे एकंदर विवेचन वाचून लक्षात येते. काही ठिकाणी विस्तार अधिक वाटतो, काही ठिकाणी पुनरुक्ती जाणवते, व काही ठिकाणी नवटीकेत रूढ असणाऱ्या गोष्टीही थोड्या फिरवून नव्याने सांगत असल्याचा भासही जाणवतो. तसेच 'मानदंड' म्हणून काही कलाकृतींच्या केलेल्या निवडीबद्दलही मतभेद होण्याची शक्यता आहे; परंतु ज्या उद्देशांनी या सर्व गोष्टी केलेल्या आहेत, तो उद्देश लक्षात घेतला तर त्यांचा सहज निरास व्हावा काही असो, परंतु नवटीकेचे सामर्थ्य अजमावण्यासाठी प्रस्तुत रसग्रहणात्मक पुस्तकाचा फार मोठा उपयोग होणार आहे. आणि त्या दृष्टीने गंगाधर गाडगीळांचे हे पुस्तक फार महत्त्वाचे आहे.

नव्या टीकामूल्यांनी केलेल्या रसग्रहणात्मक पुस्तकानंतर जुन्या टीकापद्धतीने समीक्षण केले असता ते कशा प्रकारचे होऊ शकते याचा प्रत्यय देणाऱ्या समीक्षणात्मक ग्रंथाकडे वळणे योग्य होईल. हा ग्रंथ म्हणजे द. रा. गोमकाळे यांचा 'अत्रे आणि मराठी रंगभूमी' हा. जुनी टीका भोंगळ, पसरट, सर्वसंग्राहक, आणि पुन: अस्पष्ट कशी होऊ शकते याचा हा एक नमुना. जुन्या टीकापद्धतीने मर्यादित स्वरूपात का होईना पण चांगले रसग्रहण करता येत नाही असे नाही. या वर्षीच्या ग्रंथांत तशा प्रकारचे अर्वाचीन वाङ्मयाचे रसग्रहण करणारे एखादे पुस्तक असते तर नव्या-जुन्या टीकापध्दतींनी केलेल्या रसग्रहणांचा तौलनिक अभ्यास करता आला असता. परंतु गोमकाळे यांचे पुस्तक त्या दृष्टीने उपयोगी नाही; नव्हे, जुनी टीकापद्धती किती बेंगरूळ रसग्रहण करू शकते याचा हा जणू एक दाखला आहे. प्रस्तुत ग्रंथात अत्रे यांच्या नाटकांचे वाङ्मयीन मूल्य, प्रायोगिक मूल्य आणि त्यांनी मराठी रंगभूमीवर केलेला परिणाम हा मुख्य विषय असावा. असावा म्हणण्याचे कारण त्यांचे यासंबंधीचे नक्की निष्कर्ष काय आहेत ह्याचा नीट बोध होत नाही. मात्र अत्र्यांच्याबद्दल अमाप उत्साह आहे. अनेक आठवणींचा पाल्हाळ आहे. नाट्यावरील अनेक इंग्रजी-मराठी ग्रंथांचे भरपूर वाचन केलेले आहे. त्यांतील उतारेही ठिकठिकाणी दिले आहेत. पण त्या साऱ्यामधून एखादा सिद्धान्त नेमका व्यक्त व्हायला हवा तो होताना दिसत नाही. उदाहरणार्थ, अत्र्यांच्या नाटकांचा सर्वांगीण विचार करण्यासाठी म्हणून 'समीक्षणाची दृष्टी, दृष्टिकोन, मर्यादा, निर्णायक निकष' असे एक मोठे प्रकरण आहे. त्यात अनेकांचे अनेक उतारे आहेत; पण त्यांतील कोणता निश्चित निकष गोमकाळे मानतात हे स्पष्ट होत नाही, अत्र्यांची 'सुखात्म नाटके,' 'गंभीर नाटके,' 'संवाद, भाषा, संगीत' इत्यादींवरील मोठमोठी प्रकरणेही आढळतात. प्रत्येकात पुन: कथानक, स्वभावचित्रण इत्यादि अलग-पणे येतातच. परंतु या सर्वांतून ४००–४२५ पानांच्या पुस्तकाच्या अखेरीलाही अत्र्यांच्या नाट्यकर्तृत्वाचे 'यशापयश (त्या नावाचे अखेरचे एक प्रकरण असले तरी) काटेकोरपणे स्पष्ट होत नाही. मात्र अत्र्यांच्या नाट्य-प्रयोगातील आजही दुर्मिळ झालेले काही फोटो जे ग्रंथाला जोडले आहेत, ते महत्त्वाचे आहेत. सारांश, जुन्या टीकापद्धतीत जे काही अंगभूत दोष आहेत, त्यांचा विशिष्ट रीतीने परिपाक कसा होणे शक्य आहे, याचे हा ग्रंथ म्हणजे एक उदाहरण होय.

या वर्षीच्या रसग्रहणात्मक ग्रंथांत संस्कृत व उर्दू वाङ्मयाचे रसग्रहण करणारे ग्रंथही आहेत, ही एकापरी विशेष गोष्ट आहे. पैकी संस्कृत नाट्याचे सौंदर्य के. ना. वाटवे यांनी दाखविले आहे, तर उर्दू काव्याचा रसग्रहणात्मक परिचय सेतुमाधवराव पगडी यांनी करून दिला आहे.

के. ना. वाटवे यांचा 'संस्कृत नाट्य-सौंदर्य' हा ग्रंथ अनेक दृष्टींनी महत्त्वाचा वाटतो. एक तर तो संस्कृत वाङ्मयाचा संस्कृत साहित्यशास्त्राच्या आधारे रसग्रहण करणारा आहे. संस्कृत वाङ्मय व संस्कृत साहित्यशास्त्र यांचा मराठी वाङ्मय व मराठी टीका यांवर झालेला संस्कार लक्षात घेतला तर निवळ टीकावाङ्मयाच्या दृष्टीनेही मला हा ग्रंथ विशेष लक्षात घ्यावासा वाटतो.

प्रस्तुत ग्रंथाचे लेखन मुख्यत: प्रौढ जिज्ञासू वाचकांसाठी केले आहे. साहजिकच ग्रंथाचे दोन भाग करून एकात संस्कृत नाट्यशास्त्राचे स्वरूप दाखवून नंतर समग्र नाट्यवाङ्मयाचे धावते समालोचन केले आहे. विशेष म्हणजे यात भरताच्या नाट्यशास्त्राधारे संस्कृत नाट्याचा उगम, त्याची लक्षणे, त्याचे प्रयोजन, त्याचे निरनिराळे प्रकार वगैरे व पुन: प्राचीन नाट्यगृह व रंगभूमीची सजावट वगैरेंची थोडक्यात माहिती दिली आहे. दुसऱ्या भागात संस्कृतमधील प्रसिद्ध नऊ नाटकांचे व्यक्तिश: रसग्रहण केले आहे. या रसग्रहणात, अर्थात नाटककार – परिचय, संविधानक, स्वभावपरिपोष आणि रसपरिपोष आणि अखेर त्या त्या नाटकांतील काही सुभाषिते देऊन संस्कृत नाट्यवाङ्मयाचे समग्र दर्शन दिले आहे. विशेष म्हणजे पाश्चात्य नाट्यवाङ्मयापासून वा साहित्यशास्त्रापासून मिळालेल्या दृष्टीचा संस्कृत साहित्यशास्त्र वा संस्कृत नाट्यवाङ्मय यांच्याशी संकर न करता हे सारे साधले आहे. मराठी टीकावाङ्मयाच्या दृष्टीनेही हे निवळ संस्कृत साहित्यशास्त्राच्या पद्धतीने संस्कृत साहित्यशास्त्राच्या मर्यादा दाखवून व पुन: त्या लक्षात घेऊन संस्कृत नाट्यवाङ्मयाचे केलेले हे रसग्रहण महत्त्वाचे ठरावे.

संस्कृत वाङ्मयाच्या रसग्रहणाप्रमाणेच उर्दू वाङ्मयातील काही कवींचा व काही कलाकृतींचा रसग्रहणपूर्ण परिचय करून देणारे श्री. सेतुमाधवराव पगडी यांचे दोन ग्रंथ या वर्षी प्रसिद्ध झाले आहेत. एक 'उर्दू काव्याचा परिचय' व दुसरा उर्दू साहित्यावरील स्फुट लेखांचा 'मणिकांचन' नावाचा लेखसंग्रह. उर्दू काव्यरचनेची सुरुवात प्रथम दक्षिणेतच झाली. परंतु या ना त्या कारणाने मराठी वाचकांना उर्दू साहित्याचा व्हावा तसा परिचय आजवर झालेला नव्हता तो करून देण्याचे काम उर्दू साहित्याचे एक रसीले अभ्यासक सेतुमाधवराव यांनी सुरू केले आहे. त्याचाच भाग म्हणजे वर उल्लेखिलेले त्यांचे दोन ग्रंथ. पैकी 'उर्दू काव्याचा परिचय'मध्ये सौदा, मीर मोमीन, दाग, इक्बाल, जिगर इत्यादि उर्दू कविश्रेष्ठांचा व त्यांच्या काव्याचा भरपूर उदाहरणांसह परिचय करून देण्यात आला आहे. शिवाय गजल, मस्तवी इत्यादि पद्यप्रकारांचीही चर्चा केलेली आहे. विशेष म्हणजे या सर्वांत विवेचनापेक्षा रसग्रहणाला अधिक महत्त्व दिले गेले आहे. 'मणिकांचन'मधील लेखांची प्रकृतीही मुख्यत: हीच आहे. परंतु त्यात ज्या उर्दू-फारसी कलावंतांवर भारतीय संस्कृतीचा प्रभाव पडू लागला, व साहित्य, शिल्प, संगीत, चित्रकला इत्यादि क्षेत्रांत देवाण–घेवाण झाल्याने जे फारसी कवी भारतीय संस्कृतीत प्रभावित झाले, त्यांचा परिचय यात करून दिलेला आहे. उदा० नलदमयंतीवर फारसीतून महाकाव्य लिहिणारा फैजी, रामायणाची रचना फारसीतून करणारा मुल्ला मसीदा, किंवा उपनिषदांचा फारसीत अनुवाद करणारा दारा सिकोह यांचा उदाहरणादाखल

उल्लेख करता येईल. याशिवाय काही उर्दू कादंबऱ्या व उर्दू रंगभूमी यांचाही परिचय आढळेल.

प्रस्तुत दोन्ही ग्रंथांना योजलेली रसग्रहणाची पद्धती परंपरागतच आहे. परंतु या रसग्रहणातून फारसी – उर्दूतील साहित्याचे वैशिष्टच व सौंदर्य दाखविणे एवढा माफक उद्देश असल्याने व तो यशस्वी झाल्याने मराठी रसग्रहणात्मक वाङ्मयात यांचीहि भर महत्त्वाची ठरावी. कारण निरनिराळ्या भाषांतील साहित्याच्या सौंदर्यदर्शनाने साहित्याच्या स्वरूपाबद्दलच्या जाणीवा सुस्पष्ट होत जातात व त्यातून टीकाविचाराला मदत होऊ शकते.

१९६२ सालच्या टीकावाङ्मयाच्या समालोचनात या सालात प्रसिध्द झालेल्या आणखी दोन ग्रंथांचा उल्लेख करणे अवश्य वाटते. पैकी 'अप्रकाशित गडकरी' या ग्रंथाने गडकऱ्यांचे बरेच अप्रकाशित साहित्य प्रकाशात आणले आहे.. त्यात गडकऱ्यांच्या अर्धवट राहिलेल्या कथा, कादंबरी, नाटच यांचे तुटक भाग आहेत, त्यांच्या अभ्यासाची टिपणे आहेत, रोजनिशीतील काही पाने आहेत, व गडकऱ्यांनी इतरांना लिहिलेली, तशीच इतरांनी गडकऱ्यांना लिहिलेली पत्रे आहेत. हे सर्व साहित्य तुटक असले तरी विविध आणि वैचित्र्यपूर्ण आहे. आणि म्हणूनच गडकऱ्यांच्या कलानिर्मितीच्या प्रक्रियेवर प्रकाश पाडू शकणारे वा तिचा मागोवा घेणारे आहे. समग्र गडकरी वाङ्मयाचे यथार्थ मूल्यमापन अजूनपर्यंत झालेले नाही असे म्हटले तर वावगे होऊ नये. हे मूल्यमापन जेव्हा केव्हा होईल तेव्हा त्याला आजवर अज्ञात असलेल्या व गडकऱ्यांच्या अंतर्मनाचा मागोवा घेऊ शकणाऱ्या ह्या साहित्याचा फार उपयोग होऊ शकेल. मराठी टीकावाङ्मयाच्या दृष्टीनेही अप्रकाशित गडकरी हा ग्रंथ फार मोलाचा वाटतो तो यासाठी. कवीच्या काव्यातील काही शब्दसंहतीवरून वा अन्य काही लौकिक गोष्टींवरून आत्मचरित्रात्मक या नावाने पुढे येणाऱ्या टीकेत जी काही अनुमाने काढली जाणे शक्य असते, त्याला थोडा फार आळा प्रस्तुत कलावंताच्या व त्याच्या कलेच्या यथार्थ दर्शनाला याने मदत होणार आहे.

मराठी टीकावाङ्मयाला उपकारक ठरणारा या सालातील दुसरा ग्रंथ म्हणजे कृ. वा. मराठे यांनी लिहिलेले बालकवींचे चरित्र. वस्तुतः हा चरित्रग्रंथ आहे. तेव्हा याचा उल्लेख प्रस्तुत टीकावाङ्मयाच्या समालोचनात येण्याचे कारण नाही. परंतु या ग्रंथाने बालकवींच्या कवितेच्या रसग्रहणाला मदत होण्याची शक्यता आहे. कारण त्यातून त्यांच्या कवितांच्या जन्माचा इतिहास मिळण्याची शक्यता आहे. कृ. बा. मराठ्यांनी बालकवींच्या जीवनातील अज्ञात गोष्टींचा जो काही थांगपत्ता लावला आहे व विशेषतः याला ग्रंथाच्या अखेरीला बालकवींची जी पत्रे त्यानी दिली आहेत त्या सर्वांची या गोष्टीला फार मदत होणार आहे. मराठ्यांनी प्रस्तुत ग्रंथात 'बालकवींची कविता' या नावाचे जे प्रकरण लिहिले आहे व त्यात नव्या पद्धतीने काही कवितांचे जे रसग्रहण केले आहे, ते मोठे लक्षणीय आहे. मर्ढेकरांसारख्या नवकवीलाही बालकवी हे खरे आणि पहिले व अखेरचे असे एकमेव नवकवी वाटले. अशा नवकवीच्या – म्हणजे बालकवींच्या – अनन्यसाधारण– केवल – कवितांचे (शुद्ध कवितांचे) नव्या टीकापद्धतीला जवळ जाईल अशी रीतीने जे रसग्रहण केले आहे ते मराठी टीकावाङ्मयात उल्लेखनीय ठरावे.

१९६२ च्या टीकावाङ्मयाचे स्वरूप सामान्यतः या प्रकारचे आहे. प्रस्तुत समालोचनात मुख्यतः भर आहे तो टीकावाङ्मयातील वृत्तीप्रवृत्तीवर. ग्रंथांचे उल्लेख करावे लागले ते केवळ त्यांच्या स्पष्टीकरणासाठी. कदाचित

काही ग्रंथ अनवधानाने राहिले असणे अशक्य नाही. परंतु मराठी टीकावाङ्मयातील प्रवृत्तींच्या या आलेखात ग्रंथांच्या उल्लेखा-नुल्लेखाला विशेष महत्त्व असू नये. तसेच, प्रस्तुत समालोचनात जर कुठे कुणाला खटकेल असे मत व्यक्त झाले असेल, तर ते त्या विशिष्ट लेखनप्रवृत्तीला अनुलक्षून आहे. लेखकांना वैयक्तिकरीत्या उद्देशून नाही हेही लक्षात घेतले जावे. मराठी टीका दिवसेदिवस बदलत आहे, विकास पावत आहे. कला-वाङ्मयाप्रमाणे तीही हळूहळू कलाबाह्य मूल्यांचा त्याग करून खास स्वतःची अर्थी मूल्ये शोधीत आहे. अर्थात या शोधात तिने आजवर थोडीफार मजलही मारली आहे. परंतु या मजल दरमजलीत तिला कधी इतर मूल्यांच्या बरोबरीने चालावे लागते, तर कधी त्यांच्याशी तंडावेही लागते. आणि या साऱ्यांचे दर्शन कमीजास्त प्रमाणात १९६२ सालच्या टीकावाङ्मयात दिसते आहे.



# ललित गद्य

वा. कृ. गलगली

ललित गद्य-साहित्याचा एक गुलदस्ता समोर आहे. त्यात संगीताचे रसग्रहण कर-णारी तीन पुस्तके आहेत. तीन पुस्तकांतली पाने विनोदाने हसतात. एकात वाङ्मयीन टीकेचा मसाला आहे, आणखी एकात प्रवास-वर्णन आढळते तर एकात लघुनिबंधाचा संग्रह सादर करण्यात आला आहे. आणि शेवटच्या पुस्तकात तर गुजगोष्टी, विनोद, वाङ्मयटीका वगैरे प्रकारांची मिसळ आहे.

मराठी गद्याचा इंग्रजी अवतार आपल्या-कडे झाला तेव्हापासून त्यात विविधता आणि वैचित्र्य यांचे वैपुल्य दिसून येऊ लागले. नियतकालिके आणि रेडिओ यांच्यासाठी साहित्याची मागणी येऊ लागली. त्यातूनही लेखनाचे विविध प्रकार प्रचारात येऊ लागले. साहजिकच ललितगद्य वाङ्मयाचे काटेकोर वर्गीकरण आणि नामकरण करणे कठीण होऊ लागले. म्हणूनच या पुस्तकांबद्दल सांगताना 'ललित गद्य साहित्याचा गुलदस्ता' हा शब्द प्रयोग करणे सोयीचे वाटते.

### संगीत चर्चा

'नादलुब्धाच्या आठवणी' या छोट्या पुस्तकात प्रो. ना. सी. फडके यांनी आपल्या संगीत-साधनेच्या मुशाफरीतील काही रम्य स्मृतिचित्रे रंगवली आहेत. आज प्रो. फडके हे मुख्यतः साहित्यिक म्हणून सर्वांना परिचित झाले आहेत. पण संगीताची त्यांना इतकी विलक्षण आवड आहे आणि त्याच्या व्यासंगा-साठी त्यांनी इतकी धडपड केली आहे, की एकेकदा वाटते, जर त्यांच्या जीवन-संगीताचा ताल थोडा बदलला असता तर आज ते उस्ताद नारायणबुवा फडके झाले असते! पण काहीतरी चुकले–अगर काहीतरी घडायला पाहिजे ते घडले नाही आणि त्यामुळे त्यांची भूमिका गायकाची न बनता-

रसिक, चोखंदळ आणि जाणकार श्रोत्याची बनली.

प्रो. फडके यांच्या संगीत-मुशाफरीत केवळ गायन नसून वादनही आहे आणि नर्तनही आहे. वादनात देखील फ्ल्यूट, हार्मोनियम, सतार, तबला इत्यादि विविध वाद्ये आहेत. त्याचप्रमाणे गायनाच्या क्षेत्रात केवळ ख्याल-ठुमरी नसून गज्जल-कवालींचा ढंगही आहे. संगीताचे मनमुराद सेवन करण्याच्या वेडापायी त्यांनी लौकिक प्रतिष्ठेची पर्वा केली नाही. शिष्टसंमत नसलेल्या जागी ते गेले आणि शिष्टजनांत न मोडणाऱ्या व्यक्तींची कला जवळून पाहिली. कलानंदाचा आस्वाद घेण्यासाठी पांढरपेशा वर्गातल्या प्रोफेसरांनी अशी कलंदर वृत्ती दाखवावी ही गोष्ट खास धाडसाची.

नादलुब्धाच्या आठवणी वाचताना वाचकांचे मन अनेक ठिकाणी लुब्ध होऊन तेथेच रेंगाळत राहते. खानसाहेब अल्लादिया, अब्दुल करीम, श्री. गोविंदराव टेंबे, हिराबाई बडोदेकर, भास्करराव बखले, सिद्धेश्वरीबाई यांसारख्या संगीताच्या दरबारातील मानकऱ्यांच्या निकट सहवासात प्रो. फडके आले. या सहवासातील काही अविस्मरणीय क्षणांचे मनोज्ञ चित्रण यात आलेले आहे. या मानकऱ्यांच्या कलेचे स्वरूप आणि त्यांची वैशिष्टये या गोष्टीवर जाता जाता प्रकाश टाकण्यात आला आहे. वर उल्लेखिलेले सगळेच कलावंत आपल्या क्षेत्रात चमकले. पण तुंगा आणि मेनका या दोन कलावतींचे ' पुढे काय झाले वर्तमान ' हे कळत नाही.

नादलुब्धाच्या आठवणी हे एका दृष्टीने प्रो. फडके यांच्या आत्मचरित्राचे एक प्रमुख अंग आहे. या अंगात त्यांचे अंतरंगातले रंग मिसळले असल्याने पुस्तक चटकदार उतरलेले आहे.

या आठवणी वाचून संपता संपता मात्र एक खिन्नकारक विचार मनाला ग्रासतो — तसा तो प्रो. फडके यांनाही ग्रासला आहे. तो विचार हा की — पूर्वीच्या गायनवादनाचा तो वैभवशाली जमाना आज गुदरून गेला ! पण प्रश्न असा पडतो की, केवळ गतवैभवाबद्दल उसासे टाकून काय होणार ? आजच्या संगीतात पूर्वीसारखे वैभव नसेल, पण आजची संगीतकला नववैभवाने समृद्ध व्हावी यासाठी प्रयत्न करायला नको काय ? आणि या प्रयत्नात प्रो. फडके यांच्यासारख्या अनुभवी रसिकांनी पुढाकार घ्यायला नको काय ?

' मुजरे ' हा संग्रह नादलुब्धाची पुरवणी म्हणण्यासारखा आहे. यातही नथ्थनखाँ, अल्लादियाखाँ, भास्करबुवा, गोविंदराव टेंबे, बालगंधर्व, विलायतहुसेन, मास्तर कृष्णराव या कलावंतांच्या जीवनाबद्दल आणि कलेबद्दल विवेचन आहे. अर्थातच यात नादलुब्धातल्याइतके आत्मनेपदी निवेदन नाही. श्री. टेंबे यांच्यासंबंधी प्रो. फडके यांनी दोन वर्षांपूर्वी पुण्याच्या साहित्य परिषदेत जी व्याख्याने दिली होती तिच्याच आधारे तयार केलेला सविस्तर लेख या संग्रहात आहे.

संगीत आणि नाटक क्षेत्रांतील मंडळीव्यतिरिक्त इतर क्षेत्रांतले पाच परिचय या संग्रहात आढळतात. पहिला परिचय लो. टिळकांसंबंधीचा आहे. त्यात लोकमान्यांची लेखनशैली कोणत्या स्वरूपाची होती याबद्दल थोडक्यात सुंदर विवेचन आहे. नकलाकार भोंडे, क्रिकेटर सी. के. नायडू आणि चित्रपट कलेचे भाग्यविधाते बाबूराव पेंटर व मास्टर विनायक यांच्या परिचयात त्यांच्या कर्तृत्वाच्या व व्यक्तित्वाच्या छटा चांगल्या प्रकारे दिसतात.

व्यक्ति-परिचयात्मक लेखांना ललित गद्यात मूर्धन्यस्थान द्यावे लागेल. चरित्र आणि टीका या दोन प्रकारांचे छोटेखानी मिश्रण म्हणजे परिचयलेख. नीरस चरित्रे आणि क्लिष्ट टीका यांचे पीक सालोसाल अगाप येतच आहे. पण अशा चरित्रांत माणूस आढळत

नाही आणि अशा टीकेत माणुसकी दिसत नाही. माणूस आणि त्याच्या व्यक्तित्वाचे मूल्यमापन चांगल्या परिचयलेखात होऊ शकते. प्रो. फडके यांचे या संग्रहातले लेख या दृष्टीने यशस्वी झाले आहेत.

श्री. केशवराव भोळे हे संगीतातले एक मुरब्बी आहेत. मुरब्बी माणसे पुढे मुत्सद्दी म्हणून यश मिळवणारी बनतात. श्री. केशवरावांनी संगीत क्षेत्रात यश संपादन केले पण ते मुत्सद्देगिरीच्या जोरावर नसून प्रामाणिक प्रयत्नाने व जिद्दीने. श्री. केशवरावांच्या बोलण्या–लिहिण्यात आत–बाहेर निराळेपणा नसतो. ते मनातलेच बोलतील व लिहितील. धोरण म्हणून किंवा केवळ उपचार म्हणन ते आपली मते लपवून ठेवणार नाहीत. संगीताच्या क्षेत्रात असे वागणे म्हणजे एका प्रकारे असिधाराव्रत आचरणेच होय. पण श्री. केशवरावांनी ते निष्ठेने आचरले. परिणामी त्यांची लेखणी असिधारेप्रमाणे काहीजणांना घायाळ करते, पण त्याला इलाज नाही.

श्री. केशवरावांच्या या 'अस्ताई'त एकूण अकरा लेख आहेत. त्यात केवळ संगीताचे रसग्रहणच नव्हे तर संगीताची शास्त्रीय चर्चाही आहे. ही शास्त्रीय चर्चा कुठेही रूक्ष झाली नाही हे विशेष. भास्करबुवांवरचा त्यांचा लेख हा या संग्रहातला सर्वोत्कृष्ट लेख म्हणावा लागेल. पंडित विष्णु दिगंबर, रामकृष्णबुवा वझे, फैयाझखाँ यांच्या गायकीचे स्वरूप कोणत्या प्रकारचे आहे आणि तिची वैशिष्ट्ये काय आहेत याची साधार पण सरस माहिती या ग्रंथावरून मिळते. 'अभिजात संगीत आणि महाराष्ट्र' हा या लेखसंग्रहातला पहिलाच लेख असून त्याची व्यापकता आणि महत्त्व ही दोन्ही उल्लेखनीय वाटतात.

बैठकीतले गाणे, नाटकातले गाणे, चित्रपटातले गाणे आणि रेडिओचे गाणे या चारही प्रकारांचा परामर्श श्री. केशवराव घेऊ शकतात. जुनं चांगले ते गेले याबद्दल फारसा विषाद ते मानीत नाहीत. उलट संगीतिकासारखे नवे प्रयोग कसे रूढ व यशस्वी होतील याबद्दल ते विधायक सूचनाही मांडतात. या संग्रहातले लेख वेळोवेळी निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले होते. ते जसेच्या तसे या पुस्तकात न देता त्यांतल्या काही लेखांचे थोडे संस्करण केले असते तर बरे झाले असते. चित्रकार श्री. राजा मराठे यांनी पुस्तकाची सजावट नावीन्यपूर्ण रीतीने केली आहे.

**विनोद**

आजचे प्रमुख विनोदी लेखक कोण? या प्रश्नाला बहुतेक सारेजण 'पु. ल. देशपांडे' असे उत्तर निश्चित देतील. त्यांच्या विनोदी लेखांत व गोष्टींत विनोद आढळणे आवश्यकच होते. त्यांच्या नाटकांत विनोद आहे, कवितांत आहे, भाषणांत आहे आणि प्रवासवर्णनांतही आहे. एकूण पु. ल. म्हणजे सर्वत्र विनोद असा समज रूढ होऊ पाहत आहे. 'व्यक्ति आणि वल्ली' हा त्याच पु. लं. नी लिहिलेल्या व्यक्तिचित्रांचा संग्रह.

एकूण अठरा व्यक्तिचित्रे यात समाविष्ट आहेत. त्यांच्या द्वारे अठरापगड जातींचा नसला तरी अठरापगड प्रकृतीच्या व्यक्ती वाचकांसमोर येतात. त्यात नामू परीट आहे, चितळे मास्तर आहेत, मवाली बबडू आहे, पडेल ते काम करणारा नारायण आहे, पत्रकार लखू रिसबूड आहे. त्यात काही खास बंबैवाल्या चिजा आहेत तर अंतू बर्वासारखा कोकणी बाण आहे. मात्र यात एकही बाई नाही! नाही म्हणायला 'ते चौकोनी कुटुंब' या प्रकरणात मालतीबाईचा थोडा प्रपंच रंगवण्यात आला आहे, पण एकूण सारा मामला पुरुषांचा! अतिविशाल महिलामंडळ किंवा तत्सम स्थानी पु. लं. ना अठरापगड विदुषी दिसल्या नसतील असे कसे म्हणावे? पण का कोणास ठाऊक, त्यांनी या ग्रंथात तरी स्त्रीदाक्षिण्य दडवून ठेवले आहे!

याची भरपाई अर्थातच ते अधिक चांगल्या प्रकारे करू शकतील.

या संग्रहातल्या व्यक्ती कोण आणि वल्ली कोण हे ज्याने त्याने स्वतःशी ठरवावे. सर्वांचीच चित्रणे यथायोग्य वाटतात. मात्र व्यक्तिचित्रणाचा ठराविक विनोदी साचा बनू नये एवढीच अपेक्षा आहे. कारण विनोद साचेबंद झाला की तो अर्धमेला झालाच.

शामराव ओक हे दुसरे प्रसिद्ध मराठी विनोदकार. ते पु. ल. देशपांडे यांचे ज्येष्ठ मित्र. हे मित्रत्वाचे नाते लक्षात घेतले तर स्वतः श्री. पु. ल. देशपांडे यांच्या विनोदाची घाटणी लक्षात येईल, आणि चिं. वि. जोशी यांच्यासारख्या अस्सल विनोदी साहित्यिकापेक्षा त्यांची आणि श्री. ओकांची विनोदाची जात वेगळी कशी हे समजू शकेल. "श्रीपाद कृष्णांचे संस्कार अजिबात न घेता परंतु अत्यंत यशस्वी विनोदी लेखन केलेले मराठीतले एकमेव विनोदी लेखक म्हणजे चिंतामणराव जोशी" असे या पुस्तकाच्या प्रस्तावनेत स्वतः पु. ल. देशपांडे यांनीच म्हटले आहे. पु. लं. ची प्रस्तावना आणि शामराव ओकांचे विनोदी लेख यामुळे 'शामराई' या पुस्तकाला आगळी शोभा आली आहे.

'व्यक्ति आणि वल्ली'मधील श्री. पु. लं. चा विनोद एकच प्रकारचा, व्यक्तिचित्रांची चौकट सजवणारा आहे, तर शामराईत विनोदाची विविधता आहे. त्यात एस्. पी. एस्. मणि यांच्यासारखी व्यक्तिचित्रे आहेत, दुग्धमंदिरातील प्रेमकथांसारखे कथासाहित्य आहे. निवृत्ति – निवास, वायकांची व्यायामशाळा यांसारख्या संस्था आहेत, कोंडिबा टिनमेकर, लोकसेवा वगैरेसारख्या नाटिका आहेत. शिवाय मानापमान पुरवणी, मामा वरेरकर यांची क्षमा मागून सांगितलेली 'कुठे गेला बाहु वी?' ही गोष्ट आहे. 'शीतात्मक श्रेष्ठता' वगैरे उच्चभ्रू विनोद आहे. सूक्ष्म उपहास अगर परिहासविजल्पित हे श्री. शामरावांच्या विनोदाचे अस्तर. मानवी स्वभावातील सूक्ष्मतेवर, विसंगतीवर आधारलेला व सर्वांना सहज कळणारा--सर्वांच्या जीवनांत असलेला विनोद आणि पुणे-मुंबईसारख्या विशिष्ट क्षेत्रांत आणि समाजाच्या विवक्षित भागात आढळणारा आणि बुद्धिगम्य वाटणारा विनोद असे दोन ढोवळ भाग पाडले तर शामराई दुसऱ्या भागात मोडेल. यांपैकी कोणता विनोद-प्रकार श्रेष्ठ मानावा यात मतभेद होण्याचा संभव आहे. दोन्ही प्रकारांमुळे लोकांना हसवण्याचा धंदा चालतो. सध्या या धंद्याची—राष्ट्रात आणीवाणी असली तरी—चलती आहे यात शंका नाही.

'गवाळग्रंथा'चे लेखक श्री. वाळ गाडगीळ हे शामराव ओक आणि पु. ल. यांच्या मानाने धाकटे म्हणून नवे. अलीकडे यांच्या साहित्याचा चाहता वर्ग निर्माण होऊ लागला आहे. वास्तविक वाळ गाडगीळ यांचे नाव पु. ल. गाडगीळ. त्यांच्या साहित्यात पु. ल. देशपांडे आणि गंगाधर गाडगीळ या दोघांच्याही साहित्यगुणांचा मिलाफ झाला आहे असे चाहते मानतात. सुदैवाने वाळ गाडगीळ स्वतः तसे मानीत नाहीत यातच त्यांचे वैशिष्ट्य आहे.

गवाळग्रंथातला विनोद हा वहुतांशी बौद्धिक स्वरूपाचा आणि काही अंशी अस्सल पुणेरी आहे. पुणे आणि पुणेकर या नावाचे खास प्रकरणही त्यात आहे. एस्. एस्. सी.त पहिली गाय हा लेख तर दैनिक सकाळच्या बातम्यांना शीर्षक देण्याच्या और प्रकाराची यथोचित टिंगल करणारा आहे. सकाळ पत्राचे एकूण सारेच स्वरूप हास्यकारक किंवा हास्यास्पद असते असा सर्वांचाच अनुभव आहे—स्वतः सकाळकारांना तसे वाटत नाही यातच तर विनोदाचे सारे मर्म आहे. 'मी पत्रकर्त्री कशी झाले?' या लेखातही वर्तमानपत्रासाठी मुलाखती घेणाऱ्यांची आणि त्या

मुलाखतींची टिंगलप्रधान गोष्ट रंगवून सांगण्यात आली आहे.

आपल्या लोककल्याणकारी राज्याचा कारभार हाही 'विकास' आणि 'योजना कशा पाडतात' अशा लेखांचा विनोदविषय झाला आहे. सध्याच्या काळात असली विनोदी टीका आवश्यकच आहे.

'झाड पडले', 'चितू धंद्यात पडला' या लेखांतील विनोद अधिक सूक्ष्म व अधिक वरच्या दर्जाचा वाटतो.

या तीन्ही विनोदी पुस्तकांची मुखपृष्ठे ठीक वाटतात. फक्त 'व्यक्ति आणि वल्ली' या पुस्तकावरील वेष्टनात रंगवल्ली ऊर्फ रांगोळयाच दिसतात. त्यात विनोदाचा अभाव आहे.

**टीका**

महाभारतातील व्यक्तिचित्रण कशा प्रकारचे आहे, त्या व्यक्तीत कोणकोणती वैशिष्टचे आहेत आणि आपल्या महाकाव्याला सजीव, साकार करण्यात व्यासांच्या प्रतिभेचे दर्शन कसे घडते, या गोष्टी श्रीमती दुर्गा भागवत यांच्या 'व्यासपर्वा'त वाचकांपुढे येतात. कृष्ण, भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, युधिष्ठिर, अर्जुन, विदुर, कर्ण, दुर्योधन आणि द्रौपदी या व्यक्तींचा ठसा बहुतांशी सुसंस्कृत भारतीयांच्या मनावर काही ना काही प्रमाणावर उठलेला असतो. मात्र तो महाभारत ही पुराणकथा आहे, धर्मसंस्काराचे ते साधन आहे या रूढ समजुतीमुळे. पण श्री. दुर्गाबाईंच्या विवेचनात धर्म, धार्मिक संस्कार, तत्त्वज्ञान आणि पुराणांतर्गत चमत्कार यांवर मुळीच भर नाही. महाभारताकडे त्या महाकाव्य याच दृष्टीने पाहतात आणि या काव्यातील पात्रांना साहित्यिक व बहुतांशी लौकिक निकष लावून त्यांची वैशिष्टचे सांगतात.

दुर्गाबाईंचे विवेचन व्यासंगपूर्ण, भारदस्त आणि प्रभावी उतरले आहे. त्यांची भाषा बऱ्याच ठिकाणी बोजड पडली आहे आणि काही ठिकाणी विधानांची पुनरुक्ती झाली आहे. हे दोष वगळल्यास 'व्यासपर्वा'ची गणना उत्कृष्ट टीकाग्रंथ म्हणून खचित होईल.

कर्णाचे व्यक्तिचित्रण सर्वांत अधिक सरस उतरलेले आहे. परीकथेतून वास्तवाकडे अर्जुनाची वाटचाल दाखविण्यात श्री. दुर्गाबाई अर्जुनाच्या व्यक्तिमत्त्वावर नवा व निराळा प्रकाश पाडतात. अश्वत्थाम्याच्या चिरंजीवित्वाची शोकांतिकादेखील नवे वैशिष्टच दाखवते. कृष्णाला त्यांनी पूर्ण पुरुष म्हटले आहे. मात्र हा पूर्ण पुरुष आजच्या जगात फिरताना पाहावा, तो आला तर जगात सुख मिळेल असे त्यांना वाटत नाही. अर्थात हे विधान वैयक्तिक मताचे प्रदर्शक म्हणून ठीक असले तरी वादग्रस्त ठरेल किंवा अप्रस्तुतही ठरेल. महाभारतातील पात्रप्रसंगांना आजच्या स्थळ-काळ-परिस्थितीची चौकट लावणे खरे म्हणजे अशास्त्रीय. द्रौपदी आणि कृष्ण यांचे नाजूक संबंध थोडेसे उघडपणे सांगण्यात आले आहेत. त्यात तर्काचा भाग किती आणि पुराव्याचा भाग किती याबद्दल शंका येते. कुंतीबद्दलचे विवेचन ओझरते आहे. वास्तविक तिच्याबद्दल स्वतंत्र व संपूर्ण प्रकरण हवे होते. ती राज्यकन्या, राजपत्नी, राजमाता असूनही तिच्या वाटयाला प्रारंभापासून दुःखेच आली आहेत आणि असे असूनदेखील विपदः सन्तु नः शश्वत् — माझ्या वाटयाला निरंतर दुःखेच येऊ देत असे ती मागणे मागते. तिची उदात्तता आणि तिचा आदर्श महाकाव्याला साजेसा आहे. कुंतीसारखी उदात्त सासू आणि द्रौपदीसारखी अनुदात्त सून यांचे सहजीवन कशाप्रकारचे झाले असेल या जिव्हाळयाच्या प्रश्नावरही दुर्गाबाईंनी लिहायला हवे होते.

ग्रीक पुराणे आणि बुद्धकथा यांचा उल्लेख श्री. दुर्गाबाईंनी काही ठिकाणी केलेला आहे.

या उल्लेखांवरून त्यांचा व्यासंग दिसून येत असला तरी ते आवश्यक वाटत नाहीत. ग्रीक पुराणातील व्यक्ती आणि महाभारतातील व्यक्ती यांचे साम्यविरोध हा विषय सर्वस्वी वेगळा आहे. शिवाय बहुसंख्य वाचकांना ग्रीक पुराणांची कुळकथा परिचित नसल्याने हे संदर्भ अधांतरी वाटतात.

महाभारतासारख्या अफाट पसरलेल्या काव्यातून सुसंगत व्यक्तिचित्रण वेगळे काढणे आणि त्यातले रंग आणि ढंग वाचकांना दिसतील असे मांडणे हे खरोखर मोठे अवघड काम. हे काम श्री. दुर्गाबाईंनी यशस्वी रीतीने पार पाडल्याबद्दल त्यांचे अभिनंदन केले पाहिजे. सबंध पुस्तक वाचून खाली ठेवताना सहज विचार मनात येतो की, व्यासांनी हजारो वर्षांपूर्वी अशी कलाकृती निर्माण केली. आज आपण इतके शिकलो, सुधारलो, साधनसंपन्न झालो तरी व्यासांच्या प्रतिभेच्या अल्पांशानेही आपल्या साहित्यिकांत प्रतिमा का आढळू नये ?

**प्रवासवर्णन**

'चिनारच्या छायेत' हे श्री. श्रीपाद जोशी यांचे प्रवासवर्णनात्मक पुस्तक. पण 'प्रवासवर्णन' हा शब्द प्रस्तुत पुस्तकाबाबत ढोकळ मानाने वापरावा लागेल. कारण प्रत्यक्ष काश्मीर पाहण्यापूर्वी श्री. जोशी यांनी काश्मीरबाबत जसे लिहिले होते तसेच काश्मीर पाहिल्यावरही या ग्रंथात लिहिले आहे, असा सामान्य वाचकांचा ग्रह होतो. प्रस्तुत पुस्तकात त्यांच्या प्रवासाचा थोडा उल्लेख आहे–काही स्थळांचे आणि माणसांचे संदर्भ आहेत आणि एका प्रकरणात प्रवासाची रोजनिशीही आहे. पण प्रवासाचा प्रत्यय वाचकांच्या मनात ठसवण्याचे सामर्थ्य मात्र त्यांच्या लेखणीत नाही. किंबहुना पु. ल. देशपांडे, अनंत काणेकर, रा. भि. जोशी, गंगाधर गाडगीळ यांसारख्या लेखकांनी प्रवासवर्णन या लेखनप्रकाराला जो कलात्मक घाट दिला आहे त्याचा थोडाही आढळ चिनारच्या छायेत नाही. लघुनिबंध अगर गुजगोष्टीप्रमाणेच प्रवासवर्णन प्रभावी उतरण्यास लेखकाचे व्यक्तिमत्त्व प्रभावी हवे असते. प्रथितयश लेखकांनाच प्रभावी व्यक्तिमत्त्व लाभलेले असते असे मुळीच नाही. इतरांच्या अंगीही ते असू शकते, पण ते व्यक्त करण्याची हातोटी सर्वांना साधतेच असे नव्हे. श्री. जोशींना हे साधले नाही.

शिवाय प्रवासवर्णन हे संदर्भग्रंथाप्रमाणे उपयुक्त ठरावे हा हेतू मनात धरून त्यांनी हे पुस्तक लिहिले आहे. (त्यांचीच प्रस्तावना पाहा). त्यामुळे या पुस्तकाचे स्वरूपच वेडेवाकडे झाले आहे. काश्मीरचा चालू इतिहास, काश्मिरी वाङ्मयाची माहिती वगैरे मोठमोठी प्रकरणे कोणत्याही प्रवासवर्णनाचा अविभाज्य सलग व जिवंत भाग होऊ शकत नाहीत. शिवाय या प्रकरणात अनेकवार चघळून चोथा झालेल्या गोष्टीच ठिकठिकाणी उपशीर्षकांच्या टोप्या घालून येतात. यामुळेच 'चिनारच्या छाये'त काश्मीरच्या सौंदर्याचा रस उतरण्याऐवजी नीरस पाल्हाळ वाचकांच्या वाट्याला येतो.

प्रवासवर्णन हा लेखनप्रकार अलीकडे ललित साहित्याच्या स्वरूपात वाचकापुढे येत आहे. ललित साहित्याच्या कसोटीवर श्री. श्रीपाद जोशी यांचे हे पुस्तक पुरेसे कलापूर्ण ठरले नाही तरी प्रौढ विद्यार्थ्यांना या पुस्तकातली माहिती उपयुक्त वाटेल यात शंका नाही. या पुस्तकाची सजावट श्री. सुधाकर खाजगीवाले आर्टिस्ट यांनी केली आहे. स्वतः श्री. खाजगीवाले देखील काश्मीरला जाऊन आले आहेत. तरी पण काश्मीरचा पुनःप्रत्यय अगर नवप्रत्यय देण्याच्या बाबतीत तेही श्री. श्रीपाद जोशी यांच्यासारखेच अयशस्वी झालेले दिसतात.

लघुनिबंध

'वादे वादे' प्रा. क्षीरसागरांचा हा लघु-निबंध आणि ललितनिबंध यांचा संग्रह. लघु-निबंध म्हणजे गुजगोष्ट असे मानले तर या संग्रहातील बहुतेक निबंध त्या प्रकारात समाविष्ट करण्यास थोडेसे प्रयास पडतील. मात्र ललितनिबंध म्हणजे लालित्याची बूज राखून लिहिलेले छोटे टीकालेख अशी समजूत करून घेतली तर मात्र या संग्रहातील लेखांचा तोंडवळा समजून येण्यास मदत होण्यासारखी आहे. "धूमावृत वन्हीप्रमाणे उज्ज्वल व निष्काम कर्मदेखील दोषग्रस्त कसे होते हे महाकवींच्या लिखाणांतील रम्य प्रसंगांतून चित्रित केलेले असते. त्यांच्या अनेकार्थसूचक काव्यप्रसंगांतून योग्य बोध घेणे आपल्या अल्पमतीवरच सोपविलेले असते व रामायणातील या दैवदुर्विपाकाच्या प्रसंगां-तून पुण्यमार्गी संतास पुण्याचरणामुळेही क्वचित दुःखे सोसावी लागतात, (लक्ष्मण आणि सीता) ही भाषा गुजगोष्टीची म्हणता येईल काय ? खरे म्हणजे टीकालेखालाही असली क्लिष्ट भाषा वापरणे योग्य होणार नाही. या संग्रहाला लघुनिबंध आणि ललितनिबंध म्हटलेले असले तरी त्यात लालित्य फार कमी आढळते आणि लघुनिबंधाची प्रकृती तर त्याहून कमी दिसून येते. 'केवळ लघाळ सलगीची भाषा' वापरल्याने लघुनिबंध उथळ होतो असे प्रा. क्षीरसागरांनी आपल्या प्रस्तावनेत म्हटले आहे. पण विद्वज्जड आणि क्लिष्ट भाषेचे त्यावरून समर्थन होणार नाही. नेहमीच्या बोलण्यातली प्रसन्न भाषा हेच ललित निबंधाचे माध्यम हवे.

क्लिष्ट भाषेप्रमाणेच या संग्रहात आढळ-णारा दुसरा दोष म्हणजे त्यातली इंग्रजी शब्दांची पखरण. 'प्लूरालिस्ट', 'वीक पॉइंट' 'नेकेड ट्रुथ्', 'एनर्जी', 'बेअरिंग', 'अॅलर्ट-नेस', 'इन्ट्रॉस्पेक्शन', 'इन्सिडंट', अशा-सारखे बरेच शब्द पानापानांवर आढळतात.



गुजगोष्टीच्या निकषाला हे निबंध तंतो-तंत उतरणारे नसले आणि विद्वज्जडतेचे आवरण त्यावर पडलेले असले तरी त्यांत बराच विचारप्रवर्तक मसाला आहे. उदा-हरणार्थ, लक्ष्मण आणि सीता, आकर्षक व्यक्तिमत्त्व, कंटाळा, पडद्याची महती हे लेख पाहावे. श्यामवर्ण, एक नूतन विलास या-सारख्या थोड्या लेखांत मात्र पुरेसा खेळकर-पणा उतरला असल्याने त्यांची गणना गुज-गोष्टीत करता येते. सर्वच लेख या पद्धतीचे असते तर बरे झाले असते. एकूण श्री. क्षीर-सागर यांना गुजगोष्टी हा ललित गद्यप्रकार यशस्वी रीतीने हाताळता येईल. मात्र त्यांची विद्वज्जडता आणि तदनुषंगाने आलेली क्लिष्टता यांना पुरेसा संक्षेप हवा.

श्री. अनंत काणेकर यांनी आपल्या विविध लेखसंग्रहास 'पाण्यावरल्या रेषा' असे अन्व-र्थक नाव दिले आहे. यात १९४६ ते १९६२ या कालखंडात निरनिराळ्या नियतकालिकांत लिहिलेले विविध प्रकारचे लेख आहेत. काही विनोदी आहेत, काही व्याख्याने आहेत.

रशियाविषयक आणि वाङ्मयविषयक लेखांचा भाग विशेष महत्त्वाचा वाटतो. लेखक पॅस्तरनॅक, झिवॅगो कादंबरी, रशि-यातील विनोद व टीका वगैरे सात लेखांत रशियातील साहित्यसृष्टीचे थोडेसे दर्शन घडते. काणेकर हे हाडाचे कलावंत—साहि-त्यिक. त्यांना कम्युनिस्ट राजवट कशी पसंत पडेल ? नव्या महाराष्ट्राचे साहित्य, जनता वाङ्मय, कुमार साहित्य, विडंबनकार अत्रे वगैरे वाङ्मयविषयक लेखही उल्लेखनीय वाटतात. शेवटच्या भागात आफ्रिकेविषयी तीन महत्त्वाचे लेख आहेत.

वास्तविक प्रा. काणेकर हे अव्वल दर्जाचे लेखक. पण पुस्तकाचे स्वरूप धेडगुजरी सरमिसळीचे झाल्याने कोणत्याच भागाचा ठसा वाचकांच्या मनावर उमटत नाही. सगळे साहित्य पाण्यावरच्या रेषेसारखे वाटते.

# 'ज्ञानदेवी'तील दोन सुविख्यात ओव्या

अरविंद मंगरूळकर : विनायक मोरेश्वर केळकर

चंद्रातें आंगवणें । भोगुनि चकोर सिहाणे
तऱ्हीं फावे जैसें चांदिणें । भलतेया ।। १८.१७२७
तैसें आध्यात्मशास्त्रीं इयें । एक अंतरंग चि अधिकारिये
येरि लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया ।। १८.१७२८

राजवाडे–प्रत

अन्वय. जैसें चंद्रा तें आंगवणें भोगुनि चकोर सिहाणे, भलतेया तऱ्हीं चांदिणें फावे, तैसें इये आध्यात्मशास्त्रीं एक अधिकारिये अंतरंगचि (भोगुनि सिहाणे); येरि लोक वाक्यचातुर्यें सुखिया होईल.

अर्थ. ज्याप्रमाणे चंद्राची ती अंगजात चंद्रिका ( = अमृतस्राव ) प्राशून चकोर तृप्ती पावतात, इतरांना ( म्हणाल ) तर चांदणे ( मात्र लुटावयाला ) मिळते, त्या प्रमाणे ह्या अध्यात्मशास्त्रामध्ये केवळ (साधन-चतुष्टयसंपन्न) अधिकारी (त्याचा) गाभाच (जाणून समाधान पावतात); इतरे जन (म्हणाल तर ते) वाग्विलासाने ( मात्र) सुखावतील.

टीपा :—चंद्रातें— ' चंद्रा तें ' असा छेद करावा. ' चंद्रा ' हे षष्ठीचे एकवचन. त्याचा संबंध ' आंगवणें ' याशी घ्यावा. ' चंद्रा तें आंगवणें ' म्हणजे ' चंद्राचें तें (अर्थात–सर्व-विख्यात, सर्वलोकप्रसिद्ध असे) आंगवणें. ' ' चंद्रातें ' असे अच्छिन्न चतुर्थ्यंत पद घेऊन ते ' भोगुनि ' याचे कर्म करता येणार नाही, असे नाही. पण मग ' आंगवणें ' याचा ' चंद्रातें ' याशी संबंध तुटेल आणि ते तृतीयान्त एक-वचनी पद घेऊन त्याचा ' स्वाभाविक सामर्थ्याने ' (दांडेकर) ' आपल्या शक्तीने ' (भिडे, साखरे, कुंटे) असा काही अर्थ करावा लागेल. त्या पक्षी ओवीच्या पूर्वार्धाचा संकलित अर्थ ' चंद्राला (आपल्या) स्वाभाविक सामर्थ्याने भोगून चकोर तृप्ती पावतात, ' असा होईल. परंतु याने पुढील दोष उत्पन्न होतात : (१) चकोर चंद्राला म्हणजे चंद्र-बिंबाला भोगितात, असे म्हणणे युक्त नाही. ते चंद्राला भोगीत नाहीत, तर चंद्राच्या किरणांतून अथवा चंद्रिकेतून पाझरणारे अमृताचे कण पितात. पहा : जैसें शारदियेचिये चंद्रकळे । माजि अमृतकण कोवळे । ते वेंचिति मनें मौआळें । चकोरतलगे । १.५६. तसेच, ५.१०६, १३.२७५, ११.९६ पहा. (२) उपमान-उपमेयांच्या राशी जुळणार नाहीत. ते आम्ही पुढे राशी मांडून दाखवू, त्यांवरून स्पष्ट होईल. (३) ' आपल्या स्वाभाविक सामर्थ्याने ' असे म्हणण्यात विशेष मार्मिकपणा नाही. चकोरांच्या अंगी चंद्रिका-मृताचे प्राशन करण्याचे सामर्थ्य असते, हे प्रसिद्धच आहे. शिवाय चकोर आपल्या सामर्थ्याने चंद्राला भोगितात, तसे अधिकारी लोक अध्यात्मशास्त्र कसे आकळितात, हे येथे अनुक्तच राहते. तात्पर्य, ' आंगवणें ' हे तृतीयान्त पद घेणे अयुक्त आहे; आणि ते अशा रीतीने जर तृतीयान्त पद होणार नसेल, तर ते एं-कारान्त प्रथमान्तच पद घेतले पाहिजे आणि मग ते ' भोगुनि ' याचे कर्म केले पाहिजे, हे स्पष्ट आहे.

आंगवणें—आंगवणें ( नपुं. ) ( < अङ्ग ) प्रथमा ए. व. अंगामधून निघालेले, अर्थात अमृत, अमृताचा पाझर. हे ' भोगुनि ' याचे








कर्म. भोगुनि – (१) प्राशून, पिऊन (चकोरांच्या संदर्भात). (२) जाणून (अधिकारिजनांच्या संदर्भात). चकोर — चंद्रकिरणांतील अमृत सेवून राहणारा एक कविसंकेतित पक्षी. सिह्णे – सिहाण (वि.) (< सज्ञान) पुं. प्रथमा अ. व. शहाणे, अर्थात संतृप्त. चंद्रामृतसेवनाची चातुरी केवळ चकोरांनाच माहीत असल्यामुळे चकोर तृप्ती पावतात आणि म्हणून ते शहाणे ठरून जातात, असा भाव. फावे — √ फाव ( < प्र + आप्) वर्तमान. तृ. पु. ए. व. पावे, मिळते, लाभते. चांदिणें — (< चंद्र) चंद्रिका, चंद्रप्रकाश. हा 'फावे' या क्रियापदाचा कर्ता. भलतेया — ( = भले तेया) वाटेल त्याला, इतरे जनांना, आध्यात्मशास्त्रीं इयें — सप्तम्यन्त पदे. अंतरंग — गाभा, मर्म, अंतरंग. प्रस्तुत दोन्ही ओव्यांत मिळून एकच उपमान – उपमेयात्मक मिश्र वाक्य असल्यामुळे उपमानवाक्यांतील 'भोगुनि सिह्णे (होंति)' या पदांचा उपमेयवाक्यात अध्याहार करणे न्याय्यच आहे. अर्थात 'अधिकारिये अंतरंगचि भोगुनि सिह्णे (होंति)' असे मुख्य वाक्य होईल. म्हणून 'सह्याद्रि'– मासिकाच्या मे १९४७ च्या अंकात न. चिं. केळकरांनी जो अध्याहाराचा प्रसंग दर्शविला आहे तो भ्रामक आहे. अधिकारिये — अधिकारी (पुं.) प्रथमा अ. व. 'अधिकारी' म्हणजे साधनचतुष्टयसंपन्न आणि अपरोक्षानुभूतीला आणि गुरूच्या अनुग्रहास पात्र असलेले लोक. येरि लोक — इतर लोक, सर्वसाधारण पाठक. वाक्चातुर्यें — वाक्चातुरीने, वाग्विलासाने, वाणीच्या कौशल्याने. सुखिया — सुखी (वि.) पुं. प्रथमा ए. व. सुखी.

ज्ञानदेवीच्या उपसंहारात्मक विवेचनातील प्रस्तुत दोन ओव्यांत जी उपमान – उपमेयवाक्ये आहेत त्यांचे विश्लेषण करिता पुढीलप्रमाणे राशी प्रत्ययास येतात :

| | उपमान वाक्य | उपमेय वाक्य |
|---|---|---|
| (१) | चंद्र | आध्यात्मशास्त्र |
| | तें आंगवणें | अंतरंगचि |
| | चकोर | अधिकारिये |
| | भोगुनि सिह्णे | (भोगुनि सिह्णे) |
| (२) | भलतेया | येरि लोक |
| | चांदिणें | वाक्चातुर्यें |
| | फावे | सुखिया होईल |

या उपमान-उपमेयवाक्यांतील राशी सूक्ष्मपणाने पाहता ज्ञानदेवांनी अधिकारी, साधक आणि सर्वसाधारण अनधिकारी पाठक यांतील भेदाचे अधिकारक्षेत्र किती रेखीवपणे आणि मार्मिकपणे आखून दिले आहे ते दिसेल. ही दोन अधिकारक्षेत्रे अनुक्रमे (१) आणि (२) यांनी वर दर्शविली आहेत. वरील उपमानउपमेयांत कोठे वचनविपर्यासही झालेला नाही. एवढेच नव्हे, तर उपमान-उपमेयांची सर्व बारीक-सारीक अंगेही चपखल बसलेली आहेत. 'चंद्र' आणि 'आध्यात्मशास्त्र' ही राशी वगळिता लिंगविपर्यासही आढळणार नाही. ज्ञानदेवीच्या (अर्थात – अध्यात्मशास्त्राच्या) अध्ययनाचे अधिकारी साधकाला लाभणारे फळ आणि ते फळ लाभल्यानंतर साधकाला मिळणारी तृप्ती यांचा स्पष्ट निर्देश (१) या अधिकारक्षेत्रात आहे. तसेच, अनधिकारी पाठकाला लाभणारे बहिरंग फळ व ते फळ लाभल्यानंतर अशा पाठकाला होणारी सुखप्राप्ती यांचा स्पष्ट निर्देश (२) या अधिकारक्षेत्रात आहे. 'चंद्र आणि 'आध्यात्मशास्त्र' हे अनुक्रमे 'चकोर' आणि 'अधिकारी' यांचे 'भोगुनि सिह्णे' होण्याचे विषय आहेत. 'आंगवणें' आणि 'अंतरंग' या राशीवरून 'चंद्र' व 'आध्यात्मशास्त्र' यांचा मर्मभूत गाभा प्रत्ययाला येतो. चंद्रातून होणारा अमृतस्राव ('आंगवणें') हेच खरोखर त्याचे मर्मभूत स्वरूप होय (बाह्य चांदणे नव्हे !), त्याप्रमाणे अध्यात्म-

शास्त्राचे अंतरंग हीच खरोखर प्राप्यवस्तू होय, (त्याचे बाह्य वाक्चातुर्य नव्हे!). तो अमृतस्राव जसा चकोराला लाभतो, तसे अध्यात्मशास्त्राचे अंतरंगच मुळी अधिकारी साधकांना गवसते. चकोरासारखा चंद्राचा खराखरा मर्मज्ञाता दुसरा कोणी नाही; म्हणूनच साधनचतुष्टयसंपन्न अधिकारी साधकांना अशा चकोरांची उपमा येथे दिली आहे. 'भोगुनि सिहाणे' ही शब्दसंहती दोन्हीकडे अन्वित करून घ्यावयाची. तो त्यांचा समानधर्म आहे. अमृतस्राव भोगण्याचे, त्याने तृप्त होण्याचे सामर्थ्य चकोरांच्याच अंगी असते; अध्यात्मशास्त्राचेही अंतरंग साध्य करण्याचे आणि त्याने समाहित होण्याचे सामर्थ्य अधिकारीजनांनाच आहे; आणि हे सामर्थ्य दोहोंच्याही बाबतीत अंगजात आहे. चकोरांच्या बाबतीत ते नैसर्गिक असेल; शंकराचार्यांसारख्या तेजस्वी अधिकारी साधकांच्याही बाबतीत ते 'अनेकजन्मसंसिद्ध', 'प्राचीनसंस्कारवशें' आलेले व म्हणून प्राकृतिकच असते. अधिकारी साधकांच्या विषयांत अशी उकल वरील राशींच्या साहाय्याने केल्यावर सर्वसाधारण पाठकांना कोणते फल मिळणार, ते ज्ञानदेवांनी पुढे सांगितले आहे. या दुसऱ्या अधिकारक्षेत्रातील सर्वसाधारण पाठक 'भलतेया' आणि 'येरि लोक' यांनी निर्दिष्ट केले आहेत. चकोरांना चंद्रिका भोगावयाला मिळून ते तृप्ती पावत असले तर सर्वसाधारणजनांना त्याचे काय होय? — ज्ञानदेव म्हणतात, 'अशा अज्ञ, अनधिकारी लोकांना ('भलतेया') चकोरांप्रमाणे अमृतस्राव जरी लाभला नाही, तरी बहिरंगाचे चांदणे का असेना, मिळतेच मिळते ('फावे'); त्याप्रमाणे अनधिकारी अज्ञ जनांना ('येरि लोक') अध्यात्मशास्त्राचे अंतरंग जरी गवसले नाही, तरी या ग्रंथाच्या अपूर्व वाग्विलासानेही ते सुखावतील आणि त्यांनाही आपल्या अधिकारक्षेत्रानुसार फळ लाभेलच. हेही फळ काही लहान नाही. दोन्ही फळे अध्यात्मशास्त्राच्याच अनुषंगाने मिळणारी अधरोत्तर फळे आहेत.

वरील ओव्यांची केलेली ही उकल पाहता ज्ञानदेवांनी किती सूक्ष्मपणे अधिकारक्षेत्रांचा विचार केला आहे ते उत्तम प्रकारे प्रत्ययाला येते. परंतु या ओव्या इतक्या दीर्घकालापर्यंत इतक्या प्रसिद्ध व दैनंदिन पाठांतील असताही साखरे व भिडे हे संपादक काहीसे वगळिता वंकट, दांडेकर, पांगारकर, केशवराव महाराज, देशमुख, आगाशे इत्यादिकांनी, तसेच आधुनिक चिकित्सकांनी व सुशिक्षितांनी त्यांची अशी उकल केलेली नाही, अशी वस्तुस्थिती आहे. बहुतेकांनी त्यांचा गतानुगतिकत्वानेच अर्थ केलेला दिसतो. आणि साखरे, भिडे यांचाही अर्थ तसा सरवरीतच आहे. प्रस्तुत ओव्यांचा रूढ अर्थ थोडाफार शाब्दिक फरकाने पुढीलप्रमाणे केला जातो : 'आपल्या स्वाभाविक सामर्थ्याने चंद्राला (चंद्राच्या अमृताला) भोगून चकोरपक्षी चतुर ठरला आहेच. परंतु चंद्राचे चांदणे मात्र वाटेल त्याला जसे भोगावयास सापडते. १७४८. त्याप्रमाणे या अध्यात्मशास्त्रात अंतर्मुख वृत्ती झालेलेच अधिकारी आहेत. परंतु शब्दचातुर्याने सर्व लोक सुखी होतील,' १७४९, (दांडेकर). याचाच अनुसार प्रा. रामभाऊ रानडे[१], शं. गो. तुळपुळे[२], न. र. फाटक[३], मा. दा. अळतेकर[४].

१. 'पांच संतकवि' (शं. गो. तुळपुळे) : प्रस्तावना : पृ. ८.
२. 'पांच संतकवि' (शं. गो. तुळपुळे) : पृ. ७९.
३. 'ज्ञानेश्वर : वाङ्मय आणि कार्य' (न. र. फाटक) : पृ. १६५.
४. 'श्री ज्ञानदेव' (मा. दा. अळतेकर) : पृ. ७१–७२.

श्री. मा. कुलकर्णी,[५] रा. चिं. ढेरे[६] या आधुनिक चिकित्सकांनीही कांही शाब्दिक भेदाने केला आहे. परंतु ' अंतर्मुख वृत्तीचेच लोक अधिकारी आहेत,' असा १७२८ व्या ओवीच्या पूर्वार्धाचा अभिप्राय वा अर्थ सांगणे हे चुकीचे व भ्रामक आहे. ते कसे ते यापूर्वी सांगितलेल्या राशिमंडनावरून आणि स्पष्टीकरणावरून स्वच्छ उमगून येईलच. ' अंतरंगचि ' हे ' भोगुनि ' याचे कर्म आहे, तो कर्ता नाही, तसेच ' अधिकारिये ' हे ' अंतरंग ' याशी विधिविशेषण म्हणून संबद्ध नाही, तसे ते असते तर ' अंतरंग ' (नपुं. ए. व.) आणि ' अधिकारिये ' (पु. अ. व.) असा वचनविपर्यास दिसता ना, इत्यादि महत्त्वाचे आणि मुद्द्याचे विचार वरील चिकित्सकांच्या मुदलीच ध्यानी आलेले नाहीत. त्यांच्या पक्षी उपमान-उपमेयांच्या राशीही जुळत नाहीत. ' अंतर्मुख वृत्तीचे लोक अधिकारी आहेत,' या विधानात मार्मिकताही काही नाही. कारण अधिकारी या पदातच अध्यात्मशास्त्राबाबतची अंतर्मुखता समाविष्ट असते. अंतर्मुख वृत्तीचे लोक अधिकारी असतात. असे म्हणणे हे यामुळे सर्वथा निरर्थक ठरते. आणखी एक गोष्ट अशी की, येथे अंतर्मुख वृत्तीच्या लोकांबद्दल काहीच विधान करावयाचा हेतू नाही, तर अध्यात्मशास्त्रातील अधिकारी लोकांना कोणते फल प्राप्त होते ते सांगण्याचा हेतू आहे. आणि या फलाहून वेगळे असे अघरफल सर्वसाधारणांना मिळते, हेही लगेच पुढे सांगितले आहे. यावरून आम्ही केलेला अर्थ आणि स्पष्टीकरण ही भाषा, व्याकरण, अलंकार आणि अभिप्राय या सर्व दृष्टींनी सर्वस्वी समाधानकारक आहेत, हे पटेल याच संदर्भात ६.२७–३० या सदृशार्थक ओव्या लक्षणीय आहेत, तसेच, १०.१४० पहा. राजवाडे-प्रत.

वरील दोन ओव्यांचा साधारणतः याच धोरणानुसार अर्थ श्री. वि. मो. केळकरांनी बऱ्याच वर्षांपूर्वी ' सह्याद्री 'त (मे, १९४७) केलेला होता. त्याच्या चर्चेत पुढे पांडुरंगशर्मा यांच्या साहाय्याने न. चिं. केळकरांनी आपलेही काही विचार सांगून टीका केली होती. पण ती टीका व्याकरणानपेक्ष, तर्कदुष्ट आणि म्हणून न पटणारी होती, हे येथे सांगणे उचित होईल.

५. ' ज्ञानेश्वरीतील शिकवण ' (श्री. मा. कुलकर्णी) : पृ. १४.
६. ' आनन्दे भरीन तिन्ही लोक ' (विनायक य. कुलकर्णी) : प्रास्ताविक : पृ. ८.

## सभासदांना विनंती

चालू वर्षी परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका होणार आहेत व त्या दृष्टीने सभासदांच्या याद्या आम्ही नव्याने छापून घेत आहोत. तरी ज्या सभासदांना आपल्या नावांत वा पत्त्यांत काही बदल करावयाचा असेल त्यांनी जून १९६३ पर्यंत कार्यालयाकडे कळवावे.

— चिटणीस

# नव्या शुद्धलेखनाचे स्वागत

मो. रा. वाळंबे

दि. २० सप्टेंबर १९६२ रोजी सरकारने एका परिपत्रकाच्या द्वारे शुद्धलेखनाबाबत एक ठराव मंजूर करून गेली जवळजवळ शंभर वर्षे चालू असलेल्या शुद्धलेखनवादावर एकदाचा पडदा पाडण्याचा प्रयत्न केला आहे. आजपर्यंत सरकारदरबारी मुख्यत: दादोबापुरस्कृत जुने किंवा रूढ शुद्धलेखन चालू होते. अवघ्या तीन वर्षांपूर्वी शिक्षणखात्याने व एस्. एस्. सी. बोर्डाने महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुरस्कारिलेल्या शुद्धलेखनाच्या नियमांना मान्यता देऊन हे नियम अमलात आणण्याबद्दल शाळांना तशा सूचनाही केल्या. पण या सूचनांच्या अमलबजावणीला सुरुवात होते न होते तोच सहा महिन्यांपूर्वी सरकारने एका ठरावाने मराठी साहित्य महामंडळाने पुरस्कारिलेल्या शुद्धलेखनविषयक नियमांना मान्यता देऊन या बाबतीतले मागील सर्व हुकूम रद्द समजण्यात यावेत असे कळविले. सरकारचा ठराव पुढीलप्रमाणे :–

Resolution No. SCO-1061-C
20th Sept., 1962.

### Resolution

Government had under consideration the question of adopting and prescribing at all levels of education, a uniform set of rules of Marathi Orthography. After careful consideration Government has decided to adopt and prescribe at all levels of education the set of rules prepared and uniformly approved by the Marathi Sahitya Mahamandal which is a representative Marathi Literary body. The said set of rules should be brought into force immediately.

This resolution supercedes all previous orders issued by Government in this behalf.

या ठरावाप्रमाणे हे म. सा. महामंडळाचे नियम शिक्षणाच्या सर्वच स्तरांत तावडतोब अमलात आणण्याचा आदेश दिला आहे. या नव्या नियमांमुळे आपल्या जुन्या लेखनपद्धतींत कोणता फरक झाला आहे हे सहज समजण्यासाठी मराठी लेखनपद्धतींतील आजवरचे प्रमुख टप्पे तक्त्याच्या स्वरूपात पुढे मांडून दाखवितो म्हणजे त्यांचा तौलनिक अभ्यास करणे सोपे व सोयीचे होईल. मात्र हे टप्पे दाखविताना महाराष्ट्र साहित्य परिषदेचे आज प्रचारात असलेले नियम पायाभूत मानले आहेत.

अनुक्रमणिका

# मराठी शुद्धलेखनपद्धतींतील प्रमुख टप्पे

| जुने शुद्धलेखन | म. सा. प.चे किंवा नवे शुद्धलेखन | मुंबई विद्यापीठाचे शुद्धलेखन | मराठी साहित्य महामंडळाचे शुद्धलेखन |
|---|---|---|---|
| **सामान्यतत्त्व** | | | |
| १. मराठी शुद्धलेखन हे मुख्यत: (अनुस्वारांशिवाय इतर गोष्टींत) उच्चारानुसारी आहे. | केवळ उच्चाराप्रमाणेच लेखन असावे हे तत्त्व संमत नाही. परंपरा, वर्तमानकालीन प्रचार, व्युत्पत्ती, व्याकरण, व उपयुक्तता यांचा शुद्धाशुद्धलेखन ठरविण्याच्या कामी विचार करावा. | मराठी भाषेचे लेखन हे शक्यतोवर शुद्धोच्चारानुसारी राहावे. सुसंस्कृत शिष्टांचे सभोचित भाषण हेच मुख्यत: प्रमाणभूत समजावे. व्युत्पत्ती, भाषेचा स्वभाव, चालू मान्य ग्रांथिक प्रयोग वगैरे कसोटया वापराव्या. | मराठीतील लेखन हे शक्यतो उच्चारानुसारी असावे. |
| **अनुस्वार** | | | |
| २. नाकातून स्पष्ट उच्चार होतो अशा अक्षरावर अनुस्वार द्यावा. | नियम मान्य. मराठीत अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदू द्यावा. अर्थभेद होत असेल तर परसवर्ण वापरावा. | निश्चित नासोच्चारित अक्षर सानुस्वार लिहावे. चिंच, उंट, आंबा, मुलांनो. | स्पष्टोच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदू द्यावा. |
| ३. व्युत्पत्तीने सिद्ध होणारे अनुस्वार ठेवावे :– सांवळा (श्यामल) कोंवळा (कोमल) शींव (सीमा) नांव (नाम) | व्युत्पत्तीने सिद्ध होणारे असून अर्थभेद दाखवीत असतील तरच अनुस्वार ठेवावे. नांव–नाव, पांच–पाच, कां (कारण)–का (काय ?) | नियम मान्य | व्युत्पत्तीने सिद्ध होणारे वा न होणारे अनुस्वार ठेवू नयेत. नाव, पाच का. |
| ४. केवळ रूढी म्हणून विशिष्ट शब्दांतील अक्षरांवर अनुस्वार द्यावा. कांहीं, नाहीं, लांकूड, झोंप, हांक, ऊंस, पोंचणे. | सर्व अनुच्चारित अनुस्वार गाळावे. उदा.–लाकूड, नाही, झोप, ऊस, पोचणे, हाक. | म. सा. प. चा नियम मान्य | म. सा. प. चा नियम मान्य |

| जुने शुद्धलेखन | म. सा. प.चे किंवा नवे शुद्धलेखन | मुंबई विद्यापीठाचे शुद्धलेखन | मराठी साहित्य महामंडळाचे शुद्धलेखन |
|---|---|---|---|
| ५. नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्यरूपावर अनुस्वार द्यावा. | मान्य | मान्य | मान्य |
| ६. नपुंसकलिंगी नामांचे अंत्याक्षर दीर्घ 'ई' 'उ' वा 'ए' असेल तर अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. | मान्य | मान्य | अमान्य अनुस्वार देऊ नये. |
| ७. नपुंसकलिंगी नामांकडे संबंध येणाऱ्या एकारान्त व ईकारान्त विशेषणांच्या व क्रियापदांच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. | मान्य | मान्य | अमान्य |
| ८. तृतीयेच्या सर्व प्रत्ययांवर अनुस्वार द्यावा. रामानें, तुझ्याशीं. | तृतीयेच्या 'ने' व 'नी' प्रत्ययांखेरीज इतर प्रत्ययांवर द्यावा. रामाने, मुलींनी | तृतीयेच्या सर्व प्रत्ययांवर अनुस्वार द्यावा. | अमान्य रामाने, तुझ्याशी, त्याने, त्यांनी. |
| ९. सप्तमीच्या 'ई' व 'आ' या प्रत्ययांवर व 'त' प्रत्ययापूर्वीच्या सामान्यरूपावर अनुस्वार द्यावा. उदा.– घरीं, मायां घरांत. | मान्य | मान्य | अमान्य उदा.–घरी, माथा, घरात |
| १०. प्रथमपुरुषी क्रियापदांच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. उदा.– मी / आम्ही } जातों, गेलों, टेकलों. | मान्य | मान्य | अमान्य मी गेलो– जातो– टेकलो. |
| ११. अव्ययांच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार द्यावा. उदा.–जेथें, जेव्हां, तुझ्यासाठीं–प्रमाणें. | अव्ययांच्या अंतावर सामान्येकरून अनुस्वार देऊ नये. उदा.– जेव्हा, साठी, प्रमाणे, तेथे. | विकल्पाने अनुस्वार द्यावा :— जेथे–जेथें साठी–साठीं प्रमाणे–प्रमाणें | अमान्य अनुस्वार देऊ नये. जेथे, जेव्हा, प्रमाणे, विषयी, की, सुद्धा |
| १२. ऊं–तां-तांना प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययांवर अनुस्वार द्यावा. उदा.– जाऊं, जातां, जातांना. | नियम मान्य | अमान्य नासोच्चार होत नाही म्हणून अनुस्वार देऊ नये. जाऊ–जाता–जाताना | अमान्य अनुस्वार देऊ नये. |

| जुने शुद्धलेखन | म. सा. प.चे किंवा नवे शुद्धलेखन | मुंबई विद्यापीठाचे शुद्धलेखन | मराठी साहित्य महामंडळाचे शुद्धलेखन |
|---|---|---|---|
| **ऱ्हस्व-दीर्घ** | | | |
| १३. मूळ शब्दांतील अक्षरे यथोच्चार ऱ्हस्व किंवा दीर्घ लिहावी. | मान्य | मान्य | मान्य |
| ऱ्हस्व 'इ' कारान्त व 'उ' कारान्त तत्सम शब्द प्रथमेत ऱ्हस्व लिहावेत. कवि, मति, वुद्धि, वायु | मान्य | विकल्पाने ऱ्हस्वान्त वा दीर्घान्त लिहावे :– कवि–कवी, प्रीति–प्रीती | वाक्यांत दीर्घान्त लिहावेत – कवी, मती, गुरू, वायू |
| १४. विभक्तिप्रत्यय जोडताना अन्त्य ऱ्हस्व स्वर दीर्घ होतो. कवीला – कवीमुळ | मान्य | मान्य | मान्य |
| १५. सामासिक शब्दांतील 'इ' कार व 'उ' कार ऱ्हस्व लिहावेत. उदा.– मतिविकार, गुरुदक्षिणा. | मान्य | मान्य | मान्य |
| १६. अकारान्त तत्सम शब्दांतील उपान्त्य स्वर ऱ्हस्व 'इ' किंवा 'उ' असल्यास तो ऱ्हस्व लिहावा. | मान्य | मान्य | मान्य |
| १७. उपान्त्य दीर्घ ई-ऊ असलेल्या शब्दांचा इकार-उकार ऱ्हस्व लिहावा. जीव–जिवास, शरिरास. | मान्य | मान्य | दीर्घोपान्त्य तत्सम शब्द दीर्घच लिहावे. शरीरास, सूत्रात, जीवास. |
| १८. व्यंजनान्त तत्सम शब्द व्यंजनान्तच लिहावे. क्वचित्, विद्वान्, किंचित्, परिषद्, अर्थात्. | मान्य | मान्य | तत्सम व्यंजनान्त शब्द अकारान्त लिहावे. क्वचित, विद्वान, परिषद, अर्थात, किंचित |

या तक्त्याकडे थोड्या सूक्ष्म नजरेने पाहणाऱ्यास असे आढळून येईल की, मराठी साहित्य महामंडळाने पुरस्कृत केलेल्या या नव्या नियमांत तीन गोष्टी प्रमुख आहेत.

**(१) अनुस्वाराबाबतचे धोरण**

हे धोरण पुढीलप्रमाणे :–

( १ ) स्पष्टोच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदु द्यावा; व (२) नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्यरूपांवर अनुस्वार द्यावा. याखेरीज ज्यांचा उच्चार होत नाही असे रूढिप्राप्त व व्याकरणिक (म्हणजे लिंग, विभक्ति, पुरुष, काळ, प्रयोग इत्यादि कारणांमुळे जे) अनुस्वार आपण आजपर्यंत देत होतो ते सर्व अनुस्वार आता कमी झाले.

**(२) ऱ्हस्वदीर्घाबाबत झालेला फरक** आता उच्चारानुसारित्वाचे तत्त्व मान्य केल्यामुळे संस्कृत तत्सम शब्द ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त आपण लिहीत होतो ते आता मराठीत दीर्घान्त उच्चारले जातात म्हणून दीर्घ लिहिण्याची परवानगी मिळाली; म्हणजे आता बुद्धी, कवी, मती, गुरू, वायू, प्रीती हे शब्द वाक्यांत योजले असतांना दीर्घान्त लिहावयाचे;

**(३) तत्सम व्यंजनान्त शब्द अकारान्त** लिहिण्याबद्दल. उदा. क्वचित, विद्वान, अर्थात, परिषद, किंचित वगैरे शब्द याउप्पर अकारान्त लिहावयाचे आहेत; त्यांचा पाय मोडू नये.

या फरकांमुळे एका विशिष्ट परंपरेने आजवर लेखन करीत आलेल्या व्यक्तींना हे अभिनव शुद्धलेखन म्हणजे एक 'बाँबशेल' वाटावा हे साहजिक आहे. आज अनेक वर्षे ज्यांच्या हाताला एका विशिष्ट लेखनपद्धतीचे वळण लागले त्यांना ही नवी शुद्धलेखनपद्धती अंगवळणी पाडणे थोडे कठीणच वाटणार आहे. पण कोणतीही सुधारणा होत असताना अशी जुन्यांची थोडीफार गैरसोय होतेच. पुढे काळाच्या ओघात हे सारे विसरून जाते व मनुष्य पुन्हा रुळतोच.

आज स्वातंत्र्योत्तर भारतात सर्वच बाबतीत नवे वारे संचारले आहे असे दिसून येते. आज व्यवहारात रुपये, आणे, पैची भाषा गेली. आपण नया पैशांत हिशेब करू लागलो. वजनमापांतील शेर, धडा, मण ही परिमाणे गेली. त्याऐवजी किलोग्रॅम, लिटरची भाषा आपण बोलू लागलो. इंच, फूट, वार यांच्याऐवजी मीटर–किलोमीटर वापरू लागलो. शेकडो वर्षे व्यवहारात चालू असलेली ही परिमाणे बदलत चालली व त्यांचे स्वागतही आपण करीत आहो. हीच गोष्ट आता शुद्धलेखनाच्या बाबतीत घडत आहे.

शुद्धलेखनाचा अर्थच असा की भाषेच्या शुद्धतेच्या दृष्टीने केलेले निर्दोष लेखन. त्यात जसा अनुस्वारांचा, ऱ्हस्व-दीर्घांचा विचार होतो, तसेच व्याकरण, व्युत्पत्ती, वर्तमानकालीन प्रचार, परंपरा, विरामचिन्हे, वाक्यरचना इत्यादिकांचा त्यात समावेश होतो. पण आपण शुद्धलेखन म्हटले की ऱ्हस्व-दीर्घ–अनुस्वार यांशिवाय इतरांचा फारसा विचारच करीत नाही. आज मराठीच्या शुद्धलेखनाचे बरेचसे नियम संस्कृत शब्दांच्या उच्चारण्याच्या पद्धती लक्षात ठेवूनच केले गेले आहेत. कवी, मती, बुद्धी, गुरू आदि शब्द संस्कृतातून आले असले तरी त्यांचा उच्चार मराठीच्या वळणाप्रमाणे करताना दीर्घान्त करतो म्हणून हे शब्द मराठीत दीर्घान्त लिहावेत याबद्दल आजपर्यंत थोडे का प्रयत्न झाले ? कै. साने, हातवळणे, रा. भि. जोशी वगैरे मंडळींनी केलेले प्रयत्न निष्फळच झाले. कै. न. चिं. केळकरांनी अनुच्चारित अनुस्वारांच्या बाबतीत झोड उठवून निरुपयोगी अनुस्वार काढून टाकण्याची प्रथा सुरू केली. त्या वेळी लोकांना वाटणारे हे 'बंड' तेच कालान्तराने लोकांना अधिक ग्राह्य वाटू लागले. त्या

वेळच्या मराठीच्या विद्वानांना अनुच्चारित अनुस्वारांची जशी अडगळ वाटली तीच आज व्याकरणिक अनुस्वारांच्या बावतीत बहुसंख्य जनतेला वाटत आहे. उगाच अनुस्वारांचे प्रावल्य वाढवून भाषेचे लेखन क्लिष्ट करण्याऐवजी जरुरी-पुरतेच व आवश्यक तेवढेच अनुस्वार ठेवावेत असे म्हणण्यापर्यंत काहींची मजल गेली. स्पष्टोच्चार होत असेल तर अनुस्वार देणे इष्ट होय. तसेच, अनेकवचनांचे स्वरूप कळण्या-साठी अनुस्वारांची आवश्यकता आहे. इतर ठिकाणी म्हणजे नपुंसकलिंगी नामे, सर्वनामे, त्यांच्याकडे संबंध येणारे इकारान्त, उकारान्त व एकारान्त शब्द, प्रथमपुरुष-वाचक क्रियापदे, प्रयोग, काळ, विभक्ति, कृदन्ते, व व्युत्पन्न आणि भेदक शब्दांवरील अनुस्वार वगळल्यामुळे भाषेच्या अर्थवाहनात कोठेच अडथळा निर्माण होत नाही. अनुस्वार देण्याच्या पद्धतीमुळे शब्दांच्या सूक्ष्म छटा समजून येत असत ही गोष्ट खरी. पण सामान्य जनतेच्या दृष्टीने ती अनावश्यकच नव्हे तर अडचणीची वाटत होती.

अनुस्वार देण्याच्या बावतीत तरी विद्वा-नांत एकवाक्यता होती म्हणावे तरी तसे नाही. त्यांत कोणी परंपरावादी, कोणी शास्त्रवादी, तर कोणी व्यवहारवादी. यामुळे विद्वानांत शुद्धलेखनाच्या बावतीत एकवाक्यता होणेच दुरापास्त होऊन बसले होते. त्यामुळे विद्वान, गुरुजन, वर्तमानपत्रकार, लेखक आदि मंडळी विविध प्रकाराने लेखन करीत असल्या-मुळे विद्यार्थ्यांना व सामान्य वाचकवर्गाला शुद्धलेखन ही चेष्टेचीच वाव होऊन बसली होती. या सर्वांच्यांत एकवाक्यता करण्याचे सर्व खासगी प्रयत्न निष्फळ होत चालले आहेत हे पाहून सरकारला यात काही करणे भाग पडले. महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यानंतर मराठी ही सरकारदरबारची भाषा होणेच इष्ट. ही भाषा प्रमाण मानताना कोणत्या लेखनप्रकाराचा अवलंब करावयाचा हा प्रश्न साहजिकच निर्माण झाला. याच वेळी महाराष्ट्राच्या चार विभागांत — मुंबई, पश्चिम महाराष्ट्र, विदर्भ व मराठवाडा या विभागांत — कार्य करणाऱ्या मराठी साहित्य संस्थांचे एकसूत्रीकरण होऊन ' मराठी साहित्य महामंडळ ' अशी एक संस्था निर्माण झाली. याचा फायदा घेऊन सरकारने नेमलेल्या भाषासल्लागारमंडळाने या महामंडळाकडे शुद्धलेखनाच्या बावतीत एकवाक्यता करण्याचा प्रश्न सोपविला; व महामंडळाच्या सदस्यांनी सुचविलेले नियम सरकारने मान्य केले. या नव्या शुद्धलेखनपद्धतीप्रमाणे, अनुच्चारित व्याकरणिक अनेक अनुस्वार आता नाहीसे झाले. त्यामुळे जुन्या लेखनपद्धतीच्या पुरस्क-र्त्यांना असे वाटू लागले आहे की आता व्याकरणही बदलावे लागेल. याचा खोलवर विचार केल्यास ही वाटणारी भीती अनाठायी आहे . असेच दिसून येईल. अनुस्वारवादी मंडळींचे असेही म्हणणे आहे की, अनुस्वारा-मुळे शब्दांचे लिंग, वचन, पुरुष, विभक्ती, काळ, आदि समजण्याची सोय अनायासे असताना ती का घालवायची ? पण हे त्यांचे म्हणणे अर्धसत्यच होय. अनुस्वाराशिवाय शब्दाच्या रूपावरून व संदर्भावरून या गोष्टी समजतातच, मग लेखनसौकर्यासाठी हे अनुस्वार वगळणे इष्ट नव्हे का ? पूर्वी आपल्यात मोडी लेखनपद्धती होती. या लिपीत ऱ्हस्वदीर्घाचा विधिनिषेध पाळला जात नव्हता. सर्वच इकारान्त शब्द दीर्घ व उकारान्त शब्द ऱ्हस्व लिहिले जात व योग्य प्रकारे ते वाचले जात. त्या वेळी कोणी हे संस्कृत तत्सम शब्द ऱ्हस्वच लिहिले पाहिजेत असा वाद करीत नव्हते. प्रश्न आहे तो सवयीचा. जुन्या शुद्ध-लेखनातील तृतीयेच्या ' ने ' व ' नी ' वरील व क्रियाविशेषणे आणि शब्दयोगी अव्ययां-वरील (उदा० जेथे, तेथे, जेव्हा, केव्हा, प्रमाणे, साठी, कारणे, मुळे वगैरे) अनुस्वार म. सा.

अनुक्रमणिका

प. च्या नव्या शुद्धलेखन–नियमांत काढून टाकताच थोडा का गहजब झाला! पण आता त्याचीही सवय झाली. हीच गोष्ट या मराठी साहित्य महामंडळाच्या नियमांच्या बाबतीत होईल. म. सा. प. च्या शुद्धलेखन नियमाने अनुच्चारित अनुस्वारांची अडगळ कमी करण्यात जसे यश मिळविले तसेच ज्यांचा उच्चार होत नाही असे रूढीप्राप्त व व्याकरणिक अनुस्वारांची अडगळ कमी करण्याचे काम या मराठी साहित्य महामंडळाच्या नियमाने होणार आहे. सरकारने या नियमांना मान्यता देऊन सर्व मतभेदांवर पडदा टाकण्याचा प्रयत्न केला आहे. सरकारने घेतलेला हा निर्णय विद्वानांच्या सल्ल्यानुसारच घेतला आहे.

याचा अर्थ असा नव्हे की जे झाले ते शंभर टक्के योग्य झाले. चार विद्वान मंडळी एकत्र आली की मतभेदाला तेथे वाव असणारच. महामंडळातील सदस्यांचे वैयक्तिक लेखन तपासले तर असे आढळून येईल की, त्यांतील कित्येक जण जुन्या वा रूढ शुद्धलेखनपद्धतीला अनुसरूनच आजपर्यंत लेखन करीत आहेत, व कित्येक जण म. सा. परिषदेच्या शुद्धलेखनपद्धतीचे कट्टे पुरस्कर्ते आहेत. पण काळाची पावले ओळखून सर्वांनी आपापले मतभेद बाजूस सारून — एकमताने निर्णय घेतला आहे; व तो सरकारला मान्य झाला असेल तर उगाच खळखळ करण्यात अर्थ नाही. मराठीचे लेखन सुकर होण्याच्या दृष्टीने ही नवी पडणारी पावले स्वागतार्हच मानली पाहिजेत असे मला तरी वाटते.

आजचे नियम हे अगदी निर्दोष आहेत असा दावा महामंडळाच्या सभासदांचा नाही. पण सुरुवात कोठून तरी व केव्हा तरी करणेच इष्ट. हे नियम प्रचारात आले म्हणजे त्यांतील दोष आपोआप नाहीसे होतील. अगदी सर्वमान्य नियम तयार झाल्यानंतरच ते अमलात आणू असे म्हणणे जमणारच नाही. म. सा. प. च्या नियमांत अनेक दोष असूनही ते प्रचारात आणण्याचा अनेकांनी प्रयत्न केलाच ना? सबब भावी पिढीच्या लेखनात सुसूत्रता व सुकरता येण्याच्या दृष्टीने नव्या नियमांचे स्वागत सर्वांनी करणेच इष्ट. नव्याने घरी येणाऱ्या मुलीचे दोष काढून तिला नावे ठेवीत राहण्याने संसार सुखमय व सुरळीत होणार नाही. उलट तिचे स्वागत करून तिच्या दोषांची जाणीव प्रेमाने करून देण्यात व तिला नांदवून घेण्यात सर्वांचे हित असते हा व्यावहारिक दाखला लक्षात ठेवून आता नव्याजुन्या शुद्धलेखनाच्या सर्व पुरस्कर्त्यांनी या नव्या लेखनप्रकाराचे स्वागत करावे व यांतच सर्वांचे हित आहे.

अखंड बदल हे साहित्यप्रकारांचे प्रमुख आकर्षण आहे. कथा बदलली, नाटके बदलली, कादंबऱ्यांचा घाट बदलला, काव्य बदलले. काळाच्या प्रवाहाबरोबर साहित्याचे सारेच प्रकार बदलत चालले व त्याचे स्वागत नवे जग मोठ्या उत्सुकतेने करताना आढळते. तर मग लेखनाच्या पद्धतीत बदल झाल्याबद्दल उगाच ओरड का? व्याकरणशास्त्रदेखील अजरामर आहे असे कोणीच म्हणणार नाही. भाषा बदलत चालली तर तिचे व्याकरणहो साहजिकच बदलणार. बखरीची भाषा, हरिभाऊंच्या कादंबऱ्यांची भाषा, फडके–खांडेकरांच्या ललितसाहित्याची भाषा, व आजच्या नवकथाकारांची भाषा यांत कितीतरी बदल झालेला आपण पाहतोच ना! भाषेप्रमाणे व्याकरण व लेखन ओघाने बदलणारच. त्याबद्दल उगाच ओरड किंवा हळहळ वाटून घेण्यात काय अर्थ आहे? लेखनाचा प्रकार बदलला म्हणून शब्दांचा आशय बदलतो थोडाच! उलट शब्दांना प्राप्त झालेला अर्थही कालांतराने बदलतो अशीच साक्ष व्युत्पत्तिशास्त्रही देते. मग लेखनप्रकारात कालमानानुसार झालेला बदल पाहून त्याबद्दल ओरड करण्याऐवजी त्याचे स्वागत करावे हेच इष्ट व उचित.

# साहित्य-समीक्षा

**An Old Marathi Reader,**
by : S. G. Tulpule
Venus Prakashan,
Poona. 1960, Rs. 20

समीक्षक
सुनील द्वारकानाथ

गेल्या सात-आठ वर्षांत भाषाशास्त्राला आपल्याकडे बरे दिवस आले आहेत. या वीस-पंचवीस वर्षांत पुण्यामध्ये भाषाशास्त्राचा पद्धतशीर अभ्यास होत असून अलीकडे भारतातील पुष्कळशा विद्यापीठांच्या अभ्यासक्रमात या विषयाला स्वतंत्र स्थान लाभले आहे. पूर्वी युरोपीय विद्वानांनी आपल्या भाषांचे ऐतिहासिक व तुलनात्मकदृष्ट्या आस्थेने परिशीलन केले तसे हल्ली वर्णनात्मक पद्धतीचा अवलंब करून अमेरिकन भाषाशास्त्राच्या अनुकरणाने जिवंत बोलींच्या उच्चारांचे वर्णन बारकाईने करण्याचा प्रयोग चालू आहे. पाश्चात्य विद्यापीठांमध्ये मराठीकरिता आसने निर्माण झाली आहेत. अशा परिस्थितीत भाषेच्या ऐतिहासिक किंवा वर्णनात्मक अभ्यासासाठी भाषाशास्त्रीयदृष्टीने निवड केलेले वेचे मोलाचे होत, म्हणून प्रस्तुत ग्रंथाची रचना झाली आहे.

सन १००० ते १३५० या कालखंडातील मराठीचे स्वरूप दाखवून तिच्या प्रकृतीची शास्त्रीय चिकित्सा या ग्रंथाच्या प्रस्तावनेत केलेली आहे. कालानुक्रमाने लावलेल्या उताऱ्यांचे इंग्रजी भाषांतर करून त्यांच्याबद्दल प्रास्ताविक माहिती व व्याकरणाच्या टीपा जोडून शेवटी व्युत्पत्तीसह शब्दसूची दिलेली आहे. डॉ. तुळपुळे यांचा या विषयाचा व्यासंग जवळजवळ दोन तपांचा आहे. त्यांचा "यादवकालीन मराठी" हा भाषाशास्त्रीय प्रबंध प्रसिद्ध होऊन वीस वर्षे झाली. अशा मुरब्बी पंडिताने हे काम हाती घेतले ते योग्य होय.

हे वेचे काढण्याची कल्पना सुचवून वेळोवेळी प्रोत्साहन देत राहणाऱ्या प्रा. सुनीतिकुमार चतर्जीसारख्या भाषाशास्त्राचा जन्मभर निदिध्यास असलेल्या ज्येष्ठ पंडितवर्यांनी पितृतुल्य वात्सल्याने या ग्रंथाला प्रस्तावना लिहिली आहे. त्यात डॉ. तुळपुळे यांनी केवळ मराठीच्याच नव्हे तर सर्व संस्कृतोद्भव भाषांच्या शास्त्रीय क्षेत्रात signal service दिल्याबद्दल त्यांचा गौरव केला असून प्रस्तुत वेच्यांचा आदर्श पुढे ठेवून जुनी बंगाली, आसामी, ओरीया, मैथिली वगैरे भाषांचे वेचे काढले जावेत अशी इच्छा प्रदर्शित केली आणि काही दिशा दाखवून या प्रयत्नात सुधारणा व्हावयास पाहिजे असेही त्यांनी सुचवून ठेविले आहे.

ऋषितुल्य पाश्चात्य पंडितांनी कार्याचे महत्त्व दाखवून दिलेला कोट या ग्रंथाभोवती आहे. अशा प्रकारचे काम भारतात अद्याप झालेले नाही अशी ग्वाही देऊन एमेनोंनी भाषाशास्त्राखेरीज जुने मराठी वाङ्मय व ताम्रपट आणि इथल्या धर्मपंथांची माहिती मिळण्याच्या दृष्टीनेही या उताऱ्यांचा उपयोग आहे असे म्हटले आहे. आल्सडॉर्फ यांनी या वेच्यांच्या अभ्यासाने सुशिक्षित मराठी

अनुक्रमणिका

माणसाला आपल्या मातृभाषेच्या शास्त्रीय पार्श्वभूमीचे ज्ञान चांगल्या प्रकारे होईल; हे वेचे प्रातिनिधिक असून ते भाषेचे शास्त्र, साहित्य यांचा इतिहास समजण्याच्या दृष्टीने रंजक (interesting) झाले आहेत असे मत व्यक्त केले आहे.

स्वीट, इमर्सन, मॅकडोनल प्रभृतींच्या रीडर्सचा नमुना समोर ठेवून तयार केलेल्या मराठीच्या या रीडरचा हा पहिलाच प्रयत्न असल्याने त्याकडे सहानुभूतीने पाहणे इष्ट असले तरी आपल्या प्रस्तावात (Preface) डॉ. तुळपुळे यांनी केलेल्या विधानांचा निकष त्यांनी दिलेल्या उताऱ्यांना लावून पाहणे गैरवाजवी ठरू नये. हे वेचे प्रगत विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडणार आहेत. तसेच सुशिक्षित मराठी माणसालाही आपल्या भाषेची शास्त्रीय पार्श्वभूमी समजणे अगत्याचे आहे.

प्रस्तुत वेचे सादर करण्याचा मुख्य हेतू भाषेचे शुद्ध स्वरूप समजावे हा असल्याने भाषाशास्त्रीय दृष्टीला संपादकांनी प्राधान्य दिलेले आहे. अर्थात त्याचा विचार एखाद्या भाषाशास्त्रज्ञाने करावा. भाषाशास्त्रीय निष्कर्ष ज्या उताऱ्यांवरून काढले गेले आहेत त्या उताऱ्यांचा मराठीच्या पुरताच विचार करणे एवढीच या परीक्षणाची मर्यादा आहे.

"For each Selection, the *best edition available from the standpoint of linguistic parity has been followed*. The pages of the Reader have not been burdened, however, with variant readings from other texts.... *The selections have been reproduced in their integrity* in all essential particulars. Though regularization of orthography has not been attempted in general, some liberty had to be taken with regard to the mediaeval punctuation, and in certain cases even of orthography for the purpose of clarity."

(Italics mine) (Preface p. IV)

Linguistic parity आणि integrity या शब्दांचे रूढार्थ घेतले तर उताऱ्यामध्ये वस्तुस्थिती वेगळी आहे. सूत्रपाठाच्या आचार प्रकरणातल्या छोट्या छोट्या १५ वाक्यांमध्येसुद्धा (Extract 10) 'उपयोग' ऐवजी 'उपेगा' किंवा 'च्यार 'च्या जागी 'च्यान्ही' हे फिरविलेले पाठ नेनेसंपादित आवृत्तीशी ताडून पाहिल्यास आढळतील. पाहिजे तसे ऱ्हस्व-दीर्घाचे बदल किंवा मुळात नव्हते त्या ठिकाणी अनुस्वार पाहिले म्हणजे purpose of clarity म्हणजे काय ते कळत नाही. 'ञ साठी ओ किंवा स्छ करता स्थ हे बदल समजू शकतात. शिशुपालवध आणि वच्छहरण हे ग्रंथ श्री. भावे व डॉ. कोलते यांनी प्रकाशित केले. भाव्यांची आवृत्ती कोणीही चिकित्सक किंवा भाषाशास्त्रीय समजणार नाही. उलट डॉ. कोलते यांनी अतिशय साक्षेपाने संपादन केलेल्या आवृत्तीमध्ये पाठभेदसुद्धा त्यांनी दिलेले आहेत. परंतु कोलत्यांची चिकित्सक आवृत्ती सोडून (Ext. 28) व शिशुपालवध (Ext. 30) वछाहरण या दोन्ही उताऱ्यांचा कल भावे प्रवृत्तीकडे झुकला आहे. शिशुपालवधातील उताऱ्यांतले २० पाठ भावे प्रतीशी न जुळणारे व २१ कोलते प्रतीहून भिन्न आहेत. आणि ६ पाठ दोहोपैकी एकातही न मिळणारे आहेत. वछाहरणात ४६ पाठ भावेसंहितेपेक्षा निराळे दिसतील. उद्धवगीतेतला उतारा (Ext. 29) कोलते प्रतीवरोबर वाचला तर ६ ठिकाणी ऱ्हस्व-दीर्घांची उलटापालट झाली आहे. पाठभेद असतील तेव्हा पाठांचा स्वीकार करण्यासाठी काही तत्त्व लागते. या ठिकाणी कोणते तत्त्व आहे हे समजणे कठीण पडते. पाठभेदांची चिकित्सा करून विशिष्ट स्थळकाळानुरूप पाठनिश्चिती करणे हे भाषाशास्त्राचे एक उपांग असून ते एक स्वतंत्रच शास्त्र आहे असे म्हणतात.

पाठभेदातून निवड करण्याची पाळी दोन किंवा अधिक पोथ्यांच्या प्रती किंवा पुस्तकांच्या आवृत्त्या असतील तर निर्माण होते. परंतु 'लीलाचरित्र' या ग्रंथाची कै. ह. ना. नेने यांनी काढलेली एकच आवृत्ती उपलब्ध आहे. लीलाचरित्रातील पूर्वार्ध, भाग ४, पृष्ठ ४६ वरून घेतलेला उतारा ( Ext. 9 ) शी पडताळून पाहिला तर उताऱ्यातील " आणूं, बहिरीं, दारवंठाचियें, सोंडियेवरी, घेऊनि, ह्मणितलें, उतरिला, पालटिली, पुढां, घरां वेंचौनि, वसती " हे पाठ नेने प्रतीमध्ये " आणू, वाहीरि, दारवंठाचीये, सोंडीयेवरि घेउनि म्हणीतलें, उतरीला, पालटीली, पुढे, घरा वेचौनि, वस्ति" असे आढळतात. एरवी मामुली वाटणारे ऱ्हस्व-दीर्घाचे बदल उच्चारप्रक्रिया तपासणाऱ्या भाषाशास्त्रीय विवेचनात महत्त्वाचे ठरतील.

शिवाय या उताऱ्यातील काही फरक लक्षात घेण्यासारखे आहेत.

| डॉ. तुळपुळे | श्री. नेने |
| --- | --- |
| ओळ | |
| (१) ४ " उतरिले सोंडियेवरी उभे असति :" | " उतरिले सोंडीयेवरि आसन : ।। तथा हीराइसा पाठः ।। उभे असतिः " |
| (२) ५ " गांवांतु काइ मातुः वार्ता : " | " गांवांतु वार्ताकाइः ।। तथा हीराइसा पाठः इंद्रेया नगरांतु काइ मातुः वार्ता :" |
| (३) १० वार्ता कैसीनेणाः एसणें राज्यांतर जालें : " | " कैसीनेणाः रामेश्वरवासः ।। तथा हीराइसा पाठः कैसें कांहीं नाहींः एसणें राज्यांतर जालें: " |
| (४) ११-१२ " खाटारे दाखविले : मग ते गेले : " | " खाटारे दाखविलेः एकू वेळ शोधावा : मग ते गेले : |

अशा ठिकाणी परशरामवास, रामेश्वरवास, हीराइसा पाठ इत्यादि भाग सोडण्यात काही गैर नाही. परंतु ध्यानात घ्यावयाची गोष्ट ही की हीराइसा पाठ केव्हा स्वीकारला आहे (१) तर केव्हा सोडला आहे (३) तर कोठे वाक्य तोडून इतर पाठांशी त्याची सरमिसळ केली आहे. (२) उताऱ्यातील १४ व्या ओळीत काही मजकूर सोडलेला दाखविण्यासाठी दोन ठिकाणी टिंबे दिली आहेत तशी वरील ३ व ४ उदाहरणांत दिली असती तर ते शास्त्रदृष्टचा सयुक्तिक झाले असते. अशी अकारण धरसोड कोणत्याही शास्त्राला मंजूर नाही.

ज्योतिषरत्नमालेतील ज्या उताऱ्यापासून या ग्रंथाला सुरुवात होते तो पहिलाच उतारा जाणत्या वाचकाला गोंधळात टाकील. त्याचा सूक्ष्म विचार करण्याचे कारण नाही म्हणून केवळ उतारेच येथे उद्धृत करणे योग्य होईल. श्रीपतिभट्टाची स्वतःची मराठी संहिता उपलब्ध नाही. रत्नमालेच्या संपादकांना मिळालेल्या हस्तलिखितांपैकी एक राजवाडयांचे श्रीपतीच्या मागाहून ४०० वर्षानंतरचे व दुसरे गोंडे यांच्याकडून मिळालेले ७०० वर्षानंतरचे आहे. म्हणजे त्या दोन पोथ्यांमध्ये ३०० वर्षांचे अंतर आहे. त्या दोन्हीमध्ये परस्परांशी मेळ घालता येणार नाही अशी वाक्यरचना आहे. सर्व बारीक सारीक पाठभेदांची चिकित्सा केल्यानंतरही ( पृ. २०–४८) ज्योतिषरत्नमालेच्या संपादकांना त्या दोन संहिता वेगळ्या ठेवाव्या लागल्या. डॉ. तुळपुळ्यांनी पृ. १५६ वर त्या संहितांतील महत्त्वाचे फरक दाखविल्यावरही त्यांना असे वाटले की " it is necessary to fuse these two together with an

attempt at some reconstruction."

सन १०३९ मधील श्रीपतीची मराठी संहिता दाखविण्यासाठी ते उतारे fuse झाले ते असे :

**गोडे प्रत : शके १६४३**

जया ईश्वररूपा योगी परमसमाधिवंत नेणती।। ते कैसे ज्ञान।। जयाचा प्रभव म्हणिजे उत्पत्ति, विरति म्हणिजे नाश, मध्य ह्मणिजे स्थिति, यांच्या जाणावयातें असमर्थु।। मावत्यानें कैसें।। विदित म्हणिजे जाणीतलें आहे परमतत्व जेहीं तयासि नमस्कारु ।।...

गर्गादि मुनीश्वरीं केलीं शास्त्रें, आणीक वाराहमिहरु लल्लादिकीं आचार्यीं तेहीं केलीं जियें शास्त्रें, तियें समस्तें अवलोकूनि मग मी श्रीपति रत्नाची माला रचिते[१]–वोविते[२] ज्योतिष नावें रत्नें, तयांची माला दैवज्ञ जे ज्यो[ति]षी तयांचेया कंठीं अलंकारावेया कारणें ।।

**राजवाडे प्रत : शके १३७० सुमार**

प्रभव म्हणिजे उत्पत्ति, – मध्यम – स्थिति, विरति[१] तो प्रळयो, ऐसा[२] त्रिविधु कालु तया काळाचा विपैं ज्ञाने वंध्यें – निर्फळें जालि ।। कोणांचि, जेहि जाणितिले परमतत्व तेयाचि ज्ञानें अतिसें निर्फळें जालि, उत्पत्ति, स्थिति, प्रळयो ऐसें[३] नेणति ऐसा[४] जो कालु ईश्वरु तेया [ 2 a ] सि नमस्कारु...

गर्गादि मुनिश्वरीं केलि शास्त्रें अणिक वाराहमिहराचार्य - लल्लादिकि आचा[2 b]र्यें तिहे केलि जें शास्त्रें, तियें समस्ते अवलोकुनु मग मीं श्रीपति रत्नाचि माळा रचितो[१]— ओविते[२] ज्यो[ति]ष नावे रत्ना, तेंयांचिया माळा दैवज्ञ जें ज्योतिषि तेयाचिया कंठा अळंकारावेया कारणें ।।

**श्रीपतीचे मराठी (शके ९६१) दाखविणारा उतारा**

जेआ ईश्वररूपा योगी परमसमाधिवंत नेणती तें कैसें ज्ञान। जेआचा प्रभवो म्हणिजे उत्पत्ति, मध्य स्थिति, विरति तो प्रळयो, ऐसा त्रिविधु कालु। तेआ कालाचां विपैं ज्ञानें वंध्यें निर्फळें जालि। कव्हणांचि। जेहीं जाणितिलें परमतत्व तेयांचि ज्ञानें अतिसें निर्फळें जालि। उत्पत्ति स्थिति प्रळयो ऐसें नेणति ऐसा जो कालु ईश्वरु तेआसि नमस्कारु।......

गर्गादि मुनीस्वरीं केलीं शास्त्रें अणिक वाराहमिहरुलल्लादिकीं आचार्यी तिहें केलि जियें शास्त्रें तियें समस्तें अवलोकुनु मग मी श्रीपति रत्नाचि माळा रचितों[३] ओवितो[४] ज्योतिष नांवें रत्नां तेयांचिया माळा दैवज्ञ जे ज्योतिषि तेयांचिया कंठा अलंकारावेया कारणें।

मराठी भाषेच्या विद्यार्थ्यांसाठी यावर भाष्य करण्याची गरज पडू नयें.

प्रस्तावात केलेलेले The arrangement of the Reader on the basis of a single dialect was necessitated by the absence of any dialectal variations preserved in either the literary or inscriptional forms. हे विधान तितकेसे रास्त नव्हे. या ग्रंथात वोलीचे भेद देता आले नाहीत ते वाजवी आहे. परंतु ते भेद नव्हेतच हे खरे नव्हे. त्यासाठी विशेष अभ्यासाची जरुरी आहे. लीलाचरित्रातील रामेश्वरवास, परशरामवास, हीराइसा वगैरे इतर पाठ नीट पाहिले तर काही ठिकाणी शब्दांची निवड, लिंगाचा वापर, क्रियापद-रूपे इत्यादींतून वोलीतले भेद डोकावतात. चक्रधराच्या तोंडी गुजराथी व हिंदी छापाची वाक्ये आहेत. त्याचप्रमाणे मुधोळ-मिरजकडील ११ व्या शतकातल्या उत्कीर्ण लेखांमधील मराठी वाक्यांवर कानडीची छाया होती. (A. V. Naik, Deccan College Bulletin IX, p. 55) असे उतारे या ग्रंथात आले असते तर विदर्भातल्या व कुंतल

देशातल्या मराठी भाषेवर चांगला प्रकाश पडू शकला असता.

ज्या आधारावर Reader ची भाषाशास्त्रीय प्रस्तावना लिहिलेली आहे त्या यादवकालीन मराठी साहित्याच्या उत्कृष्ट आवृत्त्यांमधील उताऱ्यांच्या integrity चे स्वरूप साधारणपणे असे दिसते. प्रस्तावनेवरून 'तहान' हा शब्द स्वरान्त (पृ. १६) आणि व्यञ्जनान्त (पृ. १७) अशा दोन्ही प्रकारे उच्चारात होता काय? अशी शंका आली व पुढेच In practice all these words are written as ending in vowels, though they actually end in consonants हे वाचून अधिकच संभ्रम उत्पन्न झाला. अर्थात हे क्षेत्र आपले नव्हे. त्या गोष्टी भाषाशास्त्रज्ञाने पाहावयाच्या आहेत.

येथे प्रस्तावातील विधानांच्या अनुषंगाने मराठी उतारे पडताळून पाहणे आणि शास्त्रीयदृष्ट्या "The book..should prove eminently useful in giving educated speakers of Marathi a better and more scientific knowledge of the background of their Mother tongue" ही Alsdorf यांची अपेक्षा सार्थ आहे किंवा कसे हे समजावून घेणे एवढाच हेतू आहे.



# मुनि केशिराजविरचित मूर्तिप्रकाश

संपादक : डॉ. वि. भि. कोलते
विदर्भ संशोधन मंडळ ग्रंथमाला, क्र. २०
पृष्ठे ६८ + ४६७. किंमत १० रुपये

समीक्षक
रा. चिं. ढेरे

डॉ. वि. भि. कोलते यांचा महानुभावीय वाङ्मयाचा प्रचंड व्यासंग प्राचीन मराठी वाङ्मयाभ्यासाच्या क्षेत्रात सुपरिचित आहे. आद्य महानुभावीय ग्रंथांचे साक्षेपी संपादक आणि महानुभाव पंथाचा इतिहास, सिद्धान्त आणि साधना या विषयाचे अधिकारी अभ्यासक म्हणून त्यांची कामगिरी महनीय अशी आहे. मुनि केशिराजविरचित 'मूर्तिप्रकाशा'चे प्रस्तुत संपादन त्यांच्या आजवरच्या कीर्तीला साजेसेच आहे.

मुनि केशिराज ऊर्फ केसोवास यांचा हा 'मूर्तिप्रकाश' ग्रंथ शके १२१० मध्ये रचला गेला. "केसोवासांची मूर्ती दिवंगत होऊन आज सातशे-साडेसातशे वर्षे लोटली असली तरी त्यांचा 'मूर्तिप्रकाश' अजून दैदीप्यमान आहे. केसोवास जसे खडतर विरक्त होते, शास्त्रांचे जाणकार होते, तसेच ते उत्तम कवीही होते. 'मूर्तिप्रकाश' हे त्यांच्या काव्य-वैजयंतीमधील अत्यंत प्रकाशमान असे रत्न होय. या काव्यात त्यांची विद्वत्ता आणि सहृदयता, काव्यशक्ती आणि परमेश्वरभक्ती याचे मोठे मनोहर मिश्रण झालेले आहे. परमेश्वराविषयीच्या आत्यंतिक भक्तिभावनेने भरून आलेल्या कवीच्या अंत:करणाचाच हा उद्गार आहे." अशा शब्दांत संपादकांनी केसोवासांचा आणि त्यांच्या या कृतीचा गौरव केला आहे, तो सर्वस्वी यथार्थ आहे.

श्रीचक्रधराच्या मूर्तीचे वर्णन हा 'मूर्तिप्रकाशा'चा विषय आहे. या मूर्तिवर्णनासाठी कवीने डोमेग्राम येथील पूजावसराचा प्रसंग आधाराला घेतला आहे. त्यामुळे मूर्तिवर्णनाबरोबरच श्रीचक्रधराचा नित्यविहार आणि नित्योपचार यांचीही वर्णने प्रस्तुत ग्रंथात आलेली आहेत. महानुभावीयांच्या दृष्टीने श्रीचक्रधर हा प्रत्यक्ष ईश्वरावतार असल्यामुळे त्याच्या सन्निधानात राहण्याचे अहोभाग्य

लाभलेल्या व्यक्तीच्या हृदयात अपार भक्तिभावाचा महासागर हेलावलेला दिसला तर त्यात आश्चर्य नाही. वर्ण्य विषयाबद्दलची सर्वोच्च निष्ठा, पंथीय आचार-विचारांचा निष्ठायुक्त व्यासंग, विदग्ध 'गुरुकुळा'चा रसिक सहवास, संस्कृतातील शास्त्रीय आणि वाङ्मयीन ग्रंथांचे व्यापक परिशीलन आणि उत्तुंग कल्पनाशक्ती यांमुळे केसोबासांचे 'मूर्तिप्रकाश' हे काव्य कल्पनाप्रचुर आणि भावमधुर बनले आहे.

श्रीचक्रधराच्या मूर्तीचे नख-शिखान्त वर्णन करताना केसोबासांच्या श्रद्धायुक्त दृष्टीला 'गुपीत अवेवाची शोभा' उपमा-उत्प्रेक्षांच्या साहाय्याने वर्णन करणे अप्रशस्त वाटत नाही, हे स्वाभाविकच आहे. मूर्तिवर्णनाच्या अनुषंगाने केसोबासांनी महानुभावीय सिद्धान्तांचे विस्तृत विवेचन केले आहे, ते त्यांच्या पंथनिष्ठेचे आणि व्यासंगाचे द्योतक आहे. प्रस्तुत काव्यविषयात सुसंबद्ध कथेचे सूत्र नसतानाही केसोबासांनी अनेक स्थळी रसिकांची हृदये हेलावून सोडण्याची शक्ती व्यक्त केली आहे. श्रीचक्रधरस्वामींनी 'उत्तरापंथे बीजे केल्या'-नंतर त्यांचा परमप्रिय शिष्य नागदेवाचार्य याच्या मनाची जी विरहव्यथित अवस्था झाली तिचे वर्णन केसोबासींनी अत्यंत भावसघन बनविले आहे. नागदेवाचार्याची भग्नहृदय अवस्था आणि महदंबेची त्याच्याविषयीची माया यांचे चित्रण केसोबासांच्या भावरंजित कल्पनाशक्तीतून अतिशय रसाळ उतरले आहे.

अशा या आद्य महानुभावीय साहित्याकाशातील एका नक्षत्राचे संपादन डॉ. कोलते यांनी नेहमीच्या साक्षेपाने केले आहे. प्रस्तुत काव्याची संहिता सिद्ध करण्यासाठी त्यांनी चार प्राचीन हस्तलिखिते वापरली आहेत. प्रारंभी प्रदीर्घ प्रस्तावनेत संपादन-सामग्रीचे स्वरूप, संपादनाची भूमिका, सकळ लिपीच्या संकेताचा उलगडा, ग्रंथकर्तृत्वाचा निर्णय, ग्रंथाचा लेखन-काळ, ग्रंथकाराचे चरित्र, काव्याचे अंतरंग-दर्शन, वाङ्मयीन मूल्यांकन आणि काही भाषाविशेष इत्यादि विषयांची विस्तृत चर्चा केलेली आहे. तसेच, शेवटी ओवीशः विपुल अर्थनिर्णायक टीपा दिलेल्या असून, त्या त्या शब्दाचे उपयोजन ज्या ओवीत झाले आहे त्या ओवीच्या क्रमांकासह विस्तृत शब्दकोशही जोडला आहे. ग्रंथात येणाऱ्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष स्फुट उल्लेखांच्या आधारे व्यक्त होणारे तत्कालीन समाजाचे चित्र प्रस्तावनेत स्पष्ट केले असते, तर यादवकालीन इतिहासाच्या अभ्यासकांना ते उपयुक्त ठरले असते.

साक्षेप हे डॉ. कोलते यांच्या संपादनकार्याचे प्रमुख वैशिष्टच आहे. परंतु त्यांचा हा साक्षेप आणि त्यांची चिकित्सा महानुभावीय दृष्टिकोनाने नेहमी बद्ध असते. महानुभावीय मंडळींच्या श्रद्धेला यत्किंचितही धक्का पोचू नये अशा सावधपणाने ते आपली चिकित्सा चालवितात. त्यामुळे त्यांचे या क्षेत्रातील कार्य पंथीय पंडिताच्या कार्यासारखे वाटले. अर्थात ही मर्यादा त्यांनी सहेतुकपणेच पत्करली आहे. या मर्यादेचे रहस्य त्यांनी मागे 'महानुभाव तत्त्वज्ञान' या ग्रंथाच्या 'हृद्गता'त स्पष्ट केलेच आहे. त्यांनी आपल्या बौद्धिक स्वातंत्र्याला काहीशी मुरड घालून महानुभावीय महंतांची मर्जी सांभाळली म्हणूनच ते आद्य महानुभावीय वाङ्मयाचे भांडागार अधिकृत स्वरूपात उपलब्ध करून देऊ शकले. डॉ. कोलते यांच्या या सर्व परिश्रमामागे असलेला हा गुप्त त्यागही त्यांच्या ज्ञानतपस्येला वेगळाच उजळा देणारा आहे.

आद्य महानुभावीय वाङ्मयातील आणखी एका उत्तम ग्रंथाचे उत्तम संपादन केल्याबद्दल जाणते मराठी रसिक आणि प्राचीन मराठीचे अभ्यासक डॉ. कोलते यांना मनापासून धन्यवाद देतील.

## ' लोकनाट्याची परंपरा '

समीक्षक
म. ना. अदवन्त

संपादक : वि. कृ. जोशी
प्रकाशक : ग. ल. ठोकळ
लेखनवाचन भांडार पुणे २.
पृष्ठे २५८ : किमत ८ रुपये

'लोकनाट्याची परंपरा ' या ग्रंथाचे स्वरूप काहीसे संशोधनपर व काहीसे माहितीवजा असे आहे. मराठी नाटक जरी १८४३ साली रंगभूमीवर आले असले तरी त्याची बीजे लोकनाट्याच्या स्वरूपात फार पूर्वीपासून महाराष्ट्रात रुजली आहेत. त्यांचा परिचय श्री. वि. कृ. जोशी यांनी आपणांला या ग्रंथातून करून दिला आहे.

लोकनाट्याचे प्रथम दर्शन त्यांनी घडविले आहे ते काष्टपांचालिका नाट्याच्या रूपाने. काष्टपांचालिका नाट्य किंवा कळसूत्री बाहुल्यांचा खेळ याची परंपरा फार जुनी आहे. त्याचे ठिकठिकाणी आलेले उल्लेखही श्री. जोशी यांनी दिलेले आहेत. पण त्यापेक्षा विशेष आकर्षक भाग म्हणजे राजस्थान, उत्तर हिंदुस्थान, दक्षिण हिंदुस्थान अशा ठिकठिकाणी होणाऱ्या कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांचे वर्णन. उदाहरणार्थ, राजपुतान्यातील खेळ त्या प्रांतातील वीर पुरुषांच्या चरित्रावर आधारलेले आहेत असे सांगून ते अमरसिंह राठोड या वीर पुरुषाच्या चरित्रावर आधारलेल्या एका खेळाचे वर्णन करतात. दक्षिण हिंदुस्थानात अशा खेळासाठी पौराणिक कथेचा आश्रय घेतला जातो, अशी एक कथा त्यांनी विस्ताराने वर्णन केली आहे. ही सर्व माहिती अगदी नवीन व त्यामुळे मनोरंजक वाटते. महाराष्ट्रात या नाट्याला ' यमपुरी ' या नावाने संबोधीत असत. अशा 'यमपुरी'चे दर्शनही त्यांनी यातून घडविले आहे.

त्यानंतर ते ' दशावतार ' या लोकनाट्याच्या प्रकाराकडे वळले आहेत. प्रथम दशावताराची माहिती देऊन ते गोमंतक व दक्षिण कोकण या भागांत लोकप्रिय असलेल्या ' दशावतारा 'च्या प्रयोगाचे वर्णन देतात. दशावताराच्या प्रयोगांचे ठिकठिकाणी आलेले उल्लेख त्यांनी परिश्रमपूर्वक गोळा केले आहेत व त्यांतून दशावतारी नाटकाचे मूळ दक्षिण कोकणातच कसे आहे, त्या नाटकाची परंपरा किती जुनी आहे व मराठी रंगभूमीचा उदय या परंपरेतून कसा झाला आहे हे सिद्ध करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. जाता जाता गोव्यातील ' गौळण काला ' या नाट्यप्रकाराचेही दर्शन त्यांनी घडविले आहे.

' ललित ' या लोकनाट्याचे बीज त्यांना भारुडात दिसते. त्यासाठी एकनाथांच्या अनेक भारुडांचा त्यांनी विचार केला व त्यांतून नाट्य कसे निर्माण होऊ शकत होते हे दाखविण्याचा प्रयत्न केला. एकनाथाची ' विंचु चावला ' किंवा ' सत्वर पाव ग मला । भवानि आई, रोडगा वाहिन तुला ' या सारख्या भारुडात नाट्याला किती अवसर आहे हे सांगून ललिताचे बीज भारुडात कसे आहे हे साधार दाखविण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. नंतर ' ललिता 'च्या प्रयोगाचे त्यांनी वर्णन दिले आहे. कोणकोणती पात्रे ललितात रंगभूमीवर येतात, त्यांच्यामध्ये संवाद कशा पद्धतीचा चालतो, हास्य निर्माण करण्यासाठी कोणकोणत्या साधनांचा ते उपयोग करतात, त्याचे कथानक कोणत्या स्वरूपाचे असते इत्यादि सर्व तपशील त्यांनी अतिशय मनोरंजक रीतीने दिला आहे.

विशेषतः पूजा सांगणाऱ्या ब्राह्मणाच्या सोंगाच्या तोंडी जे मंत्र असत ते मोठे वाचण्यासारखे आहेत. याचा एक नमुना पाहा —

स्नानार्थे — नदी-विहिरी तलावस्य, अद्य ओढा तथैव च
मोरी गटार इत्येव स्नानार्थ प्रतिगृह्यताम् ।।
धूपार्थे — तंबाखू तांवडा हिरवा एकत्र करुनी तथा
चिल्मी भरूनि ओढावी, सोडावा धूर त्यावरी
धूपार्थे गांजाची चिलीम समर्पयामि ।।

ललितानंतर 'गोंधळ' या प्रकाराचा विचार त्यांनी केला आहे. गोंधळाची उत्पत्ती, तिचे प्राचीनत्व, तिचे स्वरूप व तिचे दोन प्रकार याचे त्यांनी केलेले विवेचन अतिशय माहितीपूर्ण तर आहेच, पण तितकेच मनोरंजक पण आहे.

शेवटी ते तमाशाकडे वळतात. प्रथम तमाशा या लोकनाटचाची वीजे महाराष्ट्रांत प्रचलित असलेल्या करमणुकीच्या प्रकारांतच कशी आहेत हे सांगून तमाशाची निरनिराळी अंगे ते विस्ताराने वर्णन करतात. 'कलगी–तुरा' हा तमाशातील एक महत्त्वाचा प्रकार. कलगी-पक्ष व तुरापक्ष यांच्या भांडणातून निर्माण झालेल्या सवाल-जवाबांच्या कवनाला भेदिक लावण्या असे नाव दिले जाते. अशा भेदिक लावण्यांचे अनेक प्रकार श्री. जोशी यांनी दिले आहेत व त्या लावण्यांतून अध्यात्मातील कूटप्रश्न कसे विचारले जात असत याची कल्पना दिली आहे. ही सारी कवने मोठी मनोरंजक वाटतात. त्यानंतर पेशवेकालीन तमाशाचे स्वरूप त्यांनी वर्णन केले आहे. गणगौळण–लावण्या–भेदिक – कवन व मुजरा या पाच घटकांचे त्यांनी विस्ताराने वर्णन केले आहे व त्यांतून निर्माण होणारे काव्य व वाङ्मय कालसापेक्ष कसे होते हे दाखविले आहे. नंतर 'आधुनिक तमाशा'चे स्वरूप त्यांनी मोठ्या विस्ताराने सांगितले आहे. सांप्रदायिक तमाशाची 'गण व गौळणी', 'लावण्या', फार्स व वग – आणि भेदिक लावण्या ही जी महत्त्वाची अंगे त्याचे विवेचन पठ्ठे बापूरावांच्या कवनाच्या व वगाच्या साहाय्याने त्यांनी अतिशय चांगल्या रीतीने केले आहे. 'मिठाराणी' किंवा 'महाराची पोर' यांसारख्या काही वगांचा त्यांनी दिलेला गोषवारा पाहता त्यात केवढे नाटच भरले आहे याची कल्पना येते.

'शाहिरी वाङ्मयाचे स्वरूप' हा या पुस्तकाचा शेवटचा भाग पारंपरिक स्वरूपाचा आहे. — पुस्तकाची खरी मौलिकता लोकनाटचाचे जे विविध प्रकार त्यांनी वर्णन केले आहेत त्यांत आहे. त्यासाठी त्यांनी किती माहिती जमविली व किती परिश्रम घेतले याची कल्पना येते. त्यामुळेच हा ग्रंथ जितका माहितीपूर्ण झाला आहे तितकाच मनोरंजक पण झाला आहे.

❀ ❀ ❀

---

एक खुलासा :–'पत्रिके'च्या मागील जानेवारी अंकात 'पहाट-स्वप्न' या कथासंग्रहाच्या परीक्षणात तो संग्रह पुण्याच्या दै. 'विशाल सह्याद्री'चे संपादक श्री. अनंतराव पाटील यांचा असल्याचे अनवधानाने लिहिले गेले आहे. पण वस्तुस्थिती अशी आहे की, प्रस्तुत संग्रह नागपूरकडील कथालेखक श्री. अनंतराव पाटील यांचा आहे. नामसादृश्यामुळे झालेली ही चूक 'विशाल सह्याद्रि'चे संपादक श्री. अनंतराव पाटील यांनी पत्र पाठवून आमच्या निदर्शनास आणली यावद्दल त्यांचे आभार.

— संपादक

# श्री कबीर वचनावली

[ श्री संत कबीरांच्या काव्याचा समवृत्त पद्यानुवाद. ]

समीक्षक
**श्रीपाद जोशी**

अनुवादक : प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित
प्रकाशक : सुविचार प्रकाशन मंडळ,
नागपूर-पुणे.
पृष्ठे : ३२७ + २०. मूल्य : ७ रुपये ]

महाराष्ट्रात तुकारामाचे जे स्थान तेच हिन्दी प्रदेशात कबीराचे समजले जाते. सामान्य जनतेतून पुढे आलेल्या या संतकवींनी बहुजनसमाजाला सहज समजेल अशा भाषेत ईश्वरभक्ती व सदाचार यांचा उपदेश केला. हा उपदेश इतका प्रभावी ठरला की चार-पाचशे वर्षांनंतर हा सामान्य लोकांनाच नव्हे तर विद्वानांना व रवीन्द्रनाथांसारख्या विश्व-कवींनाही त्याने आकर्षित केले; व त्याचे आकर्षण यापुढेही कायम राहील असे दिसते.

कबीर आणि तुकाराम हे दोघेही स्पष्ट-वक्ते, किंबहुना फटकळ म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांच्या काव्यांतील कडवटपणा व हिरवटपणा अनेकदा शिष्टाचाराच्या मर्यादांचे उल्लंघन करतो. परंतु तरीही त्यांची 'वाणी' वाचा-वीशी, ऐकावीशी वाटते. यामुळेच त्यांच्या काव्यांची इंग्रजी भाषांतरेही चांगलीच लोक-प्रिय झाली आहेत.

कबीराची वाणी जरी हिंदीत असली तरी अहिंदी भाषकांनाही ती फार थोड्या प्रयत्नाने कळू शकते. कारण त्याने तुलसीदासाप्रमाणे अवधीचा किंवा सूरदासाप्रमाणे व्रज-भाषेचा अवलंब न करता अखिल भारताला सामान्यतः परिचित असलेली खडी बोली वापरली आहे. त्यामुळे मराठी माणसालाही ती अल्प सायासाने समजू शकते.

प्रा. भ. श्री. पंडित यांनी सादर केलेला प्रस्तुत पद्यानुवाद वाचताना प्रथमच असा विचार मनात येतो की, या पद्यानुवादाचे प्रयोजन काय? हिंदी न येणाऱ्या वाचकाला मराठी अनुवादावरून मूळ काव्य समजावे हा हेतू असेल, तर तो विशेष सफल झाला आहे, असे दिसत नाही. पुष्कळदा मराठी अनुवादाचा अर्थ समजण्यासाठी मूळ हिन्दी पाहावे लागते. उदाहरणार्थ :

'नाम असे की घ्यावया; अन्न – द्यावया 'दान'।
तरावया–'स्वाधीनता'; बुडावया –
'अभिमान' ॥

या अनुवादावरून काय अर्थबोध होतो? परंतु त्याऐवजी हा मूळ दोहा वाचल्यास तो अधिक लवकर समजतो :–

लेनेको सतनाम है, देनेको अनदान।
तरनेको आधीनता, बुडनेको अभिमान ॥

माणसाजवळ घेण्यासारखे काय आहे? तर सतनाम–ईश्वराचे नाव. देण्यासारखे आहे अन्नदान. त्याला भवसागर तरून जावयाचे असेल तर त्याने नम्रता किंवा ईश्वराचे दास्यत्व यांचा अवलंब करावा आणि बुडावयाचे असेल तर घमेंड बाळगावी.

अनुवादातील हा दोष मुख्यतः हिन्दी भाषेवरील प्रभुत्वाच्या अभावामुळे निर्माण झाला आहे. 'आधीनता' या शब्दासाठी श्री. पंडित यांनी वापरलेला 'स्वाधीनता' हा शब्द मराठीत अगदी उलटा अर्थ देणारा आहे. त्यामुळे दोह्याचा अर्थच बदलून जातो.

अगदी प्रारंभीच (पृष्ठ १७) 'इक लख पूत, सवा लख नाती' याचा अनुवाद 'लक्ष पुत्र, लक्षावधि नाती' असा केला आहे. हिंदीचे सामान्य ज्ञान असलेली व्यक्तीही सांगू शकेल की 'नाती' या हिंदी शब्दाचा अर्थ

'नातू' असा असून त्याचा 'नाते' या मराठी शब्दाशी काही संबंध नाही. हिन्दी 'नाती' हे संस्कृतच्या 'नप्तृ' शब्दाचे तद्भव रूप आहे, तर 'नाते' हा मराठी शब्द संस्कृत 'ज्ञाति' शब्दापासून बनलेला आहे. एवढा फरक पंडितांसारख्या विद्वानांना माहीत नसेल असे नव्हे. परंतु अंत्यानुप्रास जमविण्यासाठी त्यांना अनेक ठिकाणी अशी अर्थाची ओढाताण करावी लागलेली दिसते. उदाहरणार्थ, 'गारि' (गाली = शिवी) या शब्दाचा अनुवाद त्यांनी 'थाप' असा केला आहे (पृ. २४), तर 'घास' (गवत) व 'संसार' (जग) हे हिन्दी शब्द, मराठीत त्यांचे अर्थ वेगळे असूनही, हिन्दी अर्थांनीच वापरले आहेत. (पृ. ३५ व ३७), 'ऊतला' (पृ. २४) या शब्दाचा 'वेगवान्' हा अर्थ न घेता मुळाशी विसंगत असणारा 'उताविळा' हा अर्थ त्यांनी घेतला आहे.

वस्तुतः आज महाराष्ट्रामध्ये हिन्दी-मराठीत पारंगत असलेले अनेक जाणकार विद्यमान आहेत. त्यांच्यापैकी कोणाची तरी मदत प्रा. पंडित यांनी घेतली असती तर या ढोबळ चुका टळू शकल्या असत्या. परंतु खरी अडचण अशी आहे की, पंडितांच्या अनुवादात कबीराचा प्रसाद व रसाळपणा या दोहोंचा लोप झालेला आहे. त्यामुळे असे वाटते की त्यांनी समवृत्त पद्यानुवाद न करता सरळ व सुलभ गद्यानुवाद केला असता तर वाचकांनी त्यांना धन्यवाद दिले असते.

पदावलीच्या अनुवादात तर ही रूक्षता विशेषच जाणवते. अलीकडे बोरकर-बापट-पाडगावकरांनी मीरा–कबीर–तुलसी वगैरे हिन्दी संतकवींच्या पदांचे केलेले गेय अनुवाद ज्यांनी ऐकले असतील त्यांना हे विधान चटकन कळू शकेल. पंडितांच्या पद्यानुवादांपैकी किती पदे गायिली जातील व लोकप्रिय होतील हे सांगणे कठिण आहे. म्हणूनच मी प्रारंभी म्हटले आहे की, पंडिताचा हा अनुवाद वाचताना क्षणोक्षणी असा विचार मनात येतो की या अनुवादाचे प्रयोजन काय ?

---

## आग्या मोहोळ

समीक्षक
**चंद्रकुमार डांगे.**

लेखक : डॉ. रंगनाथ देशपांडे,
प्रकाशक : ग. ल. ठोकळ,
लेखनवाचन भांडार, पुणे २.
मूल्य १० रु.

डॉ. रघुनाथ कुलकर्णी या आपल्या दोस्ताच्या ट्रंकेतील हे बाड डॉ. रंगनाथ देशपांडे यांनी मराठी वाचकांना सादर केलेले आहे. प्रारंभीच हे डॉक्टरांनी फार आवर्जून सांगितल्यामुळेच की काय, या दोघांचे अद्वैत वाचनाने पक्के होते.

या लेखनाच्या निमित्ताने एक नेहमीचा प्रश्न पुनः निर्माण होतो की, केवळ वास्तव अनुभवलेखन कलाकृतीच्या पातळीवर केव्हा येऊ शकते ? एखाद्या कलाकृतीचा घाट त्यातून स्वयंपूर्ण असा निर्माण होऊ शकतो काय ? अस्सल आत्मचरित्र देखील कलाकृती म्हणून गणली जाते ती केवळ अनुभवांच्या खरेखोटेपणावर नव्हे. लेखकाने पालन केलेली कलात्मक अलिप्तता आणि त्या अनुभवांना आलेले विश्वात्मक रूप, त्या रूपात सामावलेला आशय, त्याची घनता, एकजिनसीपणा, जीवनाच्या अनोख्या स्वरूपाची होणारी जाणीव इत्यादि गोष्टींमुळे ते लेखन जीवनस्पर्शी होते. तसा स्पर्श करण्याचे सामर्थ्य या लेखनाला केव्हा प्राप्त झाले असते हा खरा प्रश्न आहे.

दुर्दैवाच्या दशावतारात सापडलेला राघव हा दोन पातळयांच्या चिमटीत सापडलेला हळवा जीव आहे. उपकाराने वाकणारा, नीति-विचारांनी भारलेला, पाप देखील कबूल करणारा, जीवनातील हलाहल पचविणारा, स्वतःची कुतरओढ, कुतरओढ म्हणूनं खजील होणारा पण शरयूसारख्या, त्याच्या दृष्टीनें हव्याहव्याशा वाटणाऱ्या तडफदार स्त्रीच्या दीप्तीवर पतंगासारखी झेप घेणारा आणि या साऱ्यांतून सुटका होईल या आशेने आध्यात्मिक गूढतेशी लगटणारा असा हा राघव इतका गतानुगतिक कसा झाला हा पेच आहे. राघवाला कणा आहे का असा प्रश्न सारखा मनात येतो. एक वेळ सलग अगतिकता हीदेखील समजू शकली असती. पण तसे नाही. तो सरळ आजच्या प्रश्नावर, कुटुंबव्यवस्थेवर, अनाचारावर बेशक तुटून पडतो; नव्हे उपाय सुचवतो. घाटे मास्तर, मरू का सुरू, छापेकरांची इंग्लंडमधील खानावळ, सर्जन तारापूर, रिमाण काटप्पा, सुरेश काटकर, बौद्धिक भूक, संस्थानातील रामनवमीचा उत्सव, अंजनी (पुढे कंचनीच शब्द आला आहे– ), यासारख्या शेकडो निर्देशांनी तर या लेखनातील अलिप्तता पार नष्ट झालेली आहे. हा मोह जर या मित्ररूप अद्वैताने कटाक्षाने टाळला असता तर मग भीषण वास्तव आणि त्यापलीकडची मुक्ती यात चिरफळलेल्या राघवाची दारुण शोकांतिका अधिक जीवघेणी ठरली असती. उत्तुग हिमालयाच्या परिसरातील बोलकी वर्णने करण्यातच शब्दकळा अडकून पडली. नव्हे, वरील अनेक निर्देशांनी लेखनाचा काळत्र 'कालविपर्यासाने' शबल झालेला आहे.

हातांतून निसटलेली शरयूदेखील केवळ 'विजेसारखी' म्हणून समोर उभी राहत नाही. तिच्यासंबंधीचे अनेक निर्देश (साने कुटुंबाचा दुधाचा धंदा, वन्य जमातींचा माहिती जमविण्याचा छंद इ. इ.) ही व्यक्तिरेखा फार ओळखीची करून टाकतात. राधिकेबद्दल तर केवळ पूर्णादर प्रकट करून लेखक संतुष्ट होतो. या दोन व्यक्तिरेखा राघवाच्या जीवनात केवळ उसवलेल्या धाग्यासारख्या वाटतात. आपल्याला जे जे जाणवले ते ते सारे मनापासून सांगून टाकण्याच्या अनावर मोहामुळे ग्रामीण, शहरी आणि हिमालयीन घटना आणि व्यक्ती आल्या. त्याचाच परिणाम म्हणून हे लेखन चारशे पृष्ठांपर्यंत विस्तारले, रंग पातळ झाले, पसरले.

हे गेल्या पिढीतील एका भावनाप्रधान तरुणाचे आत्मश्राद्ध आहे. यामुळेच राघव हाच मन व्यापून टाकतो. त्या पिढीच्या (आज साठीला आलेल्यांच्या) पुढचे सारे प्रश्न राघवाला सोडवावे लागतात. अयशस्वी विवाह, असफल प्रेम, जीवन जगण्यासाठी प्रत्येक गोष्टीचे उदात्तीकरण करण्याची सवय, व्यायामाचा छंद, बेह्रूटपणा, पापभीरू वृत्ती, विशाल वाचन या साऱ्या खुणा सांगणाऱ्या राघवाचे हे एक मुक्त आत्मनिवेदन आहे. वर उल्लेखिलेले व आणखी किती तरी निर्देश जमेस धरले तर हे पटू लागते. मग रघुनाथ कुलकर्णी आणि डॉ. रंगनाथ देशपांडे यांच्या अद्वैतावर प्रकाश पडतो, द्वैत नष्ट होते.

आत्मश्राद्ध हा शब्दप्रयोगच या लेखनाच्या संदर्भात फार लक्षणीय ठरतो. त्याचा अर्थच ते एक प्रकट चिंतन असा होय. या चिंतनात प्रामाणिकपणानें निवेदन केलेले रसरशीत अनुभव अस्वस्थ करणारे. या लेखनाला विशिष्ट वाङ्मयप्रकाराचा घाट कल्पून त्याची उकल करणे अप्रस्तुत होय. मलपृष्ठावर निर्माण केलेले (ग्रामीण, नागर की प्रादेशिक ......कादंबरी) प्रश्न जमेस न धरणेच इष्ट. कारण लेखकाचा तो उद्देशच नाही.



# आपुलकीची झळ

समीक्षक
श्री. मा. कुलकर्णी

लेखक : दत्त रघुनाथ कवठेकर,
प्रकाशक : पंडित अनंत कुलकर्णी,
कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनवार, पुणे २
पृष्ठे २३६, मूल्य ६ रु.

" माझ्या बाबांनी मला माया कशी करावी तेव्हढंच शिकवलं. माणुसकी–प्रेम आणि व्यवहार यांची सांगड घालायला त्यांनी मला कधीच शिकविलं नाही. . . . आपुलकीच्या पोटी मी निःस्वार्थबुद्धीनं, निष्कपट भावानं घरच्याशी वागलो, आपपर भाव न ठेवता–स्वतःच्या कुटुंबाचंही तेही एक कर्तव्य म्हणून, काहीही हिताहित न पाहता–हाच माझा दोष, हीच माझी दुर्बलता. थोडा जरी शहाणपणानं वागतो, तरी ही झळ लागती ना! –मूर्ख ठरतो ना!! " आपुलकीची झळ लागलेल्या बापूंच्या (बापू या कादंबरीतील प्रधान व्यक्ती) या उद्गारात यांच्या व्यक्तित्वाचे दर्शन व जीवनाचे सारच नव्हे तर या कथेचेही सारसर्वस्व साठवले आहे. वाचकांचा मतभेद (बापूशी) होईल|तो त्यांनी वापरलेल्या 'दोष', 'दुर्बलता' व 'शहाणपणा' यांच्या वापराबद्दल व योजनेबद्दल! व्यवहार हा एक असा जादूगार आहे की तो माणसाच्या गुणांना दोष ठरवितो व दोषांना गुण आणि त्याच्या प्रभावाखाली दडपलेली बहुसंख्य माणसे–म्हणजेच जग–त्याचीच भाषा वापरतात. म्हणून बापूंसारख्या व्यक्ती दुर्बल व व्यवहारशून्य ठरतात. इतकेच नव्हे तर स्वतःही स्वतःला तसेच मानायला लागतात. व्यवहारही सांभाळायचा पण त्याच्यावर मातही करायची ही शक्ति-युक्ती फारच थोड्या–अगदी अपवादात्मक व्यक्तींतच असते. बापू महाळुंमकर त्यांतले नव्हेत. बापूंच्या व्यक्तित्वाचे त्या दृष्टीने सूक्ष्म व सखोल दर्शन घडविणे हा लेखकाचा उद्देशही नसावा!

एकत्र कुटुंबातील एका कर्त्या पुरुषाच्या वाट्याला आलेल्या दुःखांचे व क्लेशांचे एक वास्तव चित्र या कथेत श्री. कवठेकरांनी उभे केले आहे. वडिलांच्या मृत्यूनंतर सर्व कुटुंबाची जबाबदारी नुकत्याच इंटर सायन्स झालेल्या बापूंवर, वडील मुलगा म्हणून, पडली. ती त्यांनी कर्तव्यबुद्धीने व वडिलांचे मरणसमयीचे शब्द सतत स्मरून यथाशक्ती उत्तम रीतीने पार पाडली. दुसऱ्या महायुद्धाने, दुसऱ्या कशाचा नसला तरी नोकऱ्यांचा सुकाळ करून दिला. या परिस्थितीने बापूंना चांगलाच हात दिला. पैशाची ददात राहिली नाही. जात्याच उदार व प्रेमळ बापूंनी त्यांचा हिशेबही कधी ठेवला नाही. महायुद्धाबरोबरच या महालक्ष्मीनेही घरातून काढता पाय घेतला व बापूंचे नष्टचर्य सुरू झाले. भय्या व अप्पा या दोन लहान भावांनी निराळी बिऱ्हाडे थाटली. आई व मावशीचा सांभाळ मात्र बापूंनाच करावा लागला. आणि लहान बहीण ताईच्या लग्नाची जबाबदारीही एकट्या बापूंचीच ठरली. डोईजड कर्ज काढून व न झेपणारा हुंडा देऊन बापूंनी ताईला उजवली. पण सासरी न नांदता ती परत आली. पाठोपाठ जावईही आले. हुंड्यातील द्यायची राहिलेली रक्कम वसूल होईपर्यंत बापूंकडेच त्यांनी तळ ठोकला. कर्जापायी बेजार झालेल्या बापूंना स्वतःकडे, पत्नीकडे व लहानग्या राजनकडेही लक्ष न देता 'मान न मान, मैं तेरा मेहमान' या कोटीतील पाहुण्यांचा संसार चालवणे भाग पडले. तशात एक पत्नी सोडली तर आईसकट सर्वांचा एक गट व तो बापूंच्या विरुद्ध. याने बापू खंगले, वैतागले, आजारी झाले. या आजारात त्यांच्या उपयोगी पडले कोण? रक्ताच्या नात्याने संबद्ध असलेली माणसे नव्हे तर

बापूंनी सहजधर्म म्हणून केलेल्या उपकाराची जाणीव ठेवणारी त्रिननात्याची माणसे — डॉ. प्रभाकर, त्यांची पत्नी शुभा व बापूंच्या एका लेखक मित्राची मुलगी मीना. आहे की नाही गमतीचा विरोध ! हा जितका कलापूर्ण तितकाच विदारकही नाही का ?

बापूंचे हे ‘ नष्टचर्य ’, एका ज्योतिषाने सांगितल्याप्रमाणे —, संपले व शेवटी सर्व आनंदीआनंद झाला. एखाद्या सुखान्त नाटकाप्रमाणेच काहीसा हा शेवट वाटतो — ‘ भरतवाक्य ’ म्हणायला झाडून सर्व पात्रे गोळा व्हावीत तशीच येथेही गोळा झाली आहेत. ग्रहदशेच्या फेऱ्यात सापडलेल्या माणसावर काही काळ दुःखांचा व आपत्तींचा वर्षाव व्हावा व तो फेरा संपताच सर्व काही सुरळीत व्हावे तसेच काहीसे साधे, सरळ, बाळबोध स्वरूप या कथेला प्राप्त झाले आहे.

आरंभापासून मी ‘ कथा ’ हा शब्द आतापर्यंत वापरला तो हेतुतःच वापरला. ‘ आपुलकीची झळ ’ ही एक दीर्घ-प्रदीर्घ कथाच आहे. कादंबरीचा आकार लहान झालेल्या या काळात व पृष्ठसंख्येवरच कथा व कादंबरीतील भेद ओळखणाऱ्या बहुसंख्य वाचकांना ही कादंबरी वाटली तरी ती तशी नाही. कथेची वाढ एकेरी असते, तिची गती जलद असते व तिच्यातील जीवनदर्शन, कादंबरीच्या तुलनेत, खोली व विस्तार या दोन्ही बाबतींत मर्यादित असते. या दृष्टीने ‘ आपुलकीची झळ’ ही एक दीर्घकथाच ठरते.

या कथेचे स्वरूप माझ्या मते सामाजिक नाही. बापूंच्या वाटयाला आलेली परिस्थिती अपवादात्मक नसून प्रातिनिधिक आहे असे श्री. कवठेकरांना सुचवायचे असावे असे पान १२३ वरील माईंचे उद्गार वाचून वाटते. त्यात एका मर्यादेपर्यंत सत्यही आहे. तरीपण मी या कथेला सामाजिक म्हणत नाही. याला कारण तिच्यात कोणतीही सामाजिक समस्या, प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने, मांडलेली नाही, कथानकाला सामाजिक पार्श्वभूमी लाभलेली नाही आणि कथावाचनाचा परिणामही सामाजिक स्वरूपाचा होत नाही. ती एक कौटुंबिक कथा आहे; सोज्वळ आणि मनाला चटका लावणारी कथा आहे.

कथेतील विविध प्रसंगांचे घावते चित्रण मोठे आकर्षक झालेले आहे. मोजक्या, वेचक शब्दांनी व सुटसुटीत, ठसठशीत आणि वैशिष्टयपूर्ण संवादांनी एखादा प्रसंग व त्यातील व्यक्ती वाचकांच्या डोळयांसमोर उभ्या करण्याचे श्री. कवठेकरांचे कौशल्य लक्षणीय व प्रशंसनीय आहे. श्री. कवठेकरांची भाषा व भाषाशैली वैशिष्टयपूर्ण आहे. हे वैशिष्टय त्यांनी फडके-खांडेकर युगात जसे जोपासले तसेच ते आजच्या ‘ तिरकस ’ काळातही रक्षिले. या त्यांच्या शैलीकडे अभ्यासकांचे लक्ष जायला पाहिजे एवढेच येथे सुचवून ठेवतो.

यातील पात्रांचे वर्गीकरण सुष्ट व दुष्ट असे काहीसे स्थूल झालेले आहे. ही स्थूलता विविध पात्रांच्या मनोविश्लेषणाकडे लेखकाने फारसे लक्ष दिले नसल्यामुळे आली आहे असे मला वाटते. याचा एक परिणाम असा झाला आहे की, काही पात्रांचे वर्तन अनाकलनीय वाटण्यासारखे झाले आहे. विशेषतः ताई व रामराव या पात्रांचे. याच संदर्भात मावशीच्या वर्तनाचा उलगडा तिच्या एका पत्रद्वारे झालेला लक्षात घेतला तर ताई व रामराव किंवा काही प्रमाणात बापूंच्या आई — जानकीबाई — यांचे वर्तन अनाकलनीय असे मी कोणत्या अर्थाने म्हणतो ते स्पष्ट व्हावे. हे असे होण्याला कारण माझ्या मते या कृतीचे स्वरूप कादंबरीचे नसून कथेचे आहे हेच होय. मी या कृतीला दीर्घकथा का म्हणतो याचे हे आणखी एक कारण.

गुण-दोषविवेचनापेक्षा स्वरूपविवेचन व विश्लेषण हाच माझा या ‘ परीक्षणात’ हेतू आहे. तो या स्थळमर्यादेत कसा व कितपत साध्य झाला ते वाचकांनी ‘ आपुलकीची झळ ’ वाचून ठरवावे. तेवढी वाचनीयता व तेवढे महत्त्व या कथेला निश्चितच आहे.

## ललाट

समीक्षक
**श्री. मा. कुलकर्णी**

लेखक : वि. शं. पारगावकर
प्रकाशक : इनामदार बंधू प्रकाशन, पुणे २.
पृ. १३३, मूल्य ३ रु.

'ललाट' ही एका मुग्ध, सोशिक परंतु दुर्दैवी अशा स्त्रीची कथा आहे. नानी हे तिचे नाव. नानीच्या दुर्दैवाची ही कथा आहे असे म्हटले तरी चालेल. नानीचे बालपण सुखात गेले. वयाच्या १२-१३ व्या वर्षी तिचे लग्न झाले. पुढची २५-३० वर्षे किंबहुना सारे आयुष्य दारिद्र्य व आजार सहन करण्यातच गेले. पोटच्या अनेक मुलांचे मृत्यूही नानीला पाहावे लागले. मोठा मुलगा राम व धाकटा शान्तू हेच काय ते जिवंत राहिले. परंतु त्यांच्यापासूनही सुख मिळण्याऐवजी वेगवेगळ्या प्रकारचे दुःखच नानीच्या वाट्याला आले.

'परमेश्वर आणि दैव या दोन्ही डोळ्यांना न दिसणाऱ्या भावनाच नानीच्या जीवनात प्रमुख होत्या......नाना प्रकारच्या दुःखांनी तिचे मन होरपळून निघत होते. तरी पण ती कधी स्वतःवर चिडत नव्हती, चडफडत नव्हती किंवा जगालाही दोषी ठरविण्याचा प्रयत्न करीत नव्हती......सुख हवे असेल तर या जन्मात दुःखच सोसले पाहिजे, पुण्य जोडले पाहिजे म्हणजे पुढच्या जन्मात सुख मिळते अशी तिची श्रद्धा होती. परंतु इतके करूनही तिला दुःखाचा त्रास होत नव्हता असे नाही. माणूस म्हणून ती जगत होती, शिवाय अवतीभोवतीच्या माणसांत जगत होती.' लेखकानेच केलेल्या या भाष्यात कादंबरीचे सारसर्वस्व येऊन गेले आहे.

या लहानशा कादंबरीत महत्त्व आहे ते नानीला, तिच्या सुखदुःखांना व तिच्या दैवाला. तिच्या अरुंद जीवनमार्गावर तिला सोबत करणाऱ्या अनेक कुटुंबीय व्यक्ती या कथेत येतात. परंतु त्या सर्वांना या कथेत गौण स्थान आहे, नानीच्या आयुष्यात सुखदुःखे निर्माण करण्याला निमित्त असणे एवढेच त्यांचे कार्य. आणि खुद्द नानीचे आयुष्यही दैवाच्या हातांतील कळसुत्री बाहुलीप्रमाणे वाचकांच्या मनावर एकच एक ठसा उमटतो तो नानीच्या दैवाधीनतेचा, असहायतेचा, प्रवाह-पतितत्वाचा. या दृष्टीने या कथेचे साम्य लघुकथेशी विशेष आहे. विस्ताराच्या दृष्टीनेही ती लघूच आहे.

या लहानशा कादंबरीत निवेदनशैली, संवादरचना, प्रसंगचित्रण, मनोविश्लेषण इ. कादंबरीच्या घटकांच्या बाबतीत लेखकाचे गुण चांगले प्रकट झाले आहेत. लेखकाच्या कल्पकतेचा प्रत्ययही यात येतो. या सर्व गुणांची जोपासना व वाढ केल्यास व झाल्यास त्याच्या हातून भरीव, भरदार व भरघोस अशी कलापूर्ण कादंबरी खचित निर्माण होईल अशी आशा व अपेक्षा वाटते.

ही कथा वाचून सुचलेला एक विचार येथे नमूद करून हा अभिप्राय-लेख संपवितो. दैववाद हा सुधारकांनी बुरसटलेला ठरविला. आज अनेक कथा व कादंबऱ्यांतून आधुनिक व कलात्मक रूप घेऊन तो पुन्हा अवतरलेला दिसतो. हे दैवाच्या बलवत्तरपणाचे प्रमाण की आजच्या परिस्थितीच्या भीषणतेतून निर्माण झालेल्या वैफल्याचा व अगतिकतेचा परिणाम ?



# परिसरांत

समीक्षक
दि. के. बेडेकर

लेखक : डॉ. रा. प्र. पारनेरकर
प्रकाशक : वि. रा. पारनेरकर
१७५ टिळकपथ, इंदूर.
पृष्ठे : १६४; मूल्य ३ रु.

श्री. पारनेरकरमहाराज ह्या इंदूरस्थ विद्वान सत्पुरुषाचा प्रस्तुत ग्रंथ चार प्रकरणांत विभागलेला आहे. 'नास्तिकते'ची मीमांसा पहिल्या प्रकरणात आहे. माणसाने 'प्रभुत्व' मिळविण्याची आशा सोडणे व अगतिक होणे यालाच 'नास्तिकता' असे त्यांनी म्हटले आहे. दुसऱ्या प्रकरणात 'शिक्षण' ह्या विषयाची फार सुबोध व व्यापक चर्चा आहे. शालेय शिक्षण देणाऱ्या शिक्षणसंस्थांव्यतिरिक्त शिक्षणसंस्था समाजात असतात व त्यांच्या द्वारेही व्यक्तीच्या मनाला आकार देण्याचे कार्य अपेक्षित असते. अशा संस्थांच्या कार्याची लेखकांनी केलेली मीमांसा उपयुक्त आणि स्पष्ट अशी झाली आहे. ललितवाङ्मय ही एक अशी शिक्षणसंस्था आहे असे म्हणून ते सांगतात, "साहित्य हा जीवनाचा आदर्श नाही तर ते जीवनाचे एक पूरक अंग आहे. आदर्श साहित्यही जीवनाचा आदर्श असू शकत नाही.......अर्थात येथे मला साहित्य कसे असावे हे सांगावयाचे नसून साहित्याच्या निशेत माणसाने राहू नये असे सूचित करावयाचे आहे; कारण साहित्यनिर्मितीचे तंत्र व जीवन जगण्याचे तंत्रही अगदी भिन्न भिन्न अशी आहेत." साहित्य, वृत्तपत्रे, सिनेमा इत्यादि गोष्टी जीवन जगण्याची जी प्रत्यक्ष क्रिया व किमया आहे त्याहून वेगळया आहेत व केवळ पूरक आहेत ही गोष्ट सांगून पुढे, तिसऱ्या प्रकरणात, माणसाचा 'स्वभाव' कसा घडविला जातो याची चर्चा लेखकांनी केली आहे. हे प्रकरण सुबोध, प्रवाही व मर्मग्राही विवेचनाच्या दृष्टीने फार उत्कृष्ट उतरले आहे. शेवटच्या चौथ्या प्रकरणाचा विषय 'आस्तिकता' आहे. यात 'ईश्वर' कल्पनेचा उगम मानवी बुद्धीत कसा झाला असावा याविषयी एक अभिसिद्धान्त (हायपॉथेसिस्) लेखकांनी मांडला आहे. पात्रतम असा प्रयत्नशील मनुष्य आपल्या सामर्थ्याबाहेरच्या अशा संकटातून जेव्हा पार पडतो तेव्हा त्याची प्रांजल भावना अशी होते की, मी स्वसामर्थ्याने वाचलो नाही. येथेच ईश्वर-कल्पनेचा उदय होतो. आद्यकालीन मानवाच्या मनात ईश्वरश्रद्धेचा हा अंकुर फुटला व शतकानुशतके तो आस्तिकतेच्या रूपाने नांदत आहे. 'नास्तिकता' ही दुबळया मानवाची वैफल्याची व अगतिकतेची भावना तर आस्तिकता ही समर्थ मानवाची प्रांजल कृतज्ञतेची भावना, असा लेखकांचा निष्कर्ष स्थूलमानाने मानता येईल. 'पूर्णवाद' या संज्ञेने ओळखता येईल अशी एक व्यापक तात्त्विक भूमिका लेखकांची आहे व तिची मांडणी 'तोंडओळख' या ग्रंथात श्री. ल. का. देशपांडे यांनी करून दिली आहे. त्या पूर्णवादाचे ओझरते दर्शन वरील आस्तिकतेच्या मीमांसेत मिळते.

ह्या ग्रंथातील सर्वच प्रतिपादन अनुभवांशी साक्षात संबंध व संदर्भ ठेवून केलेले, वाचकाला हितगुज सांगण्यासारखे परंतु गंभीर संस्कार करणारे झाले आहे. 'अध्यात्म' म्हणजे साधारण माणसाच्या आवाक्याबाहेरचे खडतर व फक्त मुमुक्षूंना आवडणारे असते, पण या ग्रंथातील अध्यात्म जीवनाचा अर्थ सांगणारे साधारण माणसाला आकर्षित करील असे आहे; आप्ताच्या प्रेमळ उपदेशासारखे शीतल आहे.

या ग्रंथांत 'ख' हे अक्षर 'क्' व 'ह' याचे एक नवे जोडाक्षर बनवून वापरलेले आहे. लेखकांनी लिपीसुधारणेच्या बाबतीत लक्ष घालून ह्या अक्षराची योजना अमलात आणली आहे, यावरून सामान्य व्यवहारातील गोष्टीत सुधारणा करीतच माणसांला पूर्णत्वाकडे जाता येईल या त्यांच्या 'आस्तिकते'च्या भावनेचा प्रत्यय येतो.

# नवे अलंकार

समीक्षक
**मो. रा. वाळंबे**

लेखक — रा. अ. काळेले,
मनोहर ग्रंथमाला प्रकाशन,
१६०९, सदाशिव पेठ, पुणे २.
पृ. १२७ : मूल्य ३ रु.

इंदूरचे कवी श्री. रा. अ. काळेले यांनी ११ वर्षांपूर्वी लिहिलेल्या 'नवे अलंकार' या पुस्तकाची ही वाढविलेली दुसरी आवृत्ती होय. पुस्तकाला दिलेले 'नवे अलंकार' हे नाव थोडे फसवे आहे. आजपर्यंत संस्कृतातून मराठीत आलेल्या व वेळोवेळी चर्चिल्या जाणाऱ्या अलंकारांपेक्षा वेगळे काही अलंकार लेखकाने आधुनिक वाङ्मयातून शोधून मांडले असावेत या अपेक्षेनेच वाचक या पुस्तकाकडे वळतो. या पुस्तकातील प्रारंभीच्या ⅓ भागात अलंकाराची तात्त्विक चर्चा, व अलंकार-शास्त्राचा ऐतिहासिक आढावा घेतला आहे. हा आढावा अलंकारशास्त्राचा इतिहास व त्याचे कार्य समजावून घेण्याच्या दृष्टीने चांगला आहे. त्यानंतरच्या ⅓ भागात पन्नास एक जुन्या अलंकारांची येथे सांगोपांग चर्चा केली आहे. हा भाग पहिल्या आवृत्तीत नव्हता हे या पुस्तकाच्या नावाच्या दृष्टीने योग्यच होते. सर्वांना परिचित अशा जुन्या अलंकारांची चर्चा न करता नव्याने वाङ्मयात येणाऱ्या अलंकारांचीच विशेष चर्चा या पुस्तकात करणे अधिक योग्य झाले असते. 'नवे अलंकार' या नात्याने २३ अलंकार लेखकाने चर्चिले आहेत. संस्कृतातील अलंकाराची कल्पना व इंग्रजीतील अलंकाराची कल्पना हीच मुळात भिन्न आहे. साम्य-विरोधा-बरोबरच साहचर्य, रचना, अप्रत्यक्षविधान, नाद यांवरील रचनाप्रकाराला इंग्रजीत अलंकारत्व प्राप्त झाले आहे. त्यांची अलंकाराची व्याख्याच मुळी 'A deviation from the plain and ordinary mode of speaking for the sake of greater effect' अशी आहे. ही इंग्रजीतील पद्धत मराठीत ओढूनताणून आणण्याचा लेखकाने येथे प्रयत्न केला आहे. श्री. काळेले यांनी नवे अलंकार म्हणून जी नावे सुचविली आहेत त्यांतील काही विवाद्य ठरतील. अनुनाद (Onomatopoeia), आवर्तन (Repetition) अशी काही नावे योग्य वाटतात; पण उपदेशापदेश, एकोन, कविकथा, प्रमाद-स्वीकार वगैरे ठिकाणी फारच ओढाताण झाली आहे. पुनरुक्ती हा शब्द Repetition या अर्थी ठीक आहे पण येथे तो द्विरुक्ति (Tautology) या अर्थी वापरला आहे. प्रत्ययान्तर हे Transferred Epithet ला दिलेले नाव तितकेसे समर्पक नाही. 'संक्रान्त विशेषण' अधिक योग्य ठरेल. Allusion हा दृष्टान्ताचाच प्रकार होय. विपर्यय व संयोग हे इंग्रजीतील Pun (श्लेष) व Play upon words (कोटी) यांचे पर्याय आहेत. Synecdoche ला अंशभक्ती म्हणण्यापेक्षा अवयवलक्षणा म्हणणे युक्त. अनुलेखन हा Transcription या अर्थी मराठीत वापरतात. लेखकाने नवे अलंकार म्हणून जे शब्द सुचविले आहेत त्यांना भाषेत या पूर्वीच विशिष्ट अर्थ प्राप्त झाला असेल तर असे शब्द टाळणेच अधिक युक्त ठरले असते. जुन्या अलंकारांची चर्चा करताना लेखकाने 'तोचतोपणा' टाळून आधुनिक कवितेतील दिलेली उदाहरणे स्वागतार्ह वाटतात. पण काही ठिकाणी स्व-रचित कवितेची उदाहरणे देण्यासाठीच काही अलंकारांची योजना तर केली नाही ना असा दाट संशय येतो. अलंकार-शास्त्रातील 'नव्या अभिव्यक्तीची प्रवृत्ती' म्हणून हा प्रयत्न ठीक असला तरी शास्त्रीय दृष्टीने तो अधिक काटेकोर व्हावयास हवा होता.



# मराठी ग्रंथसूची (१९६२)

म. श्री. दीक्षित

## कथा

१. आठवले भा. र.—वेचलेले क्षण, मनोहर ग्रंथमाला, पुणे २; ४=००
२. कऱ्हाडे सदा—विमल घारपुरे, भगवानदास हिरजी, मुंबई; ३=५०
३. काणेकर अनंत—उजेडाची झाडे, देशमुख आणि कं. पुणे २; ४=००
४. काणेकर अनंत—सोनपिसे, देशमुख आणि कंपनी, पुणे २; ३=५०
५. काळे इंदिरा—मालविका, इनामदार बंधु, पुणे २; २=५०
६. काळे व. पु.—पण माझ्या इलांनी!, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २; ३=००
७. कुलकर्णी पं. अ.—लाडक्या लेकी, (संपादन) कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ५=००
८. कुलकर्णी जी. ए.—हिरवे रावे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; ६=००
९. कुलकर्णी पंडित अनंत—लाडक्या लेकी (भाग २ व ३), कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ५ रु. प्रत्येकी
१०. कुंभोजकर वसंत—रसिला, महाराष्ट्र प्रकाशन गृह, कोल्हापूर; ३=००
११. खरात शंकरराव—सांगावा, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ४=००
१२. खांडेकर वि. स.—पाषाणपूजा, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५ रु.
१३. खांबेटे द. पां.—येडचाप, भगवानदास हिरजी, मुंबई; ३=५०
१४. खेर भा. द.—युद्धछायेतील गोष्टी, मांगल्य प्रकाशन, पुणे २; १=५०
१५. गाडगीळ वा. दा.—मुलींच्या लग्नाच्या चटकदार कथा, वा. दा. गाडगीळ, निजामाबाद (आंध्र); ३ रु.
१६. गोखले अरविंद—मराठी कथा १९६१, कॉंटिनेंटल प्रकाशन पुणे २; ३=५०
१७. गोखले अरविंद—मराठी कथा १९६२, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३=५०
१८. गोखले अरविंद—मंजुळा, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; ६ रु.
१९. गोखले अरविंद—व्रती, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे; २ रु.
२०. गोखले अरविंद—विघ्नहर्ती, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर – पुणे; ५=००
२१. चिकटे सुशीला—प्रमोदिनी, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ३=००
२२. जोशी य. गो.—चंद्रप्रकाशाचे दूध, यशवंत प्रकाशन, पुणे २; ५ रु.
२३. जोशी वि. वि.—कशासाठी पोटासाठी? प्रभा प्रकाशन, नागपूर; १=५०
२४. जोशी वि. वि.—शिकारकथा, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई; ३=५०
२५. जोशी श्री. ज.—अंगण, भगवानदास हिरजी, मुंबई; ३=५०
२६. जोशी श्री. ज.—कोंबडी, मेनका प्रकाशन, पुणे २; ४=५०
२७. जोशी श्री. ज.—मामाचा वाडा, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; ४=५०
२८. जोशी श्रीपाद—अनंता कायरे केलंस हे?—व्हीनस प्रकाशन, पुणे २; ३=५०
२९. जोशी स. कृ.—कथाकुंभ, लाखाणी बुकडेपो, मुंबई; ३=००
३०. डावरे पद्माकर—हुकुमें हुकूम, जे. विनायक प्रकाशन, मुंबई; ३=००
३१. ढोमरे उमाकांत—चकवा, श्रीराम प्रकाशन, मुंबई २; ३=००









३२. तामणे प्रभाकर — सांगू नको साजणी, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २; ३=५०
३३. दसनूरकर स्नेहलता — असा आहे संसार, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; ३=००
३४. दळवी जयवंत — फजीतवाडा, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ४=००
३५. देवकुळे ज. ग. — आशा परत येते आणि इतर कथा, मकरंद साहित्य, मुंबई १; ३=००
३६. देसाई कमल — रंग, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३=००
३७. देसाई कृ. रा. — वेगळ्या शिकारकथा, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ३=००
३८. देसाई रणजित — जाण, देशमुख आणि कंपनी, पुणे २; १०=००
३९. दोडके गो. रा. — पूर्वस्मृति, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर—पुणे; ४=००
४०. नवरे शं. ना. — बेला, मेनका प्रकाशन, पुणे २; ४=५०
४१. नवरे शं. ना. — सखी, भगवानदास हिरजी, मुंबई; ३=५०
४२. नांगरे बलराम — अंतर, गं. रा. पाठक, ३ जुना सदाशिव, पुणे २; ३=००
४३. पटवर्धन वसुंधरा — अंतरपाट, श्रीरामप्रकाशन, मुंबई; ३=००
४४. पटवर्धन वसुंधरा — भाग्य, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ४=००
४५. पाटील अनंतराव — पहाट स्वप्न, नागपूर प्रकाशन, नागपूर; ३=००
४६. पाटील बाबा — एकूर, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; ३=००
४७. पाटील शंकर — आभाळ, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २; ४=००
४८. पाटील शंकर — धिंड, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ४=००
४९. पारगावकर वि. शं. — मरवा, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; ३=५०
५०. पुंडलिक विद्याधर — पोपटी चौकट, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५=५०
५१. फडके कमला — दरवळ, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ३=५०
५२. फडके ना. सी. — प्रेम पहावं करून, चंद्रकिरण प्रकाशन, पुणे २; ४=००
५३. फडके ना. सी. — बावनकशी, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५=००
५४. फडके ना. सी — बोगन वेलीचीं फुलं, मनोरंजन प्रकाशन, मुंबई; ३=५०
५५. फडके ना. सी. — लव्हेंडर, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ४=००
५६. बावर सरोजिनी — माहेरचा चंद्र, समाज शिक्षण प्रकाशन, सदाशिव, पुणे २; २=५०
५७. बावर सरोजिनी — राही रुक्मिणी, १४८६ सदाशिव, पुणें २; ६=००
५८. बेहेरे ग. वा — रंगढंग, अस्मिता प्रकाशन, पुणे २; ३=००
५९. बोराडे रा. रं. — पेरणी, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३=५०
६१. भट गो. के — पानझड, महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर; ३=००
६१. भावे पु. भा. — निवडक कथा, बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई; ६=००
६२. भावे पु. भा. -- वैरी, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे २; ४=००
६३. मंगळवेढेकर राजा — तऱ्हा, सह्याद्रि प्रकाशन, पुणे २; ३=२५.
६४. माडगूळकर ग. दि. — कृष्णाची करंगळी, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ४=००
६५. माडगूळकर ग दि. — काव्यकथा, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २, ३=००
६६. माडगूळकर ग. दि. -- मंतरलेले दिवस, साधना प्रकाशन, पुणे २; ३=५०
६७. माडगूळकर व्यंकटेश — वाघाच्या मागावर, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २: ३=००

६८. माडगूळकर व्यंकटेश — वारी, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३=५०
६९. मिरासदार द. मा. — विरंगुळा, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४=००
७०. मिरासदार द. मा. — स्पर्श, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर–पुणे; ५=००
७१. मोकाशी दि. वा. — असा असावा नवरा, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ४=००
७२. रायरीकर ह. मा. — अजागळाचे उपद्व्याप, इनामदारबंधु प्रकाशन, पुणे २; ३=००
७३. लिमये सुभद्राबाई — ढासळलेले मनोरे व इतर कथा, सौ. लक्ष्मीबाई लेले व सौ. कमलाबाई टिळक, बडोदे; २=००
७४. वडेर प्रल्हाद — चढण, साधना प्रकाशन, पुणे २; ३=५०
७५. वकील व्यंकटेश — विदर्भाच्या लोककथा, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई; १=५०
७६. वाटवे के. ना. — संस्कृत कविकथा, केदार प्रकाशन, पुणे २; २=००
७७. वैद्य वसंत शा. — अकल्पिता, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; २=५०
७८. वैद्य शं. वि. — आला क्षण गेला क्षण, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ४=००
७९. शान्ताराम — धर्म, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ३=००
८०. शांताराम — लाटा, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे २; ४=००
८१. शेलार बजरंग — काशी, चंद्रकांत शेट्ये प्रका. मंदिर, कोल्हापूर; २=००
८२. शेळके उद्धव — वानगी, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ६=००
८३. शेळके शांता — कावेरी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ४=००
८४. साठे अण्णाभाऊ — फरारी, चंद्रकांत शेट्ये प्रका.मंदिर, कोल्हापूर; ३=५०
८५. साठे अण्णाभाऊ — भानामती, चंद्रकांत शेट्ये प्रका.मंदिर, कोल्हापूर; ३=५०
८६ सावकार इंद्रायणी — आमूर पिका, मनोहर ग्रंथमाला, पुणे २; ४=००
८७. हिंगणे रामचंद्र — न उलगडलेले कोडे, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; २=००
८८. क्षीरसागर श्री. के — संतुपार्वती, दि. ग जोशी, मुंबई ७; ४=५०
८९. क्षेत्रमाडे सुमति — सुगंध, महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर; ३=००

## कादंबरी

१. अग्निहोत्री अं. शं. — उंबराचं फूल, श्रीराम प्रकाशन, मुंबई; ३=५०
२. उजळंबकर कृ. मु. — गाठ हिमालयाशी आहे, विदर्भ मराठवाडा बुककंपनी, पुणे; ६=००
३ कवठेकर द. र. — आपुलकीचा झळ, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ६=००
४. कर्णिक मधु मंगेश — देवकी, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; ४=००
५. कर्वे गजानन — संजीवनी, ह. वि. मोटे, ३ वेस्ट व्ह्यू, मुंबई १४; ३=००
६. काकोडकर चंद्रकांत — अनील, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई; ३=००
७. काकोडकर चंद्रकांत — अनुराग, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई; ५=००
८. काकोडकर चंद्रकांत — अभया, महाराष्ट्र, ग्रंथभांडार, मुंबई ४; ६=००
९. काकोडकर चंद्रकांत — जीवननृत्य, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई; ३=००
१०. काकोडकर चंद्रकांत — नवा करार, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई; ३=००
११. काकोडकर चंद्रकांत — पिसाट वारा, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई; ३=००
१२. काकोडकर चंद्रकांत — संशय, सिद्धार्थ साहित्य, मुंबई ४; ३=००

१३. काकोडकर चंद्रकांत — साक्षात्कार (तीन लघु कादंबऱ्या), सिद्धार्थ साहित्य, मुंबई ४; ३=००
१४. कानिटकर माधव — अनुरागाची वेल, मेनका प्रकाशन, पुणे २; ५=५०
१५. कानिटकर माधव — अवेळ, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ३=००
१६. कानिटकर माधव — किनारा, सह्याद्रि प्रकाशन, पुणे २; २=५०
१७. कानिटकर माधव — झुलता पूल, मनोरंजन प्रकाशन, मुंबई; ३=००
१८. कानिटकर माधव — झोका, मेनका प्रकाशन, पुणे २; ३=००
१९. कानिटकर माधव — ब्रह्मपुत्रा, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २; ५=००
२०. कानिटकर माधव — रत्नावलि, मेनका प्रकाशन, पुणे २; ३=००
२१. काळे श्रीपाद — एक डोळा बोलतो आहे, मेजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; ५=००
२२. काळे श्रीपाद — एक धागा सुखाचा, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ५=००
२३. काळे श्रीपाद — उघडे सत्य, पॅरमाऊंट प्रकाशन, पुणे २; ४=००
२४. काळे श्रीपाद — रानपाणी, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; ४=००
२५. खेर भा. द. — नंदादीप, लोकमान्य प्रकाशन, पुणे २; ३=००
२६. चोरघडे वा. कृ. — मातीचा माणूस (कालिंदीचरण पाणिग्राही यांच्या कादंबरीचा अनुवाद), डायमंड बुकस्टॉल, सांगली; २=५०
२७. जोशी चिं. वि. — बायकोचा मुलगा, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १=५०
२८. जोशी रा. कृ. — ऋणानुबंध, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ४–५०
२९. ढवळे सरोजिनी — चंदनमहाल, महाराष्ट्र प्रकाशनगृह, कोल्हापूर; ३=००
३०. दांडेकर गो. नी. — आनंदवन-भुवन, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ६=००
३१. दांडेकर गो. नी. — उडोनि हंस चालला, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ३=००
३२. दांडेकर गो. नी — श्रीकर्णायन, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ५=००
३३. दिवेकर कृ. ज. — पुनर्जन्म, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ५=००
३४. देशपांडे रंगनाथ — आग्या मोहोळ, श्रीलेखनवाचन भांडार, पुणे २; १०=००
३५. देसाई रणजित — स्वामी, देशमुख आणि कंपनी, पुणे २; १२=००
३६. पारगावकर वि. शं. — निगुडा, शुभदा प्रकाशन, पुणे ४; २=५०
३७. पारगावकर वि. शं. — ललाट, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; ३=००
३८. पेंडसे श्री. ना. — रथचक्र, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ६=००
३९. फडके कमला — धुक्यांत हरवलेली वाट, मेनका प्रकाशन, पुणे २; ५=००
४०. फडके ना. सी. — त्रिवेणी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ६=००
४१. बर्वे अच्युत — मातीचा वास, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५=०
४२. बोकील वि. वि. — आधी होता कारकून, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ३=५०
४३. भावे पु. भा. — आग, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर ५=००
४४. भावे पु. भा. — रोहिणी कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २; ५=००
४५. मर्ढेकर बा. सी. — मर्ढेकरांच्या कादंबऱ्या, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ६=००
४६. माडखोलकर चंद्रशेखर — शुभदान, देशमुख आणि कंपनी, पुणे २; ४=००
४७. मांडवकर भाऊ — वंचना, सेवा प्रकाशन, अमरावती; ३=५०
४८. रेगे पु. शि. — सावित्री, देशमुख आणि कंपनी, पुणे २; ४=००
४९. लोहोकरे पां. गो. — बाप्पा, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई; ४=००
५०. शिरूरकर विभावरी — शबरी, देशमुख आणि कंपनी, पुणे २; ६=००

५१. साठे अण्णाभाऊ — अलगूज, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; ४=००
५२. साठे अण्णाभाऊ — चंदन, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; ३=५०
५३. साठे अण्णाभाऊ — रानगंगा, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई; २=५०
५४. सातोस्कर बा. द. — जाई, सागर साहित्य प्रकाशन, मुंबई; ४=००
५५. सावकार इंद्रायणी — अय्या हो, जे. विनायक प्रकाशन, मुंबई; ३=००

## काव्य

१. आपटीकर म. स. — धूमकेतु, सौ. कमलिनी आपटीकर, सातारा; २=००
२. इर्लेकर सुहासिनी — तृप्ति, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; २=००
३. कशाळकर द. ल. — भावकलश, सौ. कशाळकर आर्थर रोड प्रिझन, मुंबई ११; १=७५
४. काटकर मा. गो. — मधुधारा, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; २=५०
५. कान्त — वेलांटी, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४=५०
६. कुलकर्णी वि. म. व गो. म. — झपूर्झा (संपादन), विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे २; ६=००
७. कुसुमाग्रज — स्वगत, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ००=५०
८. गोडवोले के. वि. — आर्या रामायण, (बालकांड), के. वि. गोडबोले, पुणे ४; १०=००
९. गोळे पद्मा — स्वप्नजा, मौज प्रकाशन, मुंबई ४; ४=००
१०. जोशी गोविंद — गंधरात्र, म. अ. कुलकर्णी, जुनी सांगली; ३=५०
११. जोशी य. गो. — सुबोध ज्ञानेश्वरी भाग १ व २ (अध्याय १ ते १२) प्रसाद प्रकाशन, पुणे २; ५=०० (प्रत्येकी)
१२. टेकाडे आनंदराव — आनंद गीत भाग ४, विदर्भ साहित्य संघ, नागपूर; ८=००
१३. देशपांडे निर्मला — गंधखुळी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २=५०
१४. देशपांडे वा. ना. — पिकासोचे कबूतर, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ३=००
१५. पदकी सरिता — चैत्रपुष्प, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; २=००
१६. पंडित भ. श्री. — श्रीकबीर वचनावली, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर ७=००
१७. प्रफुलदत्त — कैरविणी, अभिनव प्रकाशन, मुंबई १२; ३=००
१८. पाटणकर वा. वा. — मराठी शायरी, वा. वा. पाटणकर, यवतमाळ; २=००
१९. पाठक गं. रा. — शक्तिकेतु, गं. रा. पाठक, ३ सदाशिव, पुणे २; १=५०
२०. पाडगावकर मंगेश — उत्सव, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ४=००
२१. प्रियोळकर अ. का — कविवर्य मोरोपंतांचे समग्र ग्रंथ ११ स्फुट काव्ये, (भाग २ रा) मराठी संशोधन मंडळ, मुंबई १४, ५=००
२२. बापट वसंत — अकरावी दिशा, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ४=००
२३. बापट — पाडगावकर — करंदीकर — काव्यदर्शन, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; २=००
२४. बावर सरोजिनी — लोकसंगीत, प्रसिद्धि विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई.
२५. भांबुरकर श्री. गो. — बुद्ध गीतांजली, दीपगृह प्रकाशन, जेलरोड, नागपूर १; १=००

२६. **माडगूळकर ग. दि. — चैत्रबन**, देशमुख आणि कंपनी, पुणे २; १२=००
२७. **यशवंत — कमंडलु**, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३=५०
२८. **रवींद्र गौरव ( निवडक कविता )** — व्हीनस बुकस्टॉल, पुणे २; ३=००
२९. **चंद्र लपे पापणीत — ( प्रातिनिधिक कविता )**, प्रमोद प्रकाशन, नांदेड; १=५०
३०. **साधना ( प्रातिनिधिक कविता )** — साहित्य साधना मंडळ, भुसावळ; १=००

## नाटक – एकांकिका

१. **अणसूरकर ना. र. — लाखाचे बारा हजार**, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई; २=००
२. **अत्रे प्र. के. — तो मी नव्हेच**, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २=५०
३. **कवीश्वर दत्ता — आणि असंहि घडतं**, सुनाद प्रकाशन, मुंबई; १=५०
४. **कानेटकर वसंत — रायगडाला जेव्हा जाग येते**, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई; ४=००
५. **काळे व. पु. — रात्र नको चांदणी**, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; २=००
६. **केळुसकर दत्तात्रय — चित्त शुद्ध तरी अर्थात संत तुकाराम**, साहित्य सहकार संघ लि. मुंबई; २=००
७. **गाडगीळ गंगाधर — बंडू, नानू आणि गुलाबी हत्ती**, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; २=००
८. **गुप्ते चारुशीला — सुंठीवाचून खोकला गेला**, जयहिंद प्रकाशन, मुंबई; २=००
९. **गोखले विद्याधर — जावयाचे बंड**, विद्यानंद सरस्वती प्रकाशन, मुंबई; २=००
१०. **जाधव वसंत — हक्काचं घर**, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई; २=००
११. **जाधव शं. ह. — जोहर**, राज प्रकाशन, कोल्हापूर; २=००
१२. **जोशी न. म — हलकल्लोळ आणि इतर एकांकिका**, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; १=७५
१३. **जोशी चिं. वि. — त्रिसुपर्ण**, पॅरमाऊंट प्रकाशन, पुणे २; १=५०
१४. **टाकळकर गोपाळ -- एक दिवटी पाच बुधले**, जोशी ब्रदर्स, पुणे; २=००
१५. **टोंगो शरच्चंद्र — नव्या उन्हाळ्या नवे खापे**, नागपूर प्रकाशन, नागपूर; १=७५
१६. **डावरे पद्माकर — तिसरा बाजीराव**, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २=००
१७. **देवरुखकर विनायक — माळावरची माणसं**, चंद्रकांत शेट्ये प्रकाशन मंदिर; कोल्हापूर; २=००
१८. **देशमुख मो. दा. — देव्हारा**, महाराष्ट्र नाट्यसंघ, वर्धा; २=००
१९. **धारगळकर ना. र. — सख्खे भाऊ पक्के वैरी**, निचकर आणि मंडळी मुंबई; २=००
२०. **नाडकर्णी कमलाकर — राजा शिवछत्रपति**, संजय प्रकाशन, मुंबई २८; २=००
२१. **पवार रा. ना. — कविराय राम जोशी**, जयहिंद प्रकाशन, मुंबई; २=००
२२. **प्रताप — ब्रह्मगाठ**, गो. ल. जमदाडे, दुधोंडी ( सांगली ); २=००
२३. **पाटील शंकर — जे का रंजले गांजले**, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; २=००
२४. **पारखी गो. गं — कोरीव लेणी**, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; २=५०
२५. **फाटक नानासाहेब — हॅम्लेट** ( रंगावृत्ति ), जयलक्ष्मी प्रकाशन, दादर, मुंबई २८; २=८०

२६. भट गो. के. — भास : तीन एकांकिका, महाराष्ट्र प्रकाशन गृह, कोल्हापूर; १=५०
२७. मतकरी रत्नाकर — एकाच मातीची खेळणी, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ५=००
२८. माडगूळकर व्यंकटेश -- काळाबरोबर चला, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २, ००=८०
२९. रासने अरविंद -- मॅटिनी आणि इतर एकांकिका, यशवन्त प्रकाशन, पुणे; १=००
३०. रांगणेकर मो. ग. — हिमालयाची बायको, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २=००
३१. लिमये बाबा -- शून्यांतून शून्याकडे, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; २=५०
३२. शिरवाडकर वि. वा. — अथेल्लो, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई; २=५०
३३. साठे शं. गो. — ससा आणि कासव, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई; २=५०
३४. सावंत बी. एन्. — संगीत राजनिष्ठा, बी. एन्. सावंत, मुंबई; २=००
३५. साळगावकर वि. द. — चवथीचा चंद्र, तुला प्रकाशन, पुणे २; २=००
३६. सुरु न. गो. -- दीप मालवू नको रे, प्रा. न. गो. सुरु, मधुरंजन, पुणे ४; १=००

## चरित्र-आत्मचरित्र

१. आपटे राधाबाई -- उमटलेली पावले, साधना प्रकाशन, पुणे २; ५=००
२. करंदीकर वि. र. -- कै. र. पां. ऊर्फ दादासाहेब करंदीकर यांची दैनंदिनी, बॅ. वि. र. करंदीकर, सातारा; २=५०
३. काळे पु. बा. — अनसूयाबाई आणि मी, पु बा. काळे, धंतोली, नागपूर १; १२=००
४. किंजवडेकर श्रीपादशास्त्री--नित्यनिरंजनाधूत अक्कलकोटनिवासी श्रीस्वामी चरित्र आणि कार्य — श्री व्यास प्रकाशन, पुणे ४; १२=००
५. खानोलकर गं. दे. — अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक भाग ५ वा, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ६=००
६. खापर्डे बा. ग. -- श्री. दादासाहेब खापर्डे यांचे चरित्र, प्रसाद प्रकाशन, पुणे २, २०=००
७. गाडगीळ न. वि. -- काही मोहरा काही मोती, व्हीनस बुकस्टॉल, पुणे २; ७=५०
८. गोखले वा. दा. -- स्वराज्यातील गृहांगना, श्रीलेखनवाचन भांडार, पुणे २; १=००
९. ताटके अरविंद — त्यागमूर्ति मोतिलाल नेहरू, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; २=००
१०. ताटके अरविंद -- संशोधक सप्तर्षि, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; २=००
११. थत्ते यदुनाथ — अमृतधारा, श्रीराम प्रकाशन, मुंबई; २=००
१२. दामले प्र. रा. — पांच थोर नेते, आयडियल बुक सर्व्हिस, पुणे २; २=५०
१३. दांडेकर वि. पां. — सयाजीराव महाराज, ठोकळ प्रकाशन, पुणे २; १=५०
१४. दीक्षित म. श्री. -- तेजस्वी तारका, सह्याद्रि प्रकाशन, पुणे २; १=५०

१५. दीक्षित म. श्री -- पुण्यश्लोक अहल्याबाई होळकर, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; २=००
१६. देव ग. वा. -- मोरया गोसावी यांचे चरित्र, पॅरमाऊंट पब्लिसिटी सि. प्रा. लि. पुणे २; १=७५
१७. देवळे शं. रा. — दीपमाळ, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; २=००
१८. पटवर्धन ना. म. -- डॉ. राजेंद्रप्रसाद, जगताप कारले प्रकाशन, पुणे २, ३=५०
१९. पाटणकर ना. वि. — समाधान, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ६=००
२०. पाटील दिनकर -- माझे शिल्पकार, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ३=००
२१. पिंपळे श्री. पु. -- महात्मा फुले, मंगल प्रकाशन, आकोट; २=००
२२. पुरोहित वा. श्री. -- मराठी नाटके माझा छंद, लोकहितवादी मंडळ, नाशिक; १०=००
२३. पेंढरकर य. दि. -- हृषिस्वर, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ३=५०
२४. बावर कृ. भा. -- एका शिक्षकाची आत्मकथा, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ५=००
२५. मराठे कृ. बा. -- बालकवि, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १२=५०
२६. मायदेव वा. गो. -- वेचलेले क्षण, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ८=००
२७. लिमये शिरुभाऊ -- निवडुंगाची बोंडे, सह्याद्रि प्रकाशन, पुणे २; २=४०
२८. वरेरकर मामा — माझा नाटकी संसार, भाग ४, सागर साहित्य प्रकाशन, मुंबई; ५=००
२९. विभाकर -- सेनापतींची जीवनगाथा, नाथ ताम्हणे, पूर्व मुलुंड, मुंबई ८०, १=२५
३०. सहस्रबुद्धे रा. शि. -- अक्कलकोट स्वामीमहाराज चरित्र, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ३=००
३१. सावरकर यांच्या आठवणी -- अधिकारी प्रकाशन, ३९६ नारायण, पुणे २; ४=००

## ललितगद्य

१. अवसरे वसंत — भिक्षूंच्या प्रदेशांतून, साधना प्रकाशन, पुणे २; १=५०
२. ओक शा. नी. — शामराई, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५=००
३. कर्णिक मधु मंगेश — सोबत, देशमुख आणि कंपनी, पुणे २; ४=५०
४. काणेकर अनंत — पाण्यावरल्या रेषा, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ५=००
५. केळकर म. म. — ते माझे घर, मनोहर ग्रंथमाला, पुणे २; ३=००
६. गाडगीळ वाळ — गवाळ ग्रंथ, शुभदा प्रकाशन, पुणे ४; ३=००
७. जोशी चिं. वि. — बोरीबाभळी, भगवानदास हिरजी, मुंबई; ३=५०
८. जोशी श्रीपाद -- चिनारच्या छायेत, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ४=००
९. ढेरे रा. चिं. -- इंद्रायणी, द. र. कोपर्डेकर, १२५७ सदाशिव, पुणे २; २=००
१०. देशपांडे अ. ना. व जोशी ग. वा. — साहित्यातील विवेक (संपादन) विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे २; ४=००

११. देशपांडे पु. ल. -- व्यक्ति आणि वल्ली, देशमुख आणि कंपनी, पुणे २; १० रु.
१२. पंडित शैला -- मी पाहिलेला जपान, सौ. लता तांबे, चिमणबाग, पुणे २; १=५०
१३. फडके ना. सी. — नादलुब्धाच्या आठवणी, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ३=००
१४. फडके ना. सी. — मुजरे, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ३=००
१५. भागवत दुर्गा -- व्यासपर्व, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ३=५०
१६. भोळे केशवराव -- अस्ताई, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५=००
१७. मंत्री रमेश — चोरवाटा, श्रीराम प्रकाशन, मुंबई; २=००
१८. माटे श्री. म. — विचारमंथन, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ५=५०
१९. शास्त्री शं. बा. — हे विश्वचि माझे घर (रवींद्रनाथ ठाकूर यांच्या ग्रंथाचा अनुवाद) मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १०=००
२०. सवनीस वसंत -- चिल्लर खुर्दा, प्रभा प्रकाशन, नागपूर; ३=००
२१. सामंत बाळ — गोंधळ, चिंतामणि प्रकाशन, मुंबई; ३=५०
२२. क्षीरसागर श्री. के. — वायका, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ५=००
२३. क्षीरसागर श्री. के. -- वादे वादे, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ५=००

## टीकात्मक

१. अर्जुनवाडकर-मंगरूळकर -- मम्मटभट्टविरचित काव्यप्रकाश, देशमुख प्रकाशन, पुणे २; पृ. १४००, मूल्य ५० रु.
२. कानिटकर वि. ग. — दर्शन ज्ञानेश्वरी, इंदिरा प्रकाशन, विलेपार्ले; ४=००
३. कालेलकर ना. गो. -- भाषा आणि संस्कृति, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ७=५०
४. कुलकर्णी वि. य. -- आनंदे भरीन तिन्ही लोक, उन्मेष प्रकाशन, लोणावळा; १=५०
५. खापर्डे वा. ग. — साहित्याचा संसार, पुणे विद्यापीठ, पुणे ७; २=००
६. गडकरी रा. ग. -- अप्रकाशित गडकरी, ह. वि. मोटे प्रकाशन, मुंबई; ८=००
७. गाडगीळ गंगाधर -- साहित्याचे मानदंड, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ३४; ७=००
८. गोमकाळे द. रा. -- अत्रे आणि मराठी रंगभूमि, व्हीनस प्रकाशन, पुणे २; १२=५०
९. जोग रा. श्री. — विचक्षणा, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे २; ४=००
१०. जोशी य. गो. — सुबोध ज्ञानेश्वरी. अध्याय १ ते ६, प्रसाद प्रकाशन पुणे २; ५=००
११. देशपांडे पु. य. — अनुभवामृत-रसरहस्य, नागपूर प्रकाशन, नागपूर १; १२=००
१२. देशपांडे मु. गो. -- पाश्चात्य प्रतिभा (होमर ते हेमिंग्वे), महाराष्ट्र प्रकाशन गृह, कोल्हापूर; १५=००
१३. देशपांडे वा. ना. — विमर्शिनी, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ६=००
१४. पगडी सेतुमाधवराव — उर्दू काव्याचा परिचय, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ८=००

१५. पगडी सेतुमाधवराव — मणिकांचन, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर; ५=००
१६. पोतदार द. वा. — भारताची भाषासमस्या, राष्ट्रभाषा भवन, पुणे २; १=५०
१७. बनहट्टी श्री. ना. — आकाशलहरी, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर; ३=००
१८. रेगे पु. शि. — छांदसी, देशमुख आणि कंपनी, पुणे २; ४=५०
१९. वाटवे के. ना. — संस्कृत नाट्यसौंदर्य, देशमुख आणि कंपनी, पुणे २, १२=००
२०. शेणोलीकर ह. श्री. — प्राचीन मराठी वाङ्मयाचे स्वरूप, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ७=००
२१. सहस्रबुद्धे पु. ग. — पराधीन सरस्वती, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५=००
२२. सहस्रबुद्धे शं. ना. — नाट्यचिकित्सा, विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे २; २=००

## इतिहास—संशोधन

१. करंदीकर अ. ज. — अशोक ते कालिदास (हिंदुग्रीक संघर्षाचा उत्तरार्ध), अ. ज. करंदीकर, ६०७ सदाशिव, पुणे २; १०=००
२. करंदीकर अ. ज. — वैदिक आर्यांचे ज्योतिर्विज्ञान आणि वैदिक देवतांचे पुनर्दर्शन, अ. ज. करंदीकर ६०७ सदाशिव, पुणे २; ५=००
३. आवळसकर शां. वि. — रायगडची जीवनकथा, महाराष्ट्र राज्य-साहित्य व संस्कृति मंडळ, मुंबई ३२; ४=००
४. कुंटे भ. ग. — अहमदनगरची निजामशाही (अनु.) मुरली प्रकाशन, मुंबई २८; १२=००
५. केळकर य. न. — ऐतिहासिक शब्दकोश भाग १ व २, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ३०=००
६. कोलते वि. भि. — मूर्तिप्रकाश (संपादन), विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर १; १०=००
७. खोबरेकर वि. गो. — गुजरातेतील मराठी राजवट, राजहंस प्रकाशन, पुणे २; ७=००
८. गुजर मा. वि. — करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची साधने- भाग १ ते ४ (१७७० ते १८८४)— मा. वि. गुजर, कसबा, पुणे २; २०=००
९. दाते प. रा. — महाराष्ट्राची राजकीय पंढरी— रायगड, कुलाबा जिल्हा परिषद, पेण; २=५०
१०. दिवेकर ह. रा. — आमचा महाभारतपूर्व राजकीय व सांस्कृतिक इतिहास पुणे विद्यापीठ, पुणे ७; १=५०
११. देव शां. भा. — महाराष्ट्रातील उत्खनने, पब्लिकेशन्स डिव्हिजन, दिल्ली ६; २=००
१२. पगडी सेतुमाधवराव — मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (संपा.) जोशी-लोखंडे प्रकाशन, पुणे २; ४=००
१३. वैद्य शं. ल. — वैद्य दप्तरांतून निवडलेले कागद, खंड ६ वा, मालतीबाई वैद्य, सातारा; ३=००

## कोश आणि संदर्भ

१. आपटे-जोशी — शास्त्रीय परिभाषा-कोश, म. सा. परिषद्, पुणे २; ६=००
२. उजळंबकर कृ. मु. — ग्रंथालयशास्त्राची पांचसूत्रे, विदर्भ-मराठवाडा बुक कंपनी, पुणे २; १=८०
३. केतकर श. म. — संग्रहालय-परिचय, मुकुंद बा. केतकर, ४७१ शनिवार, पुणे २; १०=००
४. केशवन् बी. एस्. — राष्ट्रीय ग्रंथ-सूची ( मराठी विभाग १९६० ), शिक्षण आणि समाजकल्याण खाते, महाराष्ट्र सरकार, मुंबई; २=५०
५. जोशी महादेवशास्त्री — गुजरात, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; ३=००
६. जोशी महादेवशास्त्री — भारतीय संस्कृतिकोश, ( प्रथम खंड- अं ते औक्षण ), भारतीय संस्कृति-कोश मंडळ, ४१३ शनिवार, पुणे २; पृ. ८००, मूल्य ३० रु.
७. दीक्षित म. श्री. — मराठी साहित्याचा कारभार अर्थात मराठी साहित्य-संस्था, वोरा अँड पब्लि. कं. लि. मुंबई; ००=६०
८. पदनामकोश — ( प्रशासनविषयक इंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द ) भाषा संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई ३२.
९. रणपिसे आ. श्री. — दलितांची वृत्तपत्रे, भाऊसाहेब अडसूळ, मुंबई १८; १=५०
१०. रानडे वा. दा. व गर्गे स. मा. — भारताचे लोकमत, संगम प्रकाशन, पुणे ४; २=००

## संकीर्ण

( धर्म, राजकारण, सामाजिक, कला, क्रीडा, विज्ञान इ. )

१. कर्वे चिं. श्री. — अणूंतून अनंताकडे, व्हीनस प्रकाशन पुणे २; ३=००
२. कातगडे पुंडलिकजी — अनुग्रह ( पत्रे ), पुंडलिकजी कातगडे, बेळगाव; ५=००
३. कामत गो. स. — बँकिंग : तत्त्व आणि व्यवहार, चिरंजीव ग्रंथ प्रकाशन, पुणे २; ३=००
४. केळकर कृ. वा. — रोजचे आरोग्य, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ४=००
५. खेर द. म. — श्री अष्टविनायक, आनंद कार्यालय, पुणे २; ३=२५
६. गाडगीळ-अभ्यंकर-खरात — महाराष्ट्र जिल्हा परिषद कायदा १९६१, ठोकळ प्रकाशन, पुणे २; १२=००
७. गाडगीळ न. वि. — आधुनिक राज्य आणि स्वातंत्र्य, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; ८=००
८. गोखले शांताबाई — कीर्तनकमल पुष्प पहिले, संतस्मृति प्रकाशन, ५९३ सदाशिव, पुणे २; १=५०
९. गोखले श्री. पु. — शंकासमाधान, लोकमान्य प्रकाशन, पुणे २; २=००
१०. चव्हाण यशवंतराव — सह्याद्रीचे वारे, प्रसिद्धि विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई; ३=००
११. चौधरी रा. मो. — शेतीची मूलतत्त्वे, चिरंजीव ग्रंथ प्रकाशन, पुणे २; ४=००
१२. जगताप बा. ग. — जगातील थोर धर्म, व्हीनस प्रकाशन, पुणे २; २=६५

१३. जोगळेकर नाना — रंगभूषा - शास्त्र आणि कला, जोशी–लोखंडे प्रकाशन, पुणे २ ; ३=००
१४. जोशी मा. पु. — वाग्विज्ञान, डॉ. मा. पु. जोशी, पुणे २; ३=००
१५. जोशी मा. पु. व सौ जोशी रमाबाई — गृहस्थाश्रमामध्ये पदार्पण, डॉ. मा. पु. जोशी, पुणे २; २=००
१६. जोशी श्रीपाद — ग्रामीण विकासाची वाटचाल (भाग पहिला, जोशी–लोखंडे प्रकाशन, पुणे २; २=००
१७. जोशी श्रीपाद — मुस्लीम सण आणि संस्कार, विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे २; १=८०
१८. तुळपुळे शं. गो. — रामकविकृत भाषाप्रकाश, पुणे विद्यापीठ, पुणे ७; ५ रु.
१९. देशपांडे ल. ग. — कळसूत्री बाहुली ( बाहुली नाट्य ) सौ. रतन देशपांडे, २३२ आर शुक्रवार, पुणे २; ५=००
२०. पटवर्धन वसंत — विदेश विनिमय, व्हीनस बुक स्टॉल, पुणे २; २०=००
२१. बिवलकर राम — भगीरथाचा वारसा, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; २=५०
२२. बेडेकर मालती — घराला मुकलेल्या स्त्रिया व काळाची चाहूल, देशमुख आणि कं, पुणे २; ७=००
२३. भावे शिवाजी — नारदभक्तिसूत्रे आणि त्यातील भक्तिविचार, परंधाम प्रकाशन, पवनार ( वर्धा ), १=५०
२४. म. गांधी यांचे संकलित वाङ्मय ( खंड २, १८९६-१८९७ ) — प्रसिद्धी विभाग, महाराष्ट्र सरकार मुंबई१; ६=५० व ३=५०
२५. मारुलकर ना. र. — संगीतातील घराणी, शं. स. लिमये, १० क सदाशिव पुणे २; ७=००
२६. मोकाशी दि. वा. — यंत्र आणि तंत्र, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; २=५०
२७. लचके हरिश्चंद्र — गुदगुल्या, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २; २=००
२८. लिमये अ. ह. — कळावे, लोभ असावा ही विनंती, व्हीनस बुक स्टॉल, पुणे २, ३=००
२९. वझे य. ग. — नौका आणि नाविककथा, सुरुचि प्रकाशन, पुणे २; ३=००
३०. वाळिंबे रा. शं. — एकोणीसाव्या शतकातील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना, भाग पहिला १८००–१८४५; रा. शं. वाळिंबे, पुणे २; १०=००
३१. वैद्य व. ल. — प्राणायाम व योगासने, च. ल. वैद्य, ११३१ सदाशिव, पुणे २; १=९०
३२. शिखरे दा. न. — स्वतंत्र भारताची भरारी, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; २=५०
३३. समेळ सोमनाथ — जादूची खिडकी ( टेलिव्हिजन ), ज्ञानलता मंडळ, मुंबई ४; १=५०
३४. सराफ दत्ता — भारतीय क्रिकेट, अनुपम प्रकाशन, मुंबई; ३=००
३५. सहस्रबुद्धे पु. ग. — लोकसत्तेचे दंडसत्तेला आव्हान, कॉंटिनेंटल प्रकाशन पुणे २; ६=००
३६. साठे म. दा. — पाणिनी व पाणिनीय व्याकरणसंप्रदाय, जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे २; ४=००
३७. व्हटकर नामदेव — भारतातील जातिभेद आणि त्यावर उपाय, यशश्री प्रकाशन, कोल्हापूर; ४=००

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद

## १९६२-६३ चे इतिवृत्त

म. सा. परिषदेच्या कार्याचे १९६२-६३ चे इतिवृत्त सभासदांना सादर करण्यात येत आहे.

**सभासद संख्या :–**वर्षारंभी सभासद संख्या १४८१ होती. ती वर्षअखेर (मार्च १९६३) १६३५ झाली आहे. म्हणजे सभासद संख्येत १५४ ने वाढ झालेली आहे. साधारण सभासद संख्येत यंदा ६२ व तहहयात संख्येत ९२ अशी वाढ झालेली आहे. गतवर्षी साधारण ९७०, तहहयात ४७३, हितचिंतक २३, सहायक ८, आश्रयदाते ५ व उपकर्ते २ अशी वर्गवारी होती. यंदा साधारण १०३२, तहहयात ५६५, हितचिंतक २३, सहायक ८, आश्रयदाते ५ व उपकर्ते २ अशी वर्गवारी आहे. तहहयात सभासद संख्येत यंदाइतकी पूर्वी कधीहि वाढ झालेली नव्हती असे दिसून येईल. साधारण सभासद संख्येत या वर्षी हजाराची मर्यादा ओलांडली गेली आहे.

**आर्थिक स्थिती :–**या इतिवृत्तासोबत हिशेबतपासनिसांनी तपासलेले व कार्यकारी मंडळाने (२८–४–६३ ची सभा) संमत केलेले जमाखर्च व ताळेबंदपत्रके आहेत. या दोन्ही पत्रकांवरून परिषदेची आर्थिक स्थिती गतवर्षीपेक्षा सुधारल्याचे दिसून येईल. गेल्या दोन वर्षांनी तहहयात सभासद वर्गणी घटनेनुसार या वर्षी कायम निधीत टाकली आहे.

**काही विशेष घटना :–१. ज्ञानकोशकार केतकर यांचे स्मारक–**ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मारकाचा गेली काही वर्षे लांबणीवर पडलेला प्रश्न यंदा सुटलेला आहे. पानशेतच्या प्रलयानंतर कै. केतकरांच्या संभाजी पुलानजीकच्या समाधीला धोका पोचलेला होता. पुणे महानगरपालिकेने त्यांच्या नवीन स्मारकासाठी संभाजी पुलानजीक एक जागा दिली होती व तिला परिषदेतर्फे एक कुंपणही घालण्यात आले होते. पण हे कुंपणही पानशेतच्या प्रलयात वाहून गेले. प्रलयानंतर कै. केतकरांच्या समाधिस्थानामधील अस्थी परिषदेत आणून ठेवण्यात आल्या. त्यानंतर परिषदेतर्फे महापालिकेकडे स्मारकासाठी नव्या जागेची मागणी करण्यात आली. या मागणीचा पुणे महानगरपालिकेचे शासनाधिकारी श्री. स. वा. कुलकर्णी व उपशासनाधिकारी श्री. खोपकर व सभासद यांनी आस्थापूर्वक विचार केला आणि अखेर त्यांच्या शिफारशीनुसार पुणे महानगरपालिकेने १९–३–६३ च्या सभेत कै. केतकर स्मारकासाठी कमला नेहरू उद्यानात एक सोयिस्कर जागा दिली. (या जागेत १० एप्रिल १९६३ रोजी कै. केतकर यांच्या अस्थी विधिपूर्वक ठेवण्यात आल्या. या प्रसंगी श्री. शीलवतीबाई केतकर उपस्थित होत्या. चबुतऱ्याचा खर्च श्री. ग. म. आपटे इंजिनिअर हे विनामूल्य करून देणार आहेत. स्मारकाची इतर सर्व व्यवस्था महानगरपालिका पाहणार आहे.)

**२. साहित्यिकांचे अतिथिभवन :–**

परगावाहून पुण्यात येणाऱ्या साहित्यिकांना निवासस्थानाची नेहमी गरज भासत असते. ही गरज लक्षात घेऊन परिषदेने 'अतिथिभवन' बांधण्याची योजना हाती घेतली आहे. या अतिथिभवनासाठी परिषदेचे अध्यक्ष श्री.

काकासाहेब गाडगीळ यांनी आतापर्यंत १२६०५ रुपयांची रक्कम गोळा केली आहे. अतिथिभवनास सुमारे ४० हजार रुपये खर्च येणार आहे.

**३. वाङ्मयेतिहास योजना** :–परिषदेच्या वाङ्मयेतिहास योजनेपैकी चौथा खंड (१८०० ते १८७४) लिहून पुरा झाला आहे. छपाईच्या कामास जूनमध्ये आरंभ होईल, व साधारणपणे येत्या दिवाळीच्या सुमारास खंड प्रसिद्ध होईल असे वाटते. या खंडाचे संपादन प्रा. रा. श्री. जोग यांनी केले असून डॉ. कृ. भि. कुलकर्णी, प्रा. म. श्री. पंडित, डॉ. ल. म. भिंगारे, डॉ. वि. वि. पटवर्धन, प्रा. गो. म. कुलकर्णी व प्रा. द. भि. कुलकर्णी यांनी विविध विषयांवर लेखन केले आहे.

**४. नवी प्रकाशने** :–शास्त्रीय परिभाषाकोश परिषदेच्या परिभाषा-मंडळामार्फत ज्या निरनिराळ्या विषयांवर परिभाषा सिद्ध झाल्या होत्या त्या सुधारून यंदा ग्रंथरूपाने (शास्त्रीय परिभाषा कोश) प्रसिद्ध करण्यात आल्या. ग्रंथाचे संपादन डॉ. म. वि. आपटे व डॉ. मा. पु. जोशी यांनी केले. कोशाच्या प्रकाशनासाठी भारत सरकारच्या वैज्ञानिक आणि सांस्कृतिक खात्याने १२५० रुपयांचे अनुदान दिले होते. परिषदेने आणखी तेवढीच रक्कम खर्च करून प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित केला. डॉ. आपटे व डॉ. जोशी यांचे आभार.

महाराष्ट्र सरकारच्या शिक्षणखात्याने २० सप्टेंबर १९६२ रोजीच्या ठरावान्वये मान्यता दिलेले मराठी साहित्य महामंडळाचे 'लेखन-विषयक नियम' परिषदेने प्रथमच प्रसिद्ध केले.

**देणग्या** :–मुंबईचे सॉलिसिटर श्री. म. वि. गोखले यांनी आपले वडील कै. विश्वनाथ बल्लाळ गोखले, सरन्यायाधीश, संस्थान कोल्हापूर, आणि मातुःश्री कै. पार्वतीबाई गोखले यांच्या स्मरणार्थ सरकारी कर्ज रोख्यांच्या रूपाने रु. ५००० ची देणगी परिषदेस दिली आहे. या देणगीच्या व्याजाचा विनियोग ग्रंथपारितोषिक व प्राज्ञ–विशारद उमेदवारांना पारितोषिके देण्याकडे व्हावयाचा आहे.

**५. घटना-दुरुस्ती** :–म. सा. परिषद ही महामंडळाची घटकसंस्था झाली असल्याने तिच्या कार्याला येथून पुढे काही स्थळमर्यादा पडणार आहेत. त्या दृष्टीने आवश्यक त्या दुरुस्त्या घटनेत करण्यात आल्या आहेत. दिवसेदिवस परिषदेचा व्याप वाढत चालल्याने व 'पत्रिके'च्या छपाई खर्चातही वाढ झाल्याने वर्गणीत वाढ करणे प्राप्त झाले व तशी घटनेत दुरुस्ती करण्यात आली आहे. साधारण सभासद वर्गणी ३ रु. होती ती ५ रु. करण्यात आली व तहहयात ५० रु. होती ती १०० रु. करण्यात आली.

परिषदेने केलेल्या अर्जाचा सहानुभूतिपूर्वक विचार करून यंदा महाराष्ट्र सरकारच्या शिक्षणखात्याने परिषदेला ६१४० रु. चे अनुदान ( Maintenance Grant ) दिले आहे.

**स्मृतिदिन** :–परिषदेतर्फे यंदा ज्ञानकोशकार कै. केतकर, कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी, कै. वा. म. जोशी, कै. माधव जूलियन, कै. राम गणेश गडकरी यांचे स्मृतिदिन पाळण्यात आले. केतकर स्मृतिदिनी (१०–४–६२) डॉ. मा. प. मंगुडकर यांचे 'डॉ. केतकरांचे समाजशास्त्रीय विचार' या विषयावर प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झाले. कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांच्या स्मृतिदिनी (१३–४–६२) त्यांच्या छायाचित्रास पुष्पहार घालण्यात आला. या प्रसंगी डॉ. के. ना. वाटवे, प्रा. श्री. के. क्षीरसागर इत्यादींनी भाषणे करून पंतप्रतिनिधींचे स्मरण केले. कै. वामन मल्हार जोशी यांच्या स्मृतिदिनाला (२०–७–६२) त्यांचे पुतणे प्रा. अ. म. जोशी व्याख्याते म्हणून लाभले होते. श्री. तळवलकर यांच्या

अध्यक्षतेखाली त्यांचे 'वामन मल्हार–वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व' या विषयावर व्याख्यान झाले. कै. माधव जूलियन स्मृतिदिनी (२९–११–६२) प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचे 'माधव जूलियन व मराठी प्रेमकविता' या विषयावर व्याख्यान झाले. कै. गडकरी स्मृतिदिनी श्री. द. रा. गोमकाळे यांच्या अध्यक्षतेखाली प्रा. ग. प्र. प्रधान यांनी 'गडकऱ्यांचे अंतरंग' यावर प्रकाश टाकला.

**व्याख्याने :**–चालू वर्षी परिषदेतर्फे दोन व्याख्यानमाला विशेष प्रकारे आयोजित करण्यात आल्या. कै. गोविंदराव टेंबे स्मारक व्याख्यानमालेचे यंदाचे चौथे पुष्प दि. २७,२८ व २९ जुलै रोजी प्रा. अरविंद मंगरूळकर यांनी गुंफले होते. 'संगीत सौंदर्याच्या प्रणाली' हा त्यांच्या व्याख्यानमालेचा विषय होता. 'पेटीवादनकार गोविंदराव टेंबे,' 'संगीतातील व्यक्तित्व' व 'घराणे आणि व्यक्तित्व' या तीन विषयांवर व्याख्यात्यांनी आपले विचार मांडले. विश्वकवी रवींद्रनाथ टागोर यांच्या जन्मशताब्दिनिमित्त परिषदेने यंदा २० व २२ डिसेंबरला अलाहाबादचे प्रो. व्ही. एस्. नरवणे यांना व्याख्यानांसाठी निमंत्रित केले होते. त्याप्रमाणे वरील दिवशी प्रो. नरवणे यांनी 'टागोर यांचे विचार आणि मानवता' या विषयावर इंग्रजीत व्याख्याने दिली. या व्याख्यानांच्या वेळी श्री. के. नारायण काळे अध्यक्ष होते.

**सत्कार भेटी, अभीष्टचिंतने इत्यादि :**– सातारा साहित्य संमेलनाचे नियुक्त अध्यक्ष श्री. काकासाहेब गाडगीळ यांचा सत्कार परिषदेतर्फे ५ ऑक्टोबरला म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आला. या वेळी प्रा. क्षीरसागर, डॉ. कमलाबाई देशपांडे, श्री. तळवलकर, महाराष्ट्रकवी यशवंत, डॉ. वा. दा. गोखले, श्री. श्री. शं. नवरे व श्री. अ. ह. लिमये यांची भाषणे झाली. 'अनामिकाची चिंतनिका' या ग्रंथास साहित्य अकादमीचे ५००० रु. चे पारितोषिक मिळाल्याबद्दल ग्रंथकार श्री. पु. य. देशपांडे यांचा १० मार्चला श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार केला. या प्रसंगी डॉ. वा. दा. गोखले व प्रा. क्षीरसागर यांनी भाषणे केली.

१ मे रोजी महाराष्ट्र राज्य स्थापनादिन परिषदेतर्फे पाळण्यात आला. या प्रसंगी साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास यांचे 'विदर्भाची शारदोपासना' या विषयावर व्याख्यान झाले. पुणे विद्यापीठातर्फे टागोर व्याख्यानमाला गुंफण्यासाठी डॉ. सुनीतिकुमार चतर्जी मे महिन्यात आले होते. चिटणिसांच्या विनंतीनुसार त्यांनी २७ मे रोजी परिषदेला भेट दिली. निमंत्रितांपुढे त्यांनी आजच्या वंग साहित्यविषयक कार्याची माहिती सांगितली. जळगावच्या 'प्रबोधचंद्रिके' चे संस्थापक 'काव्यरत्नावली' कार कै. नानासाहेब फडणीस यांच्या जन्मशताब्दिनिमित्त परिषदेने महाराष्ट्रकवी यशवन्त यांच्या अध्यक्षतेखाली ७ जूनला एक विशेष सभा भरविली होती. या सभेत श्री. वि. द. घाटे, प्रा. अदवन्त, श्री. तळवलकर इत्यादींची भाषणे झाली.

व्हीनस प्रकाशन, देशमुख आणि कंपनी आणि द. र. कोपर्डेकर प्रकाशन या संस्थांना २५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल परिषदेतर्फे त्यांचे अभिनंदन करण्यात आले. महाराष्ट्र सरकारने यंदा ज्यांच्या पुस्तकांना पारितोषिके दिली त्या सर्व लेखकांना परिषदेतर्फे अभिनंदनपर पत्रे पाठविण्यात आली. परिषदेचे एक जुने कार्यकर्ते व चिटणीस श्री. रा. दा. देसाई यांच्या वयाला ८२ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल त्यांच्या आप्तमित्रांनी २७ जानेवारीला त्यांचा सत्कार करून अभीष्टचिंतन केले. या कार्यक्रमात परिषदही सहभागी झाली होती. म. सा. परिषदेचे भूतपूर्व उपाध्यक्ष म. म. पां. वा. काणे यांना भारतसरकारने 'भारतरत्न' हो पदवी

दिल्याबद्दल परिषदेने त्यांचे पत्रद्वारे अभिनंदन केले. तसेच श्री. भा. वि. वरेरकर यांच्या ८१ व्या वाढदिवसानिमित्त त्यांचेही अभिनंदन करण्यात आले.

**संमेलन** :—मराठी साहित्य संमेलनाचे ४४ वे अधिवेशन सातारा येथे 'नगर वाचनालया' तर्फे दि. २,३ व ४ नोव्हेंबर रोजी न्यू इं. स्कूलमध्ये उभारलेल्या 'भाऊराव पाटील नगरा'त श्री न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वीपणे साजरे झाले. संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री. ना. हृ आपटे होते, व उद्‌घाटन महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री श्री. यशवन्तराव चव्हाण यांनी केले. संमेलनापूर्वी दोन दिवस श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेखाली एक शैक्षणिक चर्चासत्र आयोजिण्यात आले होते. या सत्रात डॉ. ग. श्री. खैर, श्री. कृ. भा. बाबर, प्रा. ना. ध. पाटील, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. रा. भि. जोशी, सौ. लीला भागवत, प्रा. चंद्रकुमार डांगे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. प्र. न. जोशी, व डॉ. द. न. गोखले यांनी भाग घेतला होता. संमेलनाला जोडून 'ग्रामीण रसिक वाचकांची साहित्याविषयीची कल्पना व त्यांच्या अपेक्षा' आणि 'प्रकाशक-ग्रंथकार यांच्या सहकार्याने ग्रंथप्रसाराची योजना' या दोन विषयांवर श्री. आण्णाभाऊ साठे व श्री. सदानंद भटकळ यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाले. पहिल्या परिसंवादात श्री. नामदेवराव व्हटकर, श्री. शंकर पाटील, श्री. कृ. भा. बाबर, डॉ. सरोजिनी वावर व प्रा. सूर्यवंशी यांनी भाग घेतला. दुसऱ्या परिसंवादात श्री. अ. हृ. लिमये, श्री. रा. ज. देशमुख, श्री. अनंतराव कुलकर्णी, श्री. मामा वरेरकर, श्री. य. गो. नित्सुरे व डॉ. न. का. घारपुरे यांनी आपले विचार प्रदर्शित केले. संमेलनाच्या दुसऱ्या दिवशी म. म. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली संतवाङ्मयावर एक प्रकट सभा राजवाड्यासमोरील मैदानात झाली. या सभेत श्री. त्र्यं. शि. भारदे, प्रा. गं. बा. सरदार, आचार्य अत्रे, डॉ. शं. गो. तुळपुळे व श्री. प्रभाकर माचवे यांनी अनुक्रमे ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, रामदास व हिंदी संत या विषयांवर भाषणे केली.

संमेलनाला उपस्थित राहिलेल्या माजी संमेलनाध्यक्षांचा सत्कार, निबंधवाचन, काव्यगायन, नाटयप्रयोग ('तो मी नव्हेच' आणि 'सवाई माधवरावाचा मृत्यु'), लोककला आणि लोकवाङ्मय यांची प्रात्यक्षिके इत्यादि कार्यक्रमांनी संमेलनाच्या आकर्षकतेत भर पडली. पुण्याच्या 'मराठी ग्रंथ प्रकाशक' संस्थेतर्फे व्यासपीठाच्या मागील सभागृहात १९६० ते ६२ सालांतील नव्या ग्रंथांचे प्रदर्शन भरविण्यात आले होते. विषयनियामक समितीत व खुल्या अधिवेशनात जे ठराव संमत झाले ते 'पत्रिके'च्या १४२ व्या अंकात छापले आहेत. संमेलनाला परस्थ प्रतिनिधी मोठ्या संख्येने उपस्थित होते. गोमंतकातून आलेल्या प्रतिनिधींचे सर्वांकडून विशेष स्वागत झाले. प्रतिनिधींच्या निवास–भोजनाची सोय स्वागतमंडळाने चांगली ठेवली होती. संमेलन यशस्वी करण्यासाठी नगराध्यक्ष श्री. रा. ना. गोडबोले, कार्याध्यक्ष श्री. शि. गो. भावे, कोषाध्यक्ष श्री. रा. शं. दातार, कार्यवाह श्री. श्री. वा. आचार्य, श्री. ग. वा. करंदीकर, श्री. अ. श्री. भडकमकर व सौ. वत्सला पाटील, तसेच श्री. दत्तोपंत परांजपे,-श्री. सोमण मास्तर प्रभृति कार्यकर्त्यांनी आणि स्वयंसेवक-सेविकांनी खूप परिश्रम केले.

म. सा. संमेलनाचे आगामी ४५ वे अधिवेशन गोमंतकात 'गोमंतक साहित्य सेवक मंडळा'तर्फे भरविण्यात येणार आहे.

**सभा–वृत्तान्त** :—१९६२–६३ या वर्षी कार्यकारी मंडळाच्या एकूण चार सभा झाल्या. (१५ एप्रिल, १० जून, २ नोव्हेंबर व १० फेब्रुवारी) या सभांत पुढील महत्त्वाचे निर्णय घेण्यांत आले. (१) कै. हृ. ना. आपटे

यांच्या स्मारकासाठी ५०० रु. ची रक्कम परिषदेकडे १९२५ सालापासून आहे. व्याजासह ही रक्कम रु. १२०० ची झाली आहे. प्रतिवर्षीच्या उत्कृष्ट कादंबरीस कै. आपटे पारितोपिक देण्याची जबाबदारी परिषदेने पत्करली होती. यंदापासून रु. ५० चे हे पारितोषिक देण्याची व्यवस्था व्हावी. (२) परिषदेच्या घटना-दुरुस्तीचा खर्डा संमत करण्यात आला. (३) कार्याध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी दि. ८–७–६२ रोजी कार्याध्यक्षपदाचा दिलेला राजीनामा त्यांनी परत घ्यावा असे २ नोव्हेंबरच्या सभेने मत व्यक्त केले. त्यानंतर प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी ७–११–६२ रोजी अध्यक्षांना आपला राजीनामा त्वरित मंजूर करावा अशा आशयाचे पत्र पाठविले होते. अध्यक्ष श्री. न. वि. गाडगीळ यांनी त्यांच्या पत्राचा विचार करून राजीनामा तात्पुरता स्वीकारल्याचे त्यांना कळविले. प्रस्तुत राजीनामा आता रीतसर मंजुरीसाठी जूनमधील वार्षिक साधारण सभेपुढे ठेवण्यात येणार आहे. (४) श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी ३०-६-६२ रोजी पत्र पाठवून चिटणीसपदाचा राजीनामा सादर केला होता, तो २ नोव्हेंबरच्या सभेत खेदपूर्वक मंजूर करण्यात आला. दि. १ फेब्रुवारीच्या सभेत प्रा. अ. गं. मंगरूळकर यांची चिटणीस म्हणून नियुक्ती करण्यात आली.

**नियामकमंडळ व वा. सा. सभा** :–नियामक मंडळ व वार्षिक साधारण सभा रवि. दि. १० जून १९६२ रोजी म. म. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली भरल्या होत्या. या सभांतून १९६१–६२ चे इतिवृत्त, जमाखर्च व अर्थसंकल्प संमत करण्यात आले. वार्षिक सभेत परिषदेच्या घटना-दुरुस्तीचा खर्डा संमत करण्यात आला. (सर्व सभासदांकडे तो लवकरच पाठविण्यात येईल.)

**शाखासभा वृत्तान्त**–

**सातारा** :–परिषदेच्या परीक्षांचे वर्ग चालविण्यात आले. म. सा. संमेलनास शाखेने संपूर्ण सहकार्य दिले. संमेलनाकडून साहित्यविषयक कार्यासाठी १५१ रु. ची देणगी मिळाली. श्री. विनायकराव कुलकर्णी व डॉ. प्र. शं. मराठे यांची अनुक्रमे 'संत ज्ञानेश्वर' व 'गडकऱ्यांचा विनोद' या विषयांवर व्याख्याने झाली. शाखेचे पदाधिकारी पुढीलप्रमाणे आहेत : श्री. मालोजीराव नाईक निंबाळकर (अध्यक्ष), डॉ. मे. ना. जोग (उपाध्यक्ष), श्री. म. स. आपटीकर (कार्याध्यक्ष), श्री. अ. श्री. भडकमकर व श्री. जयवंत गुजर (कार्यवाह).

**धुळे** :–ही शाखा यंदा नव्यानेच स्थापन झाली. सभासद-संख्या सुमारे १२५ आहे. श्री. रा. अ. काळेले यांच्या हस्ते २८ जूनला शाखेचे रीतसर उद्घाटन झाले.

८ आक्टोबरला श्री. गो. नी. दांडेकर यांचे 'साहित्याची प्रेरणा' या विषयावर व्याख्यान झाले. परिषदेच्या परीक्षांचे वर्ग चालविण्यात आले होते. वर्गाचा लाभ सुमारे १०० उमेदवारांनी घेतला.

**जळगाव** :–या वर्षी शाखासभेला स्थैर्य आणण्याच्या दृष्टीने विशेष प्रयत्न झाला. यंदा शाखासभेने महाराष्ट्र साहित्यपरिषदेचे तीस आजीव व जवळ जवळ साठ सर्वसाधारण सभासद केले. कार्यकारिणीच्या एकंदर चार बैठकी झाल्या व पुढील कार्यक्रमाची रूपरेषा ठरविली गेली. डॉ. शं. दा. पेंडसे यांचा षष्ट्यब्दिपूर्तिनिमित्त शाखेतर्फे सत्कार करण्यात आला. या वर्षी श्री. य. न. केळकर, श्री. भा. पं. बहिरट, श्री. मनोहरपंत केळकर यांनी शाखासभेला भेटी दिल्या व शाखासभेच्या कार्याबद्दल समाधान व्यक्त केले. फेब्रुवारीमध्ये शाखासभेची सर्वसाधारण सभा होऊन त्यात मागील वृत्तान्त व जमाखर्च मंजूर करण्यात आला व पुढील वर्षाच्या

अर्थसंकल्पाला मंजुरी देण्यात आली. त्याच सभेत श्रीमती गिरिजाबाई केळकर यांची अध्यक्ष म्हणून व श्रीयुत के. नारखेडे यांची उपाध्यक्ष म्हणून पुन्हा एकदा निवड झाली. या सभेत प्रा. अदवंत, के. नारखेडे व भुसावळचे काही सदस्य यांची मार्गदर्शनपर भाषणे झाली. शाखासभेचे यंदाचे पदाधिकारी पुढील आहेत :

श्रीमती गिरिजाबाई केळकर–अध्यक्ष.

श्री. के. नारखेडे–उपाध्यक्ष.

प्रा. म. ना. अदवंत–कार्याध्यक्ष.

प्रा. सुधाकर जोशी–खजिनदार,

प्रा. ज. वि. महाजन } चिटणीस
श्री. वा. रा. सोनार }

**परीक्षा** :–डिसेंबर १९६२ मध्ये झालेल्या परिषदेच्या परीक्षांची यंदा १३५ केंद्रे होती. सर्व केंद्रांना मिळून पुढीलप्रमाणे उमेदवार बसले होते :

| परीक्षा | बसले | उत्तीर्ण |
|---|---|---|
| प्रथमा | ३९३० | २७२८ |
| प्रवेश | १२५७ | ६५४ |
| प्राज्ञ | ४८० | २०१ |
| विशारद | ५६ | १६ |
| आचार्य | ६ | २ |
| | ५७२९ | ३६०१ |

या वर्षी झालेल्या परीक्षांत सर्व केंद्रांतून पुढील उमेदवार पहिले आले :–

**प्रथमा**—स. भा. चव्हाण, मल्हार पेठ केंद्र, पारितोपिक १० रु.

**प्रवेश**—व. प्र. देसाई, मिठबांव केंद्र, पारितोपिक १५ रु.

**प्राज्ञ**—रंजना य. अभंग, पुणे केंद्र, पारितोपिक २० रु.

**विशारद**—इंदू श्री. ठकार, पुणे केंद्र, पारितोपिक २५ रु.

**ग्रंथालय** :–चालू वर्षी पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेले ग्रंथ सोडून ४१०–९९ रुपयांचे ग्रंथ विकत घेण्यात आले. चालू वर्षात प्रसिद्ध झालेले महत्त्वाचे ग्रंथ घेण्यात आले. तसेच डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रा. सोसायटीकडून ग्रंथालयात नसलेली जुनी व महत्त्वाची ३२ पुस्तके निम्म्या किमतीत घेतली. पत्रिकेला अभिप्रायार्थ आलेल्या पुस्तकांपैकी २८७–७५ रुपयांची ८५ पुस्तके ग्रंथालयात जमा करण्यात आली. केसरी–मराठा ग्रंथशाळेतर्फे परिषदेच्या ग्रंथालयास या वर्षी ८० पुस्तके व नवभारत, प्रतिष्ठान या मासिकांचे २४ अंक भेटीदाखल देण्यात आले त्याबद्दल परिषद अत्यंत आभारी आहे. परिषदेचे सभासद श्री. वि. रा. देशपांडे यांनी "एकनाथी भागवता"ची एक प्रत ग्रंथालयास भेटीदाखल दिली त्याबद्दल आभार.

चालू वर्षी एकूण २३२ पुस्तकांची भर ग्रंथालयात पडली.

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका** :–चालू वर्षी प्रा. दि. के. बेडेकर यांच्या संपादकत्वाखाली चार अंक प्रसिद्ध झाले. पत्रिकेला परतभेट म्हणून पुढील नियतकालिके येतात :

**दैनिके** :–सकाळ, केसरी, तरुणभारत (पुणे व नागपूर आवृत्ती) विशाल सह्याद्रि, सोलापूर समाचार, गोमंतक, प्रदीप.

**अर्ध-साप्ताहिक** :–मराठवाडा.

**साप्ताहिके**:–साधना, महाराष्ट्र (नागपूर), प्रतोद, प्रबोधचंद्रिका, युगांतर, मराठा, पीपल्स राज, सोवियत देश, गोफण, अर्थ, गावकरी, ब्रिटिश इन्फर्मेशन सर्व्हिस, शिवनेर, The Times Weekly Review, London.

**पाक्षिके** :–अमेरिकन वार्ताहर, समाज-पत्रिका.

**मासिके** :–किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, सत्यकथा, वसंत, उद्यम, पुरुषार्थ, चित्रमयजगत, महाराष्ट्र, युगवाणी, प्रतिष्ठान, प्रसाद, नवभारत, भारतमित्र, एकता, अमृत, साहित्य·

सहकार, व्यापारी महाराष्ट्र, पी. ई. एन्., राष्ट्रवाणी, माणूस, सन्मति, चालना, शब्द-रंजन, नवे जग, महात्मा, गोकुळ, आनंद, शालापत्रक, मांडवी, मुलांचा श्याम.

त्रैमासिके :—मराठी—संशोधन—पत्रिका, पंचधारा, Bulletin of the Deccan College Research Institute, Journal of the Tanjore Saraswati Mahal Library.

पत्रिकेच्या वाङ्मय समालोचन (१९६२) अंकासाठी गतवर्षीप्रमाणे महाराष्ट्र सरकारच्या 'शिक्षण आणि समाजकल्याण' खात्याकडून यंदा १५०० रु. ची देणगी मिळाली. दिल्लीच्या बृहन्महाराष्ट्र बिल्डिंग ट्रस्टनेही नेहमीप्रमाणे ३५० रु. देणगी पाठविली. परिषद या दोन्ही संस्थांची ऋणी आहे.

२८-४-१९६३

वि. त्र्यं. शेटे
अ. गं. मंगरूळकर
म. ना. अदवन्त
चिटणीस

### छापता छापता

**भाषाशास्त्रज्ञ डॉ. रघुवीर यांचे अपघाती निधन**

'संपादकीय' या सदरात काही दुःखद निधनांचा उल्लेख केल्यानंतर हा अंक छापून तयार होण्यापूर्वीच डॉ. रघुवीर या थोर बहुभाषिक साहित्यिकाला व तळमळीच्या कार्यकर्त्याला श्रद्धांजली वाहण्याचा आमच्यावर प्रसंग आला आहे. डॉ. रघुवीर यांना भारतीय अनेक भाषांबरोबरच बऱ्याच युरोपीय भाषा अवगत होत्या. साहित्य, राजनीति, धर्मशास्त्र व विज्ञान यावर त्यांनी लिहिलेल्या ग्रंथांची संख्या शंभरापेक्षा अधिक आहे. विशेषत: पारिभाषिक शब्दकोषाचे त्यांनी केलेले प्रचंड कार्य चिरस्मरणीय होय. नवे शब्द घडविण्याचे सामर्थ्य संस्कृत भाषेतच आहे अशी त्यांची श्रद्धा होती. इंग्रजीच्या वर्चस्वामुळे प्रादेशिक भाषांचा विकास खुंटतो म्हणून संस्कृतनिष्ठ हिंदीचा त्यांनी हिरीरीने प्रचार केला. भारतीय भाषा सुप्रतिष्ठित करण्यासाठी ते अविश्रान्त झटले. अशा या कळकळीच्या कार्यकर्त्याला अपघाती निधन यावे ही अत्यंत दुःखाची गोष्ट होय. डॉ. रघुवीर यांच्या स्मृति-समाधीवर अत्यंत व्यथित अंतःकरणाने म. सा. परिषदेतर्फे आम्ही श्रद्धांजली वाहतो.

— संपादक

# नवीन सभासद

## तहहयात

१ श्री. द. दा. काळे, ठाणे,
२ प्रा. ना. द. नांदुर्डीकर, मुंबई २८
३ प्रा. व. कृ. वऱ्हाडपांडे, नागपूर ३
४ श्री. ग. ना भिडे, कल्याण
५ श्री. ग. का. रायकर, मुंबई ९
६ श्री. रा. अ. काळेले, इंदूर
७ श्री. गणाधीश वा. शे. खांडेपारकर, फोंडा ( गोवा )
८ श्री. मंदाकिनी कृ. द्रवीड, पुणे २
९ श्री. प. आ. वायंगणकर, पुणे २
१० श्री. श्री. गो. भांबूरकर, पुणे ५
११ श्री. म. ना. गोगटे, मुंबई २६
१२ श्री. ना. तु. ठाकूर, पुणे २
१३ श्री. रा. मा. दिवेकर, भादवण ( कोल्हापूर )
१४ डॉ. दु. का. संत, सोलापूर
१५ श्री. मु. मा. घाणेकर, पुणे २
१६ डॉ. वा. रा. नायन, मुंबई २८
१७ श्री. गु. कृ. ठोके, पुणे २
१८ श्री. ज. म. डोंगाळी, इस्लामपूर

## साधारण

१ श्री. ना सं. इनामदार, पुणे १
२ श्री. रा. भा. वझे, पुणे १
३ श्री. वा. भा. जोशी, पुणे ४
४ श्री. विनयकुमार रांजणगावकर, पुणे २
५ सौ. माणिक नी. लिमये, पुणे २

---

# AUDITORS' REPORT

MAHARASHTRA SAHITYA PARISHAD, POONA.

( **Name of the Trust** )

(Regd. No. P 90)

We, the undersigned Auditors have audited the accounts of the public Trust : MAHARASHTRA SAHITYA PARISHAD, POONA, for the year ended 3 st March, 1963 and have to state as ander :—

(a) The accounts are kept regularly and in accordance with the provisions of the Act & the Rules.

(b) Receipts & disbursements are properly and correctly shown in the accounts.

(c) Cash Balanee & Vouchers in the custody of the Trustees on the date of audit were in agreement with the accounts.

(d) All books, deeds, accounts, vouchers and other documents ana records required by us were produced before us.

(e) An inventory certified by the Trustees of the movables of the Trust has been maintained.

(f) No property or funds of the Trust were applied for any object or purpose other than the object or purpose of the Trust.

(g) Trustees appeared before us and furnished the necessary information required by us.

(h) There are no outstanding over one year and no amouut has been written off bad as bebts.

(i) There were no repairs over Rs. 5,000 hence no tenders were called for.

(j) No Money of the Trust has been invested contrary to the provisions of Sec. 35 of the Trusts Act.

(k) There were on alienations of the immovable property contrary to the provisions of Section 36 of the Trusts Act.

180, Budhwar Peth
Laxmi Road, Poona 2.
Dt. 11-5-1963

*Sd. G. M. Oka & Co.,*
*Chartered Accountants.*

शेड्यूल IX नियम

# महाराष्ट्र साहित्य

दि. १ एप्रिल १९६२ ते दि. ३१ मार्च

| खर्च | | रु. न.पैसे | रु. न.पैसे |
|---|---|---|---|
| **जिंदगी :** | | | |
| म्यु. कॉर्पोरेशन कर व भुईभाडे | ... | २६३·२४ | |
| इमारत दुरुस्ती | ... | ७८·४९ | |
| वीज | ... | १२५·७९ | ४६७·५२ |
| **संस्था :** | | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड | ... | ४,७६२·५६ | |
| कार्यालय छपाई | ... | ४२९·३५ | |
| कार्यालय टपाल व टेलिफोन | ... | ३९०·०० | |
| सादील | ... | १२१·५७ | |
| आतिथ्य | ... | ३००·०० | |
| प्रवास-प्रचार व महामंडळ | ... | ७९०·२५ | ६,७९३·७३ |
| **विश्वस्तांना संभावना द्रव्य** | ... | | |
| **वकील फी, कोर्ट खर्च** | ... | | |
| **हिशेब-तपासनीस सन १९६१-६२** | ... | | १००·०० |
| **कार्यकारी-नियामक-सभा** | ... | | १,२९६·४९ |
| **शाखा सभा** | ... | | ६२९·६५ |
| **संमेलन** | ... | | ३८६·१२ |
| **किरकोळ** | ... | | २१७·५० |
| **निवडणूक खर्च ( अध्यक्षीय )** | ... | | २००·२८ |
| **घसारा ( इमारत व फर्निचर )** | ... | | १,०३०·८७ |
| **संशोधन** | ... | | १,६८९·७५ |
| **परीक्षा** | ... | | ९,५१२·७१ |
| **'म. सा. पत्रिका' अंक** | ... | | ४,९५१·५५ |
| **चालू सालातील वाढावा** | ... | | ६०८·८४ |
| एकूण | ... | | २७,८८५·०१ |

पुणे,
दि. ११-५-१९६३.

**वि. द. घाटे,**
विश्वस्त.

**वि. त्र्यं. शेटे,**
**अ. गं. मंगरूळकर,**
**म. ना. अदवन्त,**
चिटणीस.

**न. का. घारपुरे,**
खजिदार.

( विश्वस्तांपैकी श्री. ध. रा. गाडगीळ परदेशी गेल्यामुळे त्यांची स्वाक्षरी घेता आली नाही. )

१७ ( १ ) प्रमाणे

## परिषद, पुणे २.

१९६३ अखेर मुदतीचे जमा-खर्च पत्रक.

| जमा | | रु. न.पैसे | रु. न.पैसे |
|---|---|---|---|
| देणग्या ( मा. प. सभागृह ) ... | | | ४९५·०० |
| सरकारी अनुदान ... | | | ६,१४०·०० |
| डिव्हिडंड ... | | | १६६·६५ |
| व्याज : ... | | | |
| बँकांचे खात्यावरील ... | | १७३·०० | |
| अल्पमुदत ठेवींवरील ... | | ९०८·५० | |
| सिक्युरिटीजवरील ... | | ८९२·६८ | |
| | | १,९७४·१८ | |
| वजा – जांभेकर पारितोषिकाकडे वर्ग ... | | ४०·०० | १,९३४·१८ |
| इतर उत्पन्ने : ... | | | |
| साधारण सभासद वर्गणी ... | | २,३५२·८६ | |
| संलग्न संस्थांकडून ... | | ७६·०० | |
| " पत्रिका " वर्गणी ... | | ३७६·८५ | |
| " पत्रिका " अंक विक्री व जाहिरात ... | | ३९८·५० | |
| परीक्षा शुल्क ... | | १५,११९·३५ | |
| संमेलन ... | | ७५१·०० | |
| किरकोळ ... | | ७४·६२ | १९,१४९·१८ |
| प्रकाशने : | रु. न.पै | | |
| ग्रंथ-विक्री ( १९६२–६३ ) | ५,१७०·९३ | | |
| अधिक : मार्च १९६३ अखेरचा साठा | १३,५६६·३५ | १८,७३७·२८ | |
| वजा : वर्षारंभीचा साठा | १,३६४·४५ | | |
| १९६२–६३ मधील खर्च | ५,७८७·६५ | ७,१५२·१० | |
| नफा ... | | ११,५८५·१८ | |
| वजा : नफा प्रकाशन निधीकडे ... | | ११,५८५·१८ | ००·०० |
| एकूण ... | | | २७,८८५·०१ |

आज तारखेस अलाहिदा दाखला दिल्याप्रमाणे.

( स्वाक्षरी ) **जी. एम्. ओक अॅन्ड कं.**
चार्टर्ड अकौंटंटस्.

अनुक्रमणिका

शेड्यूल VIII नियम

## महाराष्ट्र साहित्य

दि. ३१ मार्च १९६३

| निधी व देणी | | रु. न.पैसे | रु. न.पैसे |
|---|---|---|---|
| **कायम निधी :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ... | ४२,१२१·७८ | |
| अधिक तहहयात वर्गण्या | ... | ६,१४९·४२ | ४८,२७१·२० |
| **१ इतर राखीव निधी :** | रु. न.पैसे | | |
| इमारत, मागील ताळेबंदावरून | ४६,४२८·२४ | | |
| अतिथी भवनासाठी जमलेल्या देणग्या | १२,६०५·०० | ५९,०३३·२४ | |
| **२ ग्रंथालय :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | १८,८७१·८७ | | |
| अधिक परीक्षणाला आलेली पुस्तके | २८७·७५ | १९,१५९·६२ | |
| **३ कै. डॉ. केतकर स्मारक :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | १०१·०० | | |
| अधिक देणगी | १००·०० | २०१·०० | |
| **४ कै. टेंबे स्मारक व्याख्यानमाला :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३००·०० | | |
| अधिक चालू सालातील शिल्लक | १६·२३ | ३१६·२३ | |
| **५ प्रकाशन ( पारितोषिक ) :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ... | २०४·०० | |
| **६ वाङ्मयेतिहास योजना :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ९,५३१·१८ | | |
| वजा — १९६२–६३ चा खर्च | १,५४७·५१ | ७,९८३·६७ | |
| **७ प्रकाशन निधी :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | २३,५२९·९४ | | |
| अधिक १९६२–६३ मधील नफा | ११,५८५·१८ | ३५,११५·१२ | |
| **८ *जांभेकर पारितोषिक :** | १,०००·०० | | |
| अधिक व्याज | ८०·०० | १,०८०·०० | |
| **९ कै. वि. ब. व कै. सौ. पार्वतीबाई गोखले पारितोषिक :** | ... | ५,०००·०० | |
| **१० वाङ्मयसमालोचने :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | १,८२९·६७ | | |
| सरकारी व इतर देणगी | १,८५०·०० | | |
| | ३,६७९·६७ | | |
| वजा : १९६२–६३ मधील खर्च | १,८००·०० | १,८७९·६७ | |
| पुढील पानावर : रु. | ... | १,२९,९७२·५५ | ४८,२७१·२० |

* रु. १,००० + २५० रु. मॉडेल मिल्स, नागपूर शेअर्स अशी एकूण रु. १,२५० ची रक्कम पारितोषिकासाठी दिलेली आहे.

अनुक्रमणिका

१७ ( १ ) प्रमाणे.

## परिषद, पुणे २.

रोजीचा ताळेबंद.

| जिंदगी व येणी | | रु. न.पैसे | रु. न.पैसे |
|---|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | | |
| **इमारत लीजहोल्ड जागेवर** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ... | | ५८,५३७·२४ |
| **रोखे ( दर्शनी किंमतीने )** | | | |
| ३% १९४६ कन्व्हर्शन लोन प्रोनोट | ... | ५,०००·०० | |
| ४% बॉम्बे म्युनि. डिबेंचर्स | ... | ५००·०० | |
| ३% १९७०–७५ डेव्हलपमेन्ट लोन | ... | १०,८००·०० | |
| ३% १९४६ कन्व्हर्शन लोन | ... | २,७००·०० | |
| २½% १० वर्षे ट्रेझरी सेव्हिंग्ज डिपॉझिट | ... | १३,०००·०० | |
| ४% १० वर्षे ट्रेझरी सेव्हिंग्ज डिपॉझिट | ... | १,४००·०० | ३३,४००·०० |
| **शेअर्स ( दर्शनी किंमतीने )** | | | |
| २५ बॉम्बे स्टेट को-ऑपरेटिव्ह बँक, लि. चे प्रत्येकी रु. ५०·०० चे | ... | १,२५०·०० | |
| २३ सेन्ट्रल प्रॉ. रेल्वेचे प्रत्येकी रु. १०० चे | ... | २,३००·०० | ३,५५०·०० |
| **फर्निचर व डेडस्टॉक :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ... | | ७,४२४·५३ |
| **ग्रंथसंग्रहालय :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ... | १८,५६०·२८ | |
| १९६२–६३ मधील खरेदी | ... | ४१०·९९ | |
| परीक्षणाला आलेली पुस्तके | ... | २८७·७५ | १९,२५९·०२ |
| **कर्जे :** | | | |
| **शिल्लक पुस्तकांची किंमत :** ( चिटणीसांनी दाखला दिल्याप्रमाणे ) | ... | | १३,५६६·३५ |
| **पुणे इलेक्ट्रिक सप्लाय कंपनीकडे डिपॉझिट :** | | | २६०·०० |
| **ॲडव्हान्स :** | ... | | २००·०० |
| पुढील पानावर रु. | ... | | १,३६,१९७·१४ |

अनुक्रमणिका

शेड्यूल VIII नियम

महाराष्ट्र साहित्य

दि. ३१ मार्च १९६३

| निधी व देणी | | रु. न.पैसे | रु. न.पैसे |
|---|---|---|---|
| मागील पानावरून चालू ... | | १,२९,९७२·५५ | ४८,२७१·२० |
| **प्रॉव्हिडंट फंड ( सेवक )** | रु. न.पैसे | | |
| मागील ताळेबंदावरून | ३,३३६·६६ | | |
| १९६२–६३ ची जमा | २९९·१२ | | |
| १९६२–६३ मधील व्याज .. | ८०·६७ | ३,७१६·४५ | |
| **घसारा :** | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ६,०९६·९८ | | |
| चालू साली तरतूद | १,०३०·८७ | ७,१२७·८५ | १,४०,८१६·८५ |
| **कर्जे :** | | | |
| **देणी :** | | | |
| सांगली शाखा पारितोषिक ... | | | ४००·०० |
| चालू सालातील वाढावा ... | | | ६०८·८४ |
| एकूण रु. ... | | | १,९०,०९६·८९ |

वि. श्यं. शेटे,

अ. गं. मंगरूळकर,

पुणे, दि. ११-५-१९६३. } वि. द. घाटे, विश्वस्त. म. ना. अदवन्त, चिटणीस. न. का. घारपुरे, खजिनदार.

अनुक्रमणिका

१७ ( १ ) प्रमाणे.

## परिषद्, पुणे २.

रोजीचा ताळेबंद ( पुढे चालू ).

| जिंदगी व येणी | रु. न.पैसे | रु. न.पैसे |
|---|---|---|
| मागील पानावरून ... | | १,३६,१९७·१४ |
| **अखेर शिल्लक :** | | |
| रोख, चेक्स् व तिकिटे ... | ४१६·१४ | |
| पुणे सेंट्रल को-ऑप. बँक लि., करंट खाती ... | ६०·८४ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., पुणे करंट खाती ... | ४६·५१ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., पुणे सेव्हिंग्ज खाती ... | ११,२२७·०२ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., पुणे अल्प मुदत ठेवी ... | ३०,०००·०० | |
| स्टेट बँक ऑफ इंडिया, सेव्हिंग्ज खाती ( ट्रस्टी ) ... | ८,४३२·७९ | |
| पुणे सेंट्रल को-ऑप. बँक लि., पुणे ( प्रॉ. फंड ) ... | ३,७१६·४५ | ५३,८९९·७५ |
| एकूण रु. ... | | १,९०,०९६·८९ |

आज तारखेस अलाहिदा दाखला दिल्याप्रमाणे.

( स्वाक्षरी ) जी. एम्. ओक अँन्ड कं.
चार्टर्ड अकौंटंटस्.

## महाराष्ट्र साहित्य

### १९६३-६४ चा

जमा

| खाते | | अंदाज १९६२-६३ | प्रत्यक्ष जमा १९६२-६३ | अंदाज १९६३-६४ |
|---|---|---|---|---|
| | | रु. न.पै. | रु. न.पै. | रु. न.पै. |
| विश्वस्तांकडील व्याजातून | ... | १,०००·०० | | |
| इतर व्याज | ... | ९००·०० | २,१४०·८३ | १,२००·०० |
| साधारण सभासद वर्गणी | ... | २,१००·०० | २,३५२·८६ | २,०००·०० |
| तहहयात वर्गणी | ... | ७००·०० | ४,४२४·१५ | १,०००·०० |
| प्रकाशने ( ग्रंथविक्री ) | ... | ६,०००·०० | ५,१७०·९३ | २,०००·०० |
| परीक्षा शुल्क | ... | १५,०००·०० | १५,११९·३५ | १५,०००·०० |
| 'पत्रिका' वर्गणी | ... | २५०·०० | ३७६·८९ | ३००·०० |
| 'पत्रिका' विक्री व जाहिरात | ... | ३००·०० | ३९८·५० | ३००·०० |
| संलग्न संस्था वर्गणी | ... | ७०·०० | ७६·०० | ७५·०० |
| मा. प. सभागृह | ... | ५००·०० | ४९५·०० | ५००·०० |
| किरकोळ | ... | ७५·०० | ७४·६२ | ७५·०० |
| सरकारी अनुदान | ... | १,०००·०० | ६,१४०·०० | ६,०००·०० |
| पुणे महानगरपालिकेकडून | ... | १००·०० | ००·०० | १००·०० |
| संमेलनाकडून | ... | ४००·०० | ५०५·७० | ५००·०० |
| वाङ्मयसमालोचने | ... | १,८५०·०० | १,८५०·०० | १,८५०·०० |
| कै. टॅंचे स्मारक व्याख्यानमाला | ... | ३००·०० | ३००·०० | ३००·०० |
| वाङ्मयेतिहास | ... | ५,०००·०० | | ५,०००·०० |
| घसारा | ... | ६००·०० | | १,०००·०० |
| तूट | ... | | | ३,९२५·०० |
| | | | | ४१,१२५·०० |

**इमारतवाढ – अतिथिभवन**

**( अर्थसंकल्प १९६३-६४ )**

| जमा | रु. न.पै. | खर्च | रु. न.पै. |
|---|---|---|---|
| १९६२-६३ मधील जमा | १२,६०५·०० | | |
| १९६३-६४ | २८,०००·०० | १९६३-६४ | ४०,०००·०० |
| | ४०,६०५·०० | | ४०,०००·०० |

# परिषद, पुणे २.

अर्थसंकल्प.

खर्च

| खाते | अंदाज १९६२–६३ | प्रत्यक्ष खर्च १९६२–६३ | अंदाज १९६३–६४ |
|---|---|---|---|
| | रु. न.पै. | रु. न.पै. | रु. न.पै. |
| पगार ... | ४,८००·०० | ४,६१३·०० | ४,८००·०० |
| प्रॉव्हिडंट फंड ... | १६०·०० | १४९·५६ | १६०·०० |
| ग्रंथसंग्रहालय ... | ५००·०० | ४१०·९९ | ८००·०० |
| प्रकाशने ... | ६,०००·०० | ५,७८७·६५ | ५,०००·०० |
| परीक्षा ... | १०,०००·०० | ९,५१२·७१ | १०,०००·०० |
| ' पत्रिका ' ( कागद, छपाई इ. ) ... | ५,०००·०० | ४,९५१·६५ | ५,०००·०० |
| शाखासभा हिस्सा ... | १६०·०० | ६२९·६५ | २५०·०० |
| वीज ... | १७५·०० | १२५·७९ | १५०·०० |
| भुईभाडे ... | ३०·०० | ३०·०० | १५·०० |
| पुणे महापालिका कर ... | ११५·०० | २३३·२४ | २५०·०० |
| कार्यालय छपाई ... | ३००·०० | ४२९·३५ | ५००·०० |
| कार्यालय टपाल व फोन ... | ३००·०० | ३९०·०० | ५००·०० |
| सादील ... | १२५·०० | १२१·५७ | १५०·०० |
| आतिथ्य ... | ३००·०० | ३००·०० | ३००·०० |
| उपसमित्या ... | ५०·०० | ००·०० | १००·०० |
| किरकोळ ... | २००·०० | २१७·५० | २५०·०० |
| कार्यकारी नियामक सभा ... | १,२००·०० | १,२९६·४९ | १,५००·०० |
| प्रवास – प्रचार व महामंडळ ... | ५००·०० | ७९०·२५ | ८००·०० |
| नवीन सामान ... | ३००·०० | ००·०० | १,०००·०० |
| इमारत दुरुस्ती ... | २५०·०० | ७८·४९ | १००·०० |
| निवडणूक ... | ३००·०० | २००·२८ | १,०००·०० |
| वाङ्मयेतिहास ... | ५,०००·०० | १,५४७·५१ | ५,०००·०० |
| संशोधन ... | २००·०० | २८१·४७ | ३००·०० |
| वाङ्मयसमालोचने ... | १,८००·०० | १,८००·०० | १,८००·०० |
| कै. टेंबे स्मारक व्याख्यानमाला ... | ३००·०० | २८३·७७ | ३००·०० |
| हिशेब तपासनीस ... | १००·०० | १००·०० | १००·०० |
| घसारा ... | ६००·०० | १,०३०·८७ | १,०००·०० |
| | | | ४१,१२५·०० |



अनुक्रमणिका

# साभार-स्वीकार

जानेवारी ते एप्रिल अखेर

## कथा

१. खरात शंकरराव — सांगावा, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३=५०
२. गोखले अरविंद — विप्रहर्ती, सुविचार प्रकाशन, नागपूर-पुणे २; ५=००
३. देसाई कृ. रा. — वेगळ्या शिकारकथा, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ३=००
४. भंडारी रतनलाल — दान, सौ. राजुल भंडारी, सुपे; ००=३०
५. भोसल म. भा. — कथाजन्माची कथा, ग्रामीण प्रकाशन, धनगाव; ३=००
६. भोसले म. भा. — ग्रामीण कथा, ग्रामीण प्रकाशन, धनगाव (सांगली); ६=००
७. मिरासदार द. मा. — स्पर्श, सुविचार प्रकाशन, नागपूर-पुणे २; ५=००
८. बनारसे तारा — पश्चिमकडा, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५=५०
९. विद्वांस र. गं. — हरवऱ्याचं झाड, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; ४=००
१०. शिर्के रा. पां. — हुंडाबंदी, ग्रामीण प्रकाशन मंदिर, अंचक (सांगली); ००=७५

## कादंबरी

११. कुलकर्णी श्री. द. — कल्पवन, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५=००
१२. ठोकळ ग. ल. — ठिणगी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ३=५०
१३. भोसले म. भा. — घसरगुंडी, ग्रामीण प्रकाशन, धनगाव (सांगली); ६=००
१४. मुक्तिबोध शरच्चंद्र — क्षिप्रा, (द्वितीयावृत्ती), मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४=५०
१५. मुक्तिबोध शरच्चंद्र — सरहद्द, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५=००

## काव्य

१६. अघोरे भ. वा. — नवमी (संपादन), म. वा. अघोर, ड-कसबा, सोलापूर; २=५०
१७. गोडबोले के. वि. — आर्यारामायण बालकाण्ड, के. वि. गोडबोले, पुणे ४; १०=००
१८. तुळपुळे शं. गो. — रामकविकृत भाषाप्रकाश, पुणे विद्यापीठ, पुणे ७; ५=००
१९. देशपांडे निर्मला — गंधखुळी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २=५०
२०. प्रताप — गीतगंगा, सौ. कृष्णाताई जमदाडे, दुधोंडी (सांगली); १=००
२१. प्रभु आरती — दिवेलागण, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४=००
२२. प्रियोळकर अ. का. — कविवर्य मोरोपंतांचे समग्र ग्रंथ— अकरावा खंड स्फुट काव्ये भाग २ रा, मराठी सं. मंडळ, मुंबई १४; ५=००
२३. मोहर — (मराठवाड्यातील प्राति-संग्रह), मराठवाडा कविसंमेलन, नांदेड; २=००
२४. शिल्प — (स. प. महाविद्यालय नवोदित कवींचा संग्रह), मराठी वाङ्मय मंडळ, स. प. महाविद्यालय, पुणे २; १=००
२५. सुधांशु — गीतसुधा, समर्थ प्रकाशन, सातारा; ००=७५

## नाटक–एकांकिका

२६. करमरकर नानासाहेब — बाजारात तुरी, जोशी ब्रदर्स, पुणे २; २=००
२७. जोशी न. म. — हलकल्लोळ आणि इतर एकांकिका, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; १=७५

## चरित्रात्मक

२८. काळे श्री. वा. — जया अंगी मोठेपण, व्हीनस प्रकाशन, पुणे २; ३=००
२९. कुलकर्णी भीमराव — स्वामी विवेकानंद, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २ २=५०
३०. जोशी म. द. — अवधूतगंगा, ज. आ. भोंडकर, मुंबई ४; ५=००
३१. ताटके अरविंद — पं. मोतीलाल नेहरू, इनामदार बंधु प्रकाशन पुणे २; २=००
३२. दीक्षित म. श्री. — साहित्यिकांच्या सहवासांत, व्हीनस प्रकाशन पुणे २; ३=००
३३. देशपांडे मु. गो. — पाश्चात्य प्रतिभा-होमर ते हेमिंग्वे, महाराष्ट्र प्रकाशन, कोल्हापूर; १५=००
३४. वैद्य ग. म. — विवेकानंदांची गोष्ट, कर्नाटक हाऊस, मुंबई २; ००=८०

## निबंध

३५. काणेकर अनंत — पाण्यावरच्या रेषा, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ५=००
३६. कुलकर्णी वि. रं. — हिमालयाची पत्रे, सुधाकर खाडे, इचलकरंजी; ००=५१
३७. देशपांडे मु. गो. — प्रो. विजापूरकर यांचे लेख (संपा.), कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; १५=००
३८. वनहट्टी श्री. ना. — चिंतन आणि चर्चा, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे, ५=००

## इतर

३९. कारेकर वासुदेवसुत — हृदयकमळ, चा. वा. कारेकर, कोल्हापूर; २=००
४०. केळकर न. चिं. — मराठे आणि इंग्रज (पाचवी आवृत्ती), मॉडर्न बुक डेपो, पुणे २; १०=००
४१. जेजुरीकर कृ. न. — शारीरिक शिक्षण आणि लष्करी शिक्षण, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३=५०
४२. काही शैक्षणिक समस्या — (डॉ. जेजुरीकर अभिनंदन ग्रंथ-संपादन) कॉंटिनेंटल, प्रकाशन, पुणे २; ३=५०
४३. देशपांडे अ. ना. — डॉ. शं. दा. पेंडसे गौरवग्रंथ अर्थात संतसाहित्य संस्कृतिमंथन, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे २; १०=००
४४. बावर सरोजिनी — लोकसाहित्य: भाषा आणि संस्कृति (संपादन), महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती, पुणे १; २=००
४५. शेजवलकर-दातार-शेलेंकर — व्यापारसंघटन, विद्यामंदिर प्रकाशन, पुणे २; ७=००

महाराष्ट्र–साहित्य–परिषद

# प्रकाशने



| | | |
|---|---|---|
| १ | **मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास** (मानभाव अखेर)<br>कै. वा. अ. भिडे | |
| २ | **म. सा. परिषद–इतिहास**<br>द. वा. पोतदार | ३·०० |
| ३ | **द्रौपदीस्वयंवर** (अवचितसुत-काशीकृत)<br>संपादक – वा. दा. गोखले | ५·०० |
| ४ | **संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती** (द्वितीयावृत्ती)<br>गं. बा. सरदार | ३·०० |
| ५ | **शास्त्रीय परिभाषा कोश**<br>संपादक – आपटे व जोशी | ६·०० |
| ६ | **वाङ्मयीन वाद** (पुरस्कृत) | ३·०० |
| ७ | **सारस्वत प्रवेश** (प्रथमा परीक्षेकरिता) | २·०० |
| ८ | **साहित्यसुगंध** (प्रवेश परीक्षेकरिता) | ३·५० |
| ९ | **निबंधविकास** (प्राज्ञ परीक्षेकरिता) | २·५० |
| १० | **लेखनविषयक नियम** (मराठी साहित्य महामंडळ) | ०·१५ |

क्र. ४ व ६ या पुस्तकांची मागणीअनुक्रमे मॉडर्न बुक डेपो, पुणे २. व प्रसाद प्रकाशन, पुणे २ यांचेकडे करावी. इतर मागणी वगैरे

चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद,

टिळकरस्ता, पुणे २.

# अतिथीभवनाचे देणगीदार

म. सा. परिषदेच्या संकल्पित अतिथीभवनास एप्रिल १९६३ अखेरपर्यंत पुढीलप्रमाणे देणग्या मिळाल्या आहेत—

| | |
|---|---|
| मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या निधीतून | रु. ५००० |
| दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि. पुणे | रु. १००० |
| श्री. क्ष, नागपूर | रु. ५०० |
| डॉ. सर चिंतामणराव देशमुख, दिल्ली | रु. १०० |
| श्री. दयानंद बांदोडकर, पणजी | रु. ५००० |
| श्री. वि. सी. गोडबोले, पुणे | रु. ५ |
| महाराष्ट्र-निवास, कलकत्ता | रु. १००० |
| श्री. वि. द. चौगुले, मार्मागोवा | रु. ५००० |
| | एकूण रु. १७६०५ |

मुद्रक : श्री. वि. ग. माटे, विश्वकर्मा मुद्रणालय, ३९५ टिळक रस्ता, पुणे २
प्रकाशक : श्री. वि. त्र्यं. शेटे, चिटणीस म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे २


अनुक्रमणिका



